# नवभारत ग्रंथमालेचीं
## लवकरच प्रसिद्ध होणारीं पुस्तकें

### भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न

लेखक, श्री. विठ्ठल रामजी शिंदे

अस्पृश्यतेच्या प्रश्नावर खुद्द श्री. अण्णासाहेब शिंदे यांचें पुस्तक अत्यंत परिश्रमाने मिळवून प्रसिद्ध करण्यांत येत आहे यातच 'नव-भारत ग्रंथमाले'चें अपूर्वत्व आहे. अगोदरच विषय अत्यंत महत्त्वाचा व जिव्हाळयाचा; आणि त्या विषयावर लिहिण्यास अखिल महाराष्ट्रांत, किंबहुना हिंदुस्थानांत, सर्वांत अधिक लायक व्यक्ति जर कोणती असेल तर ती श्री. शिंदे हीच होय याविषयीं कोणाचेंही दुमत होणार नाही.

प्रस्तुत पुस्तक बहुधा दोन खंडांत प्रसिद्ध होईल. पहिला खंड छापत असून तो श्री. शिंदे यांच्या साठाव्या वाढदिवसाच्या दिवशीं, म्हणजे ता. २३ एप्रिल रोजीं, प्रसिद्ध होईल.

### नागरिकनीतिशास्त्र

लेखक, प्रो. श्रीधर वेंकटेश पुणतांबेकर

देशांतील नागरिक सुसंपन्न, सुसंस्कृत व सुविनीत कसा बनेल हाच प्रश्न सर्व देशोद्धारकांच्या डोळयांसमोर प्रामुख्याने असतो. नागरिकाच्या जीवनाच्या सर्व अंगांचा विचार करणारें पाश्चात्य देशात जरी एक शास्त्रच—Civics—बनलें असले तरी आपल्याकडे तशा तऱ्हेचा विचार अद्याप फारच थोडा झालेला आहे. अशा स्थितीत बनारस युनिवर्सिटींतील इतिहास, राजकारण व तत्सम शास्त्रें यांचे अध्यापक प्रो. पुणतांबेकर यानी लिहिलेलें हें पुस्तक मराठी वाङ्मयांत अपूर्वच होईल हें सांगणे नको.

### कालिदास

लेखक, प्रो. वासुदेव विष्णु मिराशी

खुद्द कविकुलगुरु कालिदासाविषयीं विवेचक दृष्टीने लिहिलेलें व आजतागायत माहितीने युक्त असे पुस्तक मराठींत कोठे आहे ? विष्णुशास्त्र्यांचा निबंध उत्कृष्ट आहे; परतु तो कांहीसा एकांगी असून आता माजी झाला आहे. तेव्हा प्रो. मिराशींच्या अधिकारयुक्त लेखणींतून उतरलेल्या ह्या सर्वांगपरिपूर्ण ग्रंथाने मराठींतील मोठीच उणीव भरून निघेल यांत शंका नाही.

# अमेरिका

## ( संयुक्त संस्थानें )

### पूर्वखंड

लेखक

**नारायण हरि आपटे**

गृहसौख्य, सुखाचा मूलमंत्र, दिवाकर दृष्टि,
पहाटेपूर्वीचा काळोख, बनारसी बोरे,
इ. पुस्तकांचे कर्ते.

नवभारत ग्रंथमाला कार्यालय

शके १८५४ ] नागपूर [ इ. स. १९३२

# प्रस्तावना

प्रस्तुत इतिहास लिहिण्याची कल्पना मनांत इ. स. १९१२-१३ साली उद्भवली. नंतर तिला अल्पसें स्वरूप इ.स. १९१५साली 'आह्लाद' साप्ताहिकांतून प्रगट झालें. नंतर आजचा ग्रंथ लिहिण्यास दीड वर्षापूर्वी सुरुवात केली. अनेक संकटांतून निभावता तो आता वाचकांपुढे येत आहे. यालाही कारण माझे सन्मित्र, विद्वान लेखक व नवभारत ग्रंथ-मालेचे चालक श्रीयुत श्री. ना. बनहट्टी, नागपूर, हेच आहेत. त्यांनी प्रोत्साहन देऊन व मजकडून ग्रंथ पुरा होण्यास लागणारा अक्षम्य विलंब शांतपणें सहन करून जर मार्ग दाखविला नसता तर कदाचित् अद्यापीही हा ग्रंथ केवळ कल्पनेतच राहिला असता किंवा मजकडून तो लिहूनही झाला नसता. ग्रंथाच्या अंतरंगाबद्दल मला काही विशेष सांगता येण्यासारखें नाही. एवढेंच सुचवून ठेवावेसे वाटतें की, सोबत जोडलेल्या आधारभूत ग्रंथांच्या आधारेंच याची निर्मिती असल्यामुळे त्यांत माझे स्वतःचे काही नाही. मात्र कोणत्याही ग्रंथाचें किंवा त्यातील भागाचें स्वच्छ भाषांतर कोठेच केलेलें नसल्यामुळें प्रकरणाची मांडणी, भाषापद्धति व प्रतिपादन यांच्यातील गुणदोषाला माझा मीच जबाबदार आहे. विपर्यास किंवा अतिशयोक्ति एका ओळीनेही केलेली नाही व आधारावाचून पाऊल टाकलेले नाही.

प्रस्तुतसारखा ग्रंथ लिहावयाचा म्हणजे त्यास पुस्तकाचें साह्य पाहिजे तें कोरेगांवासारख्या खेड्यांत लाभणें दुरापास्तच असतें व स्वतः खरेदी करूं म्हटलें तर तें अशक्यच. परंतु ही माझी गरज बडोदा लायब्ररीचे क्यूरेटर श्री. न्यूटन मोहन दत्त व रेफरन्स लायब्ररीचे व्यवस्थापक श्री. के. म. रांगणेकर यानी मोठ्या आनंदाने भागवून मला मोठें उपकृत करून ठेविलें आहे. त्याचप्रमाणें बडोद्याचे प्रसिद्ध लेखक श्री. वा. वि. जोशी यांनी व श्री. ज. र. घारपुरे, प्रिन्सिपाल लॉ कॉलेज, पुणें, यांनीही, आपल्या जवळची पुस्तकें दीर्घकाल मजकडे ठेवून माझी नड भागविली. याकरिता या सर्वांचे मी मनापासून आभार मानतों. श्री. बनहट्टी हे मालेचे संपादकच आहेत; त्यांना सदर पुस्तक लिहून मिळण्यास फारच विलंब लागला असतांही त्यांनी न त्रासतां हा ग्रंथ मान्य केला याबद्दल त्याचेही अंतःकरणापासून आभार मानून पुरें करितों.

कोरेगांव<br>पौष व. ११ शके १८५४

वाचकांचा नम्र सेवक,<br>नारायण हरि आपटे

# अनुक्रमणिका

# अमेरिका

## पूर्वखंड

### प्रकरण पहिलें

### प्रवेशद्वाराशीं

काव्यायांत इतिहासग्रंथांना फार महत्त्वाचें स्थान आहे. गतकालांत होऊन गेलेल्या नामांकित स्त्रीपुरुषांच्या बऱ्यावाईट कृतींचें व आचारविचारांचें यथातथ्य वर्णन करणें हाच त्याचा प्रधान हेतु असल्यामुळें त्यांचें अंतरंग, अनेकविध पुष्पसंभारानें फुललेल्या उद्यानाप्रमाणें किंवा मोहक रंगांच्या छटा दाखविणाऱ्या इन्द्रधनुष्याप्रमाणें, मोठें मनोवेधक व चमत्कारपूर्ण असतें. काल हा जसा सर्वभक्षक असून आपपर भाव न मानणारा आहे तसाच त्याच्या हातांत हात घालून चालणारा इतिहास सर्वसंग्राहक असून कोणतेही भेद न मानणारा आहे. स्त्री—पुरुष, श्रेष्ठ—कनिष्ठ, सधन—निर्धन किंवा पंडित—मूर्ख असला फरक इतिहास जमेला धरीत नाही. आणि म्हणूनच कोणत्याही कारणांनीं लोकप्रसिद्धि पावलेल्या व्यक्तींचीं चरित्रें त्याच्या विशालोदरांत समावलेलीं दिसतात.

या दृष्टीनें इतिहासाचें वैचित्र्य मोठें मननीय व बोधप्रद आहे. येथें प्रजावत्सल नृपतीच्या न्याय्य अनुशासनाची व पक्षातीत प्रजानुरंजनाचीं रम्य चित्रें आढळतात तर त्यांच्याच शेजारीं नृशंस राजा—महाराजांच्या अधम व अघोर पातकी कृत्यांचीं व क्रूर प्रजाछलाचीं भेसूर चित्रें दिसतात. येथें शूरावीरांचे पराक्रम, साध्वी स्त्रियांची तेजस्विता, धीरोदात्तांची धीरगंभीरता, मानी जनांची मानधनता, कुशाग्रबुद्धि मंत्र्यांची राजकारणपटुता व सुष्टांची साधुता इत्यादि मनुष्यस्वभावाचे उत्तम प्रकार आढळतात तर त्यांच्याच जोडीला कापुरुषांचा नेभळटपणा, स्त्रीबुद्धीचे

अनर्थ, घातक्यांची कपटनीति, द्रोहीजनांची नीचता, लोभी लोकांची पिशुनवृत्ति व दुष्टाची क्रूरता इत्यादि अधम प्रकारही आढळतात! व्यक्ति तितक्या प्रकृति आणि प्रकृति तितकीं चरित्रें अशी मानवजातीची रचना असल्यामुळें इतिहासाच्या संग्रहालयांत मनुष्यस्वभावाचे बहुतेक सारे नमुने हारीने मांडलेले नजरेस येतात. अर्थात् या सर्वांवरून सहज किंवा सखोल दृष्टि फिरविणाऱ्या जिज्ञासूंची बुद्धि कमी अधिक प्रमाणांत परिमार्जित होत असल्यास त्यांत नवल तें काय ! खरोखरच या एकाच गुणाने इतिहासाची थोरवी अनुमानतां येण्यासारखी आहे. परंतु ती एवढ्यानेच मर्यादित नाही.

अखिल मानवजातीने निर्माण केलेलीं भिन्न भिन्न शास्त्रें, विद्या, कला, धर्म व संस्कृति इत्यादि साऱ्या व्यापांत इतिहासाने आपले बाहु पसरलेले असून त्याच्या आधारें त्या सर्वांना चालावें लागतें. यावरून इतिहासाचें स्वरूप कसें सर्वव्यापी आहे हें सहज समजण्यासारखें आहे. महाभारतांत चमकणाऱ्या साऱ्या शूरावीरांत भीष्मपितामह जसे अगदी स्वतंत्र, सर्वोच्च व पूज्य वाटतात त्याचप्रमाणें ग्रंथभांडारात इतर साऱ्या ग्रंथांना इतिहास बाटावा अशी त्याची योग्यता आहे. अस्तु.

इतिहासाचें एकंदर स्वरूप मोठें भव्य व उद्बोधक असल्यामुळें त्याचें पठनपाठन किंवा वाचनश्रवण सानापासून थोरापर्यंत व अज्ञापासून सुज्ञापर्यंत सर्वांनाच मोठें मनोवेधक वाटतें. आपल्या पूर्वजांचे पोवाडे गाण्यास किंवा ऐकण्यास कोणास नको आहेत ! शूरावीरांचे पराक्रम श्रवण केल्यानंतर कोणाचीं हृदयें हेलावून जात नाहीत !—इतिहास ऐकून पराक्रमी व्यक्ति निर्माण होतात आणि पराक्रमी व्यक्ति इतिहासाला नवें जीवन देतात. इतिहास सर्वप्रिय आहे तो यामुळें. मनुष्याच्या आयुष्याशीं त्याचा जिव्हाळयाचा संबंध आहे तो यामुळें. आर्यांचा राष्ट्रेतिहास जो महाभारत ग्रंथ त्याचा गुणगौरव वर्णन करितांना असें म्हटलें आहे की,

अज्ञानतिमिरान्धस्य लोकस्य तु विचेष्टतः ।
ज्ञानाञ्जनशलाकाभिर्नेत्रोन्मीलनकारकम् ॥

‘ अज्ञानरूपी अंधकाराने आंधळे होऊन धडपडणाऱ्या लोकांच्या डोळ्यांत ज्ञानरूपी अंजन घालून त्यांना दिव्यदृष्टि देणारें [ असें हें महाभारत आहे. ]’

आह्मांला वाटतें, थोडी व्यापक दृष्टि ठेवून पाहिल्यास महाभारताचा हा गुणविशेष पर्यायाने कोणत्याही चांगल्या इतिहासग्रंथास लावितां येईल. कारण, त्याचा प्रधान हेतूच ज्ञानदान आहे. इतिहासाच्या परिशीलनाने बुद्धि तरतरीत होणें, विचारशक्ति वाढणें, मन उत्साही व कार्यक्षम बनणें, स्वाभिमान जागृत होणें, अहंभाव गळून जाणें व सत्यासत्याची निवड करतां येणें इत्यादि उच्च प्रकारचे लाभ मनुष्यास झालेच पाहिजेत. ज्या ग्रंथापासून ते होणार नाहीत त्यांना इतिहास ही संज्ञा शोभणार नाही. ज्ञानोपासनेच्या इच्छेने हातीं घेतलेला इतिहास केव्हाही दुराभिमान, दुराग्रह आणि दोषैकदृष्टि या कलंकांपासून अलिप्त असला पाहिजे. जेत्यानी जिताकरिता रचलेले इतिहास या दृष्टीने टाकाऊ असतात. त्यांना अभ्यासातून वगळावें हें बरें. असो.

व्यक्तीच्या जीवनात इतिहासग्रंथाचा काय उपयोग आहे हें पाहिल्यानंतर राष्ट्राच्या जीवनास त्याची किती आवश्यकता आहे हें न सांगतांही कळण्यासारखें आहे. म्हणूनच प्रत्येक राष्ट्र आपल्या इतिहासास अत्यंत प्रिय मानतें व त्याची उज्ज्वल परपरा टिकून राहावी यासाठी डोळयांत तेल घालून जपत असतें. जगातील सर्वच राष्ट्रांना व मानवकुलांना काहींना काही इतिहास असतोच; पण ज्यांचा तो प्रौढप्रतापी व दीप्तिमन्त आहे तीं राष्ट्रें धन्य होत ! या दृष्टीने भारतवर्ष त्रिवार धन्य आहे. परंतु त्या धन्यत्वावर आम्हांला आज उन्नतशीर्ष होऊन जगाकडे पाहतां येतें आहे का ?—नाही. आमच्या इतिहासाशीं अगदी विसदृश अशी आमची आजची अवस्था असून आमच्याइतकें अधोगत असें राष्ट्र पृथ्वीतलावर एकही नाही ! या अनर्थाचीं कारणें अनेक आहेत व त्यांचा थोडाफार विचार सर्वत्र व सर्वांकडून होतच आहे. आपल्या चालू विषयापुरतें पाहाणें झाल्यास असें सांगता येईल की, आम्ही आपल्या इतिहासाचा अभ्यास ज्या राष्ट्रीय दृष्टीने करावयास हवा होता, तसा कधीच केला नाही आणि ज्या परजातींशीं किंवा लोकांशीं आमचे निकट संबंध आले त्यांच्या इतिहासाकडे किंवा चरित्राकडे ढुंकूनही पाहिलें नाही. सृष्टीच्या चक्रनेमिक्रमास अनुसरून वैभवाच्या परमोच्च बिन्दूवरून आम्ही मागेंच ढळलों होतों. त्यांत या लोकविलक्षण अंधत्वाची भर पडली ! आमच्या अधोगतीला वेग चढला. पर्वतशिखरा-

वरून सुटलेल्या शिलाखंडाप्रमाणें आमची स्थिति अनावर झाली. आणि शेवटीं आजच्या घोर पारतंत्र्याच्या गर्तेत आम्ही गाडले गेलो. यातून आता उद्धरून जावयाचें म्हणजे आमचें अंधत्व नष्ट झालें पाहिजे.

अधोगतिक राष्ट्र स्वभावतःच मंदबुद्धि, दुर्बलमनस्क, विकलांग व निश्चेष्ट बनत जातें. त्यास आत्मप्रत्यय असा कसा तो नसतोच. दैववाद त्याच्या रोमरोमांत भिनतो आणि प्रगतीचे व आत्मोद्धाराचे कष्ट त्यास असह्य वाटतात. यामुळेंच त्यास कर्तृत्वापेक्षा वक्तृत्व बरें वाटतें आणि पूर्वजांच्या जीर्ण पुण्याईच्या आधाराने कुत्र्याच्या जिण्याने जगण्याची त्यास शरम वाटत नाही. अशा भ्रष्ट राष्ट्रास वाटेल त्या उपायानी पूर्ण धाकात ठेऊन त्याची नागवणूक करीत राहणें कोणालाही सोपें जातें.

परंतु या दुःस्थितीबद्दल उगीच शोक करीत बसण्यात अर्थ नाही. भाग्याचा चढउतार सर्वांनाच भोगावा लागतो. अवनतीस पोचलेल्या राष्ट्रांना पुनः वैभवकाल प्राप्त झाल्याचे दाखले इतिहासात अनेक सापड-तील. स्वतः आमच्या राष्ट्राच्या इतिहासात असें वर्णन सापडेल. म्हणून आम्ही हताश न होतां, पुनरुत्थानाचा प्रयत्न बलपूर्वक केला पाहिजे. कालमान ओळखून एकमताने व विचारपूर्वक राष्ट्रोद्धाराची तपस्या केल्यास ती केव्हाही वाया जाणार नाही.

आतापर्यंत लोकानी व लोकनायकानी प्रचंड चळवळ करून बराच मार्ग आक्रमिला आहे. आणखी थोडा नेट धरला की प्रभातकाल जवळ येण्यास प्रत्यवाय नाही. इतिहासग्रंथ या कामी केवढें साह्य करूं शकतात, हें आपण पाहिलेच आहे; तेव्हा त्याचे वाचन श्रवण समाजात सर्रास झाल्यास लोकांचें बुद्धिमांद्य लयाला जाऊन त्याची दृष्टि आणखी निवळेल व कसें वागावें व काय करावे याचा त्यास उलगडा पडेल. मात्र यापुढे केवळ आपलेच इतिहास वाचून किंवा अभ्यासून काम भागणार नाही. इतिहासाचे बाबतींत भूतकाली घडलेली घोडचूक निस्तरली तर पाहिजेच, शिवाय कालानुरूप परराष्ट्राचे इतिहास अभ्यासणे हे एक प्रमुख कर्तव्य आहे, हेही आम्ही ध्यानीं घेतलें पाहिजे. अर्वाचीन काळीं जगातील साऱ्या देशांचे संबंध एकमेकाच्या इतके निकट आले आहेत की, तसे पूर्वी कधीच आले नव्हते. याकरिता आपल्याशी संबंध येणाऱ्या राष्ट्रांची व तेथील लोकाची प्रकृति कळण्यास त्यांच्या आजतागायत इतिहासाचा

अभ्यास होणें इष्ट आहे. शिवाय ही गोष्टही लक्षात ठेविली पाहिजे की **स्वराष्ट्राच्या इतिहासाचा खरा उपयोग परराष्ट्राच्या इतिहासाची ओळख करून घेतल्याखेरीज नीट होतच नाही.** स्वामी रामतीर्थांनी एके ठिकाणी म्हटले आहे की, भारतभूमीचें खरें स्वरूप पाहावयाचें असल्यास एकवार परराष्ट्रातून हिंडून या. हीच गोष्ट परराष्ट्रांच्या इतिहासाला लागू आहे.

इतिहासशास्त्राची छाननी करून हिंदुस्थानाच्या प्रकृतिविकृतीचा सूक्ष्म विचार करणारे इतिहासाचार्य राजवाडे एका स्थलीं लिहितातः— "पाठशालांतील व शालातील विद्यार्थी, शेती, उदीम व व्यापार करणारे धंदेवाले आणि इतर सामान्य स्त्रीपुरुष, यांना स्वदेशाच्या व परदेशाच्या इतिहासाचें योग्य ज्ञान झाल्यास राष्ट्रीय हेतु सफल होण्यास फार साह्य होतें. स्वदेश, स्वराज्य, स्वधर्म, स्वभाषा, स्वसंकृति वगैरेचें स्थूल ज्ञान सामान्य जनांना झाल्यास त्यांच्या ठायीं स्वदेशादिकाच्या संबंधानें यथार्थ प्रेम सहज वृद्धिंगत होते आणि स्वसमाजाशीं ताडून पाहता परसमाज कोणत्या बाबतींत समविषम आहेत, हे कमजास्त प्रमाणात स्पष्ट कळूं लागतें." या छोट्या उताऱ्यावरून स्वपरराष्ट्रांचे इतिहास एकसमयावच्छेदेकरून अभ्यासण्यांत काय लाभ आहे ते सहज कळेल. स्वराष्ट्राच्या इतिहासास अन्नाची उपमा दिल्यास परराष्ट्राच्या इतिहासास पाण्याची उपमा चागलीच शोभेल. मनुष्यास अन्नाबरोबर पाणीही लागतेच लागतें. पाण्यावाचून अन्न पचत नाही. परराष्ट्राच्या इतिहासाचा उपयोग या तोडीचा आहे.

सपाट किंवा सखल प्रदेशात वास करणाऱ्या मनुष्यापेक्षा पर्वतशिखरावर असणाऱ्या मनुष्याची दृष्टि विशेष व्यापक होत असते. आपलें घरकुल टाकून बाहेरच्या जगात हिंडून आलेला मनुष्यही असाच व्यापक दृष्टीचा व मोकळया विचाराचा बनतो. आम्हाला यापुढे असेच विशाल मनाचे, व्यापक दृष्टीचे, सखोल बुद्धीचे व उदार विचाराचे झालें पाहिजे. वैयक्तिक अहंता, संकुचित ज्ञातिनिष्ठा, विचाराची लघुता इत्यादि दोष आमच्यांतून शक्य तों नाहीसे झाले पाहिजेत. तरच आमचा तरणोपाय आहे. आणि या सुधारणेला एकच प्रमुख व सर्वांना सुलभ असा उपाय आहे. तो म्हणजे परराष्ट्रांच्या इतिहासाचें पठन, श्रवण, मनन हा होय.

याच उपायाने आमचें राष्ट्रीय अंधत्व नष्ट होईल व आम्हांस दिव्यचक्षु लाभतील. दृष्टि स्वच्छ व सतेज झाल्यावर ध्येय गांठण्यास कितीसा उशीर लागेल ?

या दृष्टीने आम्हांस मनन करण्यासारखे परराष्ट्रांचे इतिहास अनेक आहेत. त्यात **अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें** या राष्ट्राच्या इतिहासाचा प्रामुख्याने समावेश होतो. आज जगाच्या पाठीवर जेवढीं पुढारलेलीं राष्ट्रें आहेत, त्या सर्वांत अमेरिका अग्रगण्य आहे. या राष्ट्राचें नांव माहीत नाही असा मनुष्य निदान शिक्षित लोकामध्यें तरी एकही आढळणार नाही. सर्व महान् राष्ट्रांत अग्रेसर, पूर्ण वैभवसंपन्न, धनधान्याही समृद्ध, विद्या व कलाकौशल्य यांनी अलंकृत, कल्पकतेचें केवळ माहेरघर, यंत्रशास्त्राचें भांडार, थोर व श्रीमान् पुरुषाची खाण, अशा प्रकारची ज्याची कीर्ति साऱ्या जगांत दुमदुमते आहे, त्याचें महत्त्व आणखी काय वर्णावें ? अर्थात् एवढ्या लौकिकास चढलेल्या राष्ट्राचा इतिहास अत्यंत श्रवणीय व मननीय असला पाहिजे हे काय सांगावयास हवें !

या राष्ट्राविषयीं पहिली कौतुकास्पद गोष्ट म्हणजे त्याचें अल्पवय होय. इतर राष्ट्रांच्या मानाने अमेरिका सर्वांत लहान असून ती आज सर्वांचे पुढे आहे व सर्व बुढ्ढीं राष्ट्रें तिच्या कृपाकटाक्षाची अपेक्षा करीत आहेत. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे तिचें बहुरंगी रूप होय. अमेरिकेंत एका संस्कृतीचे, एका मानवकुलाचे किंवा भाषाविशेषाचे लोक मुळींच नाहीत. असें एकत्व कोणत्याच देशांत नसतें म्हणा; पण अमेरिकेइतका संकर इतरत्र खास आढळत नाही. या ठिकाणीं अनेक राष्ट्रीयत्वें, अनेक भाषा, अनेक मानवकुलें, अनेक संस्कृति व अनेक स्वभाव यांचा विलक्षण संकर झालेला आहे. अमेरिकेच्या राज्यकारभारांत ४८ संस्थानें आहेत. तीं एका निशाणाखालीं राहतात पण तीं सारी आपआपल्यापरी अगदी स्वतंत्र आहेत. येथे ६५ राष्ट्रांचे लोक एकत्र झालेले आढळतात व त्यांच्यामध्यें ७३ भाषा व बोली प्रचलित आहेत ! — तात्पर्य, अमेरिका म्हणजे अनेक संकरांचें भव्य प्रदर्शनच आहे. असें असतांही येथे ज्ञातिकलह नाहीत, आपसांत लाथाळी नाही किंवा घरभेदेपणा नाही, हें नवल नव्हे काय ? अमेरिकेने अशी कोणती जादू रचलेली आहे की, जिच्यामुळें तिचा संकर तिच्या उत्कर्षाच्या आड येत नाही ? इति-

हास असें सांगतो की, कांही शतकांपूर्वी हें विलक्षण लोकसत्तात्मक राष्ट्र इंग्लंडच्या स्वामित्वाखाली होतें. पण त्या मगरमिठींतून तें सुटलें आणि पुढें तें उत्कर्षास चढलें. इतकें की, न भूतो न भविष्यति ! हा लोकोत्तर चमत्कारच नव्हे काय ?

म्हणूनच अमेरिकेचा इतिहास वाचण्यासारखा व वाचल्यावर मनन करण्यासारखा आहे. हिंदुस्थान व अमेरिका यांच्यामध्यें भौगोलिक अंतर पुष्कळच आहे. असें असतांही त्यांच्या दैवाच्या नाड्या एका काळीं अशा हालल्या की, एकाचें ( अमेरिकेचें ) स्वातंत्र्य दुसऱ्याच्या ( हिंदुस्थानच्या) मुळावर आलें ! ही खेदकारक अघटितघटना कशी घडली हें समजण्यास अमेरिकेचा इतिहास चाळला पाहिजे. तेव्हा आता वाचकांना विषयाच्या द्वाराशींच थांबवून न धरतां आंत प्रवेश करण्याची सवड देतो.

---

## प्रकरण दुसरें
# शोध लागण्यापूर्वी

पृथ्वीच्या पश्चिम गोलार्धांत दोन महासागराच्या दरम्यान वरपासून खालपर्यंत एक मोठें भूखंड पसरलें आहे. यासच अमेरिका हें नांव प्राप्त झालेले आहे. स्वभावतःच याचे दोन भाग पडलेले दिसतात. वरच्या भागास उत्तर अमेरिका व खालच्यास दक्षिण अमेरिका म्हणतात. वास्तविक या सबंध भूप्रदेशास अमेरिका असें सामान्य नाम असतां, आज जगांत **अमेरिका** ह्मणून जो प्रदेश प्रामुख्याने संबोधिला जातो तो उत्तर अमेरिकेतील मध्यभाग होय. याचें खरें नांव **अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें** असें लांबलचक आहे. पण तें केवळ भूवर्णनांत सांगण्यापुरतें किंवा मानचित्रांत (नकाशांत) दाखविण्यापुरतेंच आहे. त्याच्या लांबलचक नांवाचा संकोच मुळापासून झालेला असून अर्वाचीनकालीं जगात सर्वत्र व सर्वांकडून त्यास 'अमेरिका' हें सुटसुटीत नांव मिळालें आहे. इंग्रजी भाषेंत मात्र बहुशः तें U. S. America या नांवें ओळखलें जातें. आपण आपल्या सोयीकरितां सार्वत्रिक प्रसिद्ध असलेलें अमेरिका हेंच नांव उपयोगांत आणूं.

उत्तर अमेरिकेचा नकाशा पुढे धरल्यास अपला वर्ण्य विषय अगदी डोळ्यासमोर येतो. याच्या उत्तरेस कानडा नांवाचा इंग्लंडच्या ताब्यांत नाममात्रेंकरून असलेला प्रांत, पूर्वेस अटलांटिक महासागर, दक्षिणेस मेक्सिको नांवाचा प्रजासत्ताक देश व पश्चिमेस पॅसिफिक महासागर–अशा याच्या चतुःसीमा आहेत. याचें क्षेत्रफळ अदमासें हिंदुस्थानच्या दुप्पट असून लोकसंख्या मात्र निमपटीहून थोडी कमी आहे. याची निसर्गदत्त साधनसंपत्तीही हिंदुस्थानाप्रमाणे विविध व विपुल आहे. हिमालयाला सहोदर शोभतील असे गिरिराज, गंगासिंधू-सारख्या नद्यांना लाजवितील अशा प्रचंड नद्या आणि विंध्याटवीच्या तोडीचीं गहन अरण्यें या देशाची शोभा वाढवीत आहेत. शेतीबागाय-तीला उपयोगी पडेल अशी सुपीक जमीन सगळीकडे हजारो विघ्यांनी पसरलेली आहे. त्याचप्रमाणें गायरानें अगणित असून उद्भिज्ज व खनिज संपत्ति तर विपुलच आहे. या देशाचे मूळचे रहिवासी रेड इंडियन नावाचे रानटी लोक. पण त्यांना जवळ जवळ नामशेष करून युरोपखंडातील अठरापगड जातींनी तेथे नवी वसाहत केली आहे व आज तेच या भूमीचे एकमात्र स्वामी आहेत. हे आपणास अमेरिकन्स म्हणवितात व या नावाचा त्यांना मोठा अभिमान वाटतो. युरोपीय लोकांप्रमाणेच हे संकरात्मक असले तरी त्यांची गणना आर्यजातीमध्ये केली जाते. अमे-रिकन लोक वर्णाने गौर, नाकीडोळीं सुरेख, हाडापेराने दणकट व निरोगी असे आहेत. स्वभावतः ते आनंदी, उद्योगी व कल्पक असल्याची ख्याति आहे. त्यांच्याइतकें व्यक्तिस्वातंत्र्य इतरत्र आढळत नाही. या साऱ्या गुणसमुच्चयामुळें आजकाल अमेरिका व अमेरिकन लोक पूर्ण उत्कर्षास पोचले असून जगाचे धुरीणत्वही त्यांच्याकडेच गेले आहे. अस्तु.

या विसाव्या शतकात सारें जगच मनुष्याच्या तळहातावर येऊन बसलें असल्यामुळें त्याच्या संबंधींचे भौगोलिक ज्ञान साधारण शिक्षित मनुष्यासही असतें. पण ज्या काळचा इतिहास आपण पाहात आहों, त्या काळची–म्हणजे सुमारें पांचशे वर्षांपूर्वीची–स्थिति आताच्याहून अगदीच भिन्न होती. आज साऱ्या जगावर ज्ञानसूर्याचा प्रकाश पडला असून त्याचा कानाकोपरासुद्धा धुंडाळला गेला आहे. पण पाच शतकां-पूर्वी सारें जग अंधेरांत चाचपडत होतें. त्या काळचें ज्ञात जग म्हणजे

युरोप, आशिया व आफ्रिकेचा थोडासा उत्तर भाग. समीपतेमुळें हीं तीन्ही खडे परस्परास अल्पांशाने ओळखीत होतीं. त्यांच्यामध्ये व्यापारी दळणवळण चाले. लूटमार व हल्ले यांचाही प्रादुर्भाव होत असे. पण या साऱ्या गोष्टी जेवढ्यास तेवढ्या होत. एकमेकांविषयीं निश्चित ज्ञान कोणालाही नव्हतें. आशियाखंडांतील हिंदुस्थान व चीन हे देश संस्कृतीने पुष्कळ प्रौढ व व्यापार आणि वैभव यांनी नामांकित, पण त्यांना बाह्य जगताचें ज्ञान अल्पच. आफ्रिका त्या वेळीं पूर्ण वन्यावस्थेंत होती. राहता राहिलें युरोपखंड. पण आताच्या मानाने तेंही पुष्कळच अज्ञानी व अप्रागतिक स्थितींत होतें. यामुळें भूगोलाचा एकंदर विस्तार केवढा आहे, याची कल्पना फारशी कोणाला नव्हती. युरोपच्या पश्चिमेस पसरलेला अटलांटिक महासागर हा अमर्याद असून त्याच्यापलीकडे जग संपलेलें असावें, फार तर तो भाग अत्यंत अंधकारमय असून भुताखेतांनी व राक्षसांनी व्यापलेला असावा, अशी समजूत तत्कालीन युरोपीय लोकांत प्रचलित होती. या महासागरास Sea of Darkness म्हणत आणि दर्यावर्दीपणांत ते निष्णात असतांही त्याचा किनारा सोडून आंत दूरपर्यंत जाण्यास बिचकत. यामुळें त्याच्या पलीकडे एखादें फार मोठें भूखंड असेल ही कल्पना त्यांच्या मनाला कधीच शिवली नाही.

ज्ञानार्जनाच्या दृष्टीने पाहिले तर इतर कोणत्याही लोकांपेक्षा युरोपियन लोक त्या कालींही पुष्कळ पुढारलेले होते. प्राचीन ग्रीक व रोमन लोकानी संपादन करून ठेविलेल्या अनेकविध शास्त्रांचें, विद्यांचें व कलांचें पुनरुज्जीवन युरोपात त्या कालीं झालें असून त्याचें अध्ययन ते आस्थेने करूं लागले होते. यामुळें त्याचें भौगोलिक ज्ञान थोडेंबहुत वरच्या दर्जाचे व सुसंबद्ध होतें. पाठशालातून हे विषय शिकवले जात व जर्मनी, फ्रान्स, इटाली इत्यादि देशांत कांही नामांकित भूगोलशास्त्रज्ञही विद्यमान असत. असें असताही त्यांचें तें भौगोलिक ज्ञान कांही बाबींत अनिश्चित स्वरूपाचें होतें. अशिया खंडाची त्याना माहिती असतांही त्याची लांबी रुंदी किती आहे; चीन, जपान, किंवा हिंदुस्थान हे देश नक्की कोठे आहेत आणि आफ्रिकेच्या आतल्या भागांत काय आहे, याची त्यांना निश्चित माहिती नव्हती. खुद्द युरोप खंडातील रशियाच्या उत्तर भागाविषयीं ते अज्ञान होते. पृथ्वी गोलाकार व फार विस्तृत आहे,

ही गोष्टही त्यांना अद्यापि समजावयाची होती. तात्पर्य, भूगोलविद्येचा समावेश त्यांच्या ज्ञानार्जनांत होत असताही त्या विद्येंत त्या काळीं फारशी प्रगति झालेली नव्हती. मनुष्यास वस्तुस्थितीचें ज्ञान नसलें म्हणजे तो कांही अनुमानें बांधून काम चालवितो. हीं अनुमानें पुष्कळदा चुकीचीं किंवा अतिशयोक्तिपूर्ण असतात. भूगोलविज्ञानाचे विषयांत तत्कालीन युरोपियन लोकांची अशीच चूकभूल झालेली होती. अर्थात् हा दोष त्यांचा नव्हता तर त्या काळाचा होता. प्रवासाचीं व दळणवळणाचीं साधनें बेताचीं व जुनीं पुराणीं. व्यापारही जेवढ्यास तेवढा आणि सामान्य लोकांच्या महत्त्वाकांक्षाही अगदी मर्यादित. यामुळें भूगोलविद्येची प्रगति होण्यास विशेष मार्ग नव्हता. त्या काळीं मध्ययुरोपाचा सारा व्यापार भूमध्यसमुद्रावरून काळ्या समुद्रापर्यंत चाले. भूमध्यसमुद्राच्या चौफेर त्यांचीं जहाजें फिरत आणि व्यापार किंवा चांचेगिरी यावर आपला गुजारा करीत. भूमध्यसमुद्र हा त्यांना अंगणाप्रमाणें होता. त्याच्या किनाऱ्याने वसलेल्या देशांतील लोक दर्यावर्दीपणात मोठे पटाईत, धीट व साहसी होते. परंतु समुद्रयानांची स्थिति अगदीच शोचनीय होती. त्यामुळें तो प्रवास मोठा धोक्याचा होता. होकायंत्राची माहिती होण्यापूर्वी तर त्याची सारी भिस्त केवळ व्यापारी वारे, आकाशस्थ ज्योति आणि साधारण अनुमान यांच्यावर होती; त्यांत धुकें, वादळें व मेघावडंबर यानी अडथळा केला म्हणजे आहेत तीं साधनेही निरुपयोगी ठरत. अशा स्थितींत समुद्रप्रवास मोठ्या कष्टाचा व अपायकारक वाटे. निष्णात दर्यावर्दीही भरसमुद्रांत घुसण्यास धजत नसत. किनाऱ्याकिनाऱ्याने जहाजें चालवून काम भागवीत. चांचेगिरीवर उदरनिर्वाह करणारे धाडसी बदमाशही एका ठरावीक मर्यादेबाहेर जाण्यास कचरत. मग अमर्याद वाटणाऱ्या अटलांटिक महासागराकडे डोळे उघडून कोण पाहतो! तिकडचें सारें दळणवळणही असेंच किनारा दृष्टीच्या टप्प्यांत ठेवून चालत असे. भूमध्यसमुद्राच्या चतुःसीमा पाहिलेल्या दर्यासारंगासही अटलांटिक महासागराचा अपरंपार विस्तार पाहून भय वाटे. खरोखरच त्या काळच्या त्या लोकांची मनःस्थिति मोठी चमत्कारिक होत असली पाहिजे. मनुष्यप्राणी स्वभावतःच मोठा जिज्ञासु आहे. कोणतीही गोष्ट गूढ म्हटली की, तिचा तो गूढपणा नाहीसा करण्याची प्रबल इच्छा त्यास होतेच व ती त्यास स्वस्थ बसूं देत नाही.

मनुष्यजातीने संपादन केलेल्या साऱ्या ज्ञानविज्ञानाच्या मुळाशीं मनुष्याची ही प्रबल इच्छा आहे. अर्थात् अटलांटिक महासागराचें भयप्रद गौप्य त्यावेळच्या खलाश्यांना मोठें अस्वस्थ करीत असलें पाहिजे आणि हें आपण एकदा उलगडून टाकावें असेंही कित्येकांच्या मनांत येत असेल. पण त्या अज्ञात तिमिरांत उडी टाकायची कोणी!

स्वभावतः साहसप्रिय मूल ज्याप्रमाणे रात्रीचा काळोख पडल्यावर आपल्या घरातील ओटीवरून बाहेर पसरलेल्या अंधाराकडे पाहातें व भयचकित होतें आणि तेथे जावें की न जावें, गेलें तर काय होईल, त्या अंधेरांत काय गंमत असेल, इत्यादि विचारांत पडतें, त्याचप्रमाणें त्या काळच्या दर्यावर्दी लोकांची मनःस्थिति होत असावी. किनाऱ्या-किनाऱ्याने जहाजें नेत असता ते भयचकित दृष्टीने त्या अनंत जलाशया-कडे पाहात असतील आणि उत्सुकता व संशय, भीति व खेद, अशा विकारांत सापडून गोंधळून जात असतील. त्याच्यापैकी कोणाकोणाला आधूनमधून किनारा सोडून पुढे घुसण्याची इच्छाही होत असेल व त्या उत्साहाचे भरात तो मर्यादा सोडून दहापांच पावलें पुढे सरकतही असेल. पण बरोबरीच्या सहचराचा नेभळटपणा किंवा त्याची स्वतःचीच भया-कुलता त्यास माघार घेण्यास भाग पाडीत असेल. कोणी सांगावें! एवढें खरें, की इसवी सनाच्या पंधराव्या शतकाच्या अंतापर्यंत अटलांटिक महासागराचें गौप्य कोणासही फोडतां आलें नाही. परंतु त्या कालीं युरोपवर असाच एक प्रसंग आला, की त्याला ही कोंडी फोडणें आव-श्यकच होऊन बसलें. तो प्रकार असाः—

बहुश्रुत वाचकांना हें ऐकून माहीत असेल, की इसवी सनाच्या अकराव्या बाराव्या शतकात युरोपांतील खिस्तधर्मीय राष्ट्रें व आशियां-तील महंमदधर्मीय राष्ट्रें यांच्यामध्यें मोठमोठीं धर्मयुद्धें झालीं. या दीर्घ-कालीन युद्धपरंपरेंत कधी खिस्तधर्मीयांना तर कधी महंमदधर्मीयांना विजय मिळत गेले. पण शेवटीं खरा जय झाला महंमदधर्मीयांचा. त्यांनी खिस्त्यांचें मूळ धर्मस्थान जें जरूशलेम नगर तें आपल्या स्वामि-त्वाखाली आणलें व त्याच्या भोवतालचा पालस्टाईन देशही पादाक्रांत केला. एवढ्यावरच त्यांची विजिगीषा थांबली नाही. त्यांनी युरोपांत प्रवेश केला आणि त्यावेळचें खिस्तधर्माचें पीठ कान्स्टांटिनोपल नगर

हस्तगत करून तेथे आपलें अर्धचंद्रांकित निशाण फडकविलें ! युरोपांत एक नवीनच मुसलमानी राष्ट्र–तुर्कांचें राज्य–निर्माण झालें. त्याबरोबर भोवतालचीं चर्चें मशिदींत रूपांतर पावलीं आणि बायबलच्या ऐवजी कुराणाची घोषणा ऐकूं येऊं लागली ! युरोपच्या प्रतिष्ठेला हा फारच मोठा धक्का बसला. पण शूरवीर व बुद्धिमान अशा अरबतुर्कादि महंमदधर्मीयांपुढे युरोपियनांचा निभाव लागला नाही. वास्तविक त्या झपाट्यांत मुसलमानांचा अर्धा चांद युरोपच्या पश्चिम टोकापर्यंत सरकत गेला असता. परंतु जर्मनीच्या मॅगझलीन नामक पराक्रमी नृपतीने आपल्या भोवतालच्या इतर राजाच्या साहाय्याने ही लाट जेथल्या तेथेच थोपवून धरली आणि तुर्कांना पुढे सरकूं दिलें नाही. हें ठीक झालें. पण तुर्कांनी युरोपाचें पूर्वद्वार रोकून धरलें तें धरलेंच.

युरोपांतील लोकांना ही अप्रतिष्ठा अत्यंत मानहानिकारक वाटली तरी तिच्यामुळेंच त्यांच्या भावी उत्कर्षाचें बीज पेरलें गेलें, यांत शंका नाही. तुर्कांनी त्यांस रणांगणावर पराजित करून त्यांच्या घरांत आपले बिऱ्हाड नेऊन ठेविलें खरें; परंतु त्याबरोबरच त्यानी त्यांना एक नवीन दृष्टिही दिली.

अरब व तुर्क या जाती आडदांड व कडव्या म्हणून प्रसिद्ध आहेत. परंतु मध्ययुगांत ते लोकही मोठे विद्याव्यासंगी, शोधक व जिज्ञासु होते. त्यांच्या संघटनाने युरोपांतील लोकांना कितीतरी नवें ज्ञान मिळालें. हा त्यांच्यावर मुसलमानांचा फारच मोठा उपकार झाला. त्यांचे त्यांचें वैमनस्य असलें तरी युरोपने त्यांच्यापासून मिळणारें ज्ञान आत्मसात् केलें. त्यांच्या जुन्या ज्ञानभांडारांत नव्याची भर पडली. नव्या शोधाच्या व कल्पनांच्या योगाने जुन्या वेडगळ समजुतींना धक्का बसला आणि युरोपीय समाज एका नव्या दृष्टीने स्वत:कडे व जगाकडे पाहूं लागला. त्यावेळीं त्यांना आणखी एक गोष्ट उमगून आली. ती म्हणजे अरबतुर्कांचा व्यापार होय. त्याकालीं ते लोक पूर्वेकडील देशांशीं मोठ्या प्रमाणावर व्यापार करीत व अगणित द्रव्य संपादन करीत. पुरातन काळापासून युरोपचा हिंदुस्थान वगैरे पूर्वेकडील देशाशीं व्यापार ज्या प्रदेशांमधून चालत असे ते सीरिया, इराण इत्यादि प्रदेश मुसलमानांच्या ताब्यांत गेल्यामुळें तेथील वाटा इतरांना बंद झाल्या व अरब व्यापाऱ्यांची खाशी

चैन झाली. त्याचप्रमाणे हिंदुस्थानावर स्वाऱ्या करूनही ते अपरंपार द्रव्य लुटून आणतात असाही त्याचा लौकिक होता. या दोन्ही गोष्टी युरोपांतील लोकांच्या फारच डोळ्यावर येऊं लागल्या. आपल्या छातीवर पाय देऊन उभ्या राहिलेल्या या गनिमांचा जर व्यापार हस्तगत करता येईल तर काय बहार होईल, हा लोभ त्याच्या मनांत प्रामुख्याने उभा राहिला. अर्थात् तो सिद्धीस नेण्याकरिता त्यांचे प्रत्यक्ष व प्रच्छन्न असे प्रयत्न सुरू झाले. पूर्वेकडील वाट बंद झाल्यामुळें हिंदुस्थानाकडे जाण्यास पश्चिमेकडून समुद्रांतून मार्ग शोधून काढण्यासाठी त्याची धडपड सुरू झाली. अटलांटिक महासागराचें गौप्य फुटण्यास ही वस्तुस्थिति विशेष कारणीभूत झाली.

त्या कालीं युरोपात अनेक लहान मोठीं राज्यें होती. त्या सर्वात पश्चिम युरोपामध्यें दोन सत्ता विशेष प्रबल झालेल्या होत्या. एक पोर्तुगालची व दुसरी स्पेनची. हे दोन्ही देश राजसत्तेखाली होते. त्याचीं मोठमोठीं सैन्यें व आरमारें होतीं आणि दोघांचीही पुढे जाण्याची अहमहमिका सुरू होती. अर्थात् हिंदुस्थानाशीं व पूर्वेकडील इतर देशांशी होणारा विपुलफलदायी व्यापार आपल्या हातीं आणण्याबद्दल त्याचेही प्रयत्न सुरू झाले. त्यात पोर्तुगालचें राजघराणें भूगोलविद्येचे व समुद्रप्रवासाचें मोठें भोक्तें होतें. त्याने नामांकित दर्यासारंगांना आश्रय देऊन त्यांच्याकरवीं आफ्रिका खंडाला वळसा घालून हिंदुस्थानाकडे जाण्याचा नवा जलमार्ग शोधून काढण्याचा उपक्रम मोठ्या सावधानतेने आरंभिला. त्या कालाचे मानाने हें धाडस अपूर्व होतें यांत शंका नाही, पण तें त्या राजसत्तेने चिकाटीने हातीं धरलें.

या त्यांच्या प्रयत्नास आणखीही एक प्रबल कारण होतें आणि तेंही पण व्यापारविषयकच होतें. आशिया देशाशीं घडणारा युरोपचा व्यापार काळ्या समुद्रापलीकडे अरबांच्या हातांत असला तरी खुद्द युरोपच्या अंतर्भागांत होणाऱ्या व्यापाराचीं सूत्रें इटालीच्या स्वाधीन होतीं. त्या कालीं इटालीच्या पूर्व पश्चिम बगलांत व्हेनिस व जिनोआ हीं दोन प्रसिद्ध बंदरे होतीं. अरब कारवानांच्या तर्फे येणारा सारा बहुमोल माल प्रथमत: या दोन बंदरात उतरे आणि नंतर तेथून तो साऱ्या युरोपभर पसरे. या स्वामित्वामुळें व्हेनिस व जिनोआ हीं नगरें मोठीं वैभवसंपन्न

व दिमाखखोर झालीं. होतीं. तेव्हा त्यांच्यामार्फत होणारा व्यापारही आपल्या हातीं यावा अशी पोर्तुगाल व स्पेन या दोनही देशांची फार दिवसांची इच्छा होती. ही सफल होण्यास स्वतंत्र मार्ग वहिवाटीला मिळण्याची आवश्यकता होती. म्हणून पोर्तुगीज राजसत्तेने आफ्रिका खंडाला वळसा घालून जाण्याची मोहीम प्रतिवर्षी नव्या दमाने चालू ठेविली. त्यांत त्यांना कितपत यश मिळालें हें आपण यथावकाश पाहूं. वरील हकीगतीवरून वाचकांना एवढें समजून आलें असेल की, युरोपियन राष्ट्रांना अटलांटिक महासागराचा अडसर बाजूला सारावा अशी अनिवार इच्छा तुर्कांच्या संगतीने झाली. असो.

मनुष्यास काय किंवा राष्ट्रास काय एखादें संकट उपस्थित झालें व त्यांतून मुक्त होण्याचा ध्यास त्यास लागला म्हणजे मार्ग सुचतो. युरोपचें असेंच झालें. त्याच्या पूर्वद्वारांत तुर्कांनी कायमचा मुक्काम केल्यामुळें व त्यांचा शह उठवणें अशक्य होऊन बसल्यामुळें त्याची दृष्टि पश्चिम दिशेकडून मार्ग काढण्याकडे वळली. शेवटीं इ. स. १४९२ सालीं एका महापुरुषाने तो शोधून काढिलाही. हा महापुरुष म्हणजे कोलंबस होय.

ज्या भूमीला पुढे अमेरिका हें नांव प्राप्त झालें, ती शोधून काढण्याचा व अटलांटिक महासागराचें गौप्य उकलून दाखविण्याचा पहिला मान कोलंबसालाच आहे ही गोष्ट आता अगदी निर्विवादपणें सिद्ध झालेली आहे. परंतु ज्यावेळीं ही गोष्ट प्रत्यक्ष घडली त्यावेळीं व पुढेही कांही काल हें महायश कोलंबसाला तितक्या प्रसन्नतेने कोणीच दिलें नाही. या नव्या भूमीचा शोध लावून आल्यावर पहिल्यापहिल्यादा कोलंबसाचा मोठा जयजयकार झाला असतांही युरोप त्याला लौकरच विसरलें आणि या भूमीचें नामकरण भलत्याच्याच नांवाने झालें. हा दैवदुर्विलास खेदकारक खराच, पण तो घडला ! यामुळेंच कोलंबसाचें चरित्र साग्र असें सध्या उपलब्ध होत नाही. जगाचा हा स्वभावच आहे. कोणत्याही थोर व्यक्तीची, ती ह्यात असेपर्यंत, बहुश: उपेक्षा करावयाची आणि ती गत झाल्यानंतर तिचे पोवाडे गात सुटावयाचें ! मग तिचें चरित्र शोधूं लागावयाचें व तिच्या स्मारकाची धामधूम करावयाची ! कोलंबसाची उपेक्षा अशीच झाली. पांच शतकांपूर्वी त्याने गाजविलेल्या अतुल

पराक्रमाचें स्मारक आज अमेरिकेंत दर्शनीय स्वरूपांत होऊं पाहातें आहे. वेस्ट इंडीज बेटात ज्या स्थानीं ( सान साल्वाडोर येथे ) कोलंबसाच्यीं जहाजें पहिल्यांदा लागलीं, तेथे एक दीपस्तंभ उभारण्याचें कार्य नुकतेंच सुरू झालें आहे. असो.

कोलंबसाचा अटलांटिक महासागर ओलांडून पलीकडील भूमि शोधून काढण्याचा पराक्रम इतका अश्रुतपूर्व व मनाला चकित करणारा होता, की त्या कालीं त्याच्या वार्तेने सारा युरोप हादरून गेला ! अगोदर ती गोष्ट कोणाला खरीच वाटेना आणि ती सत्य असल्याचे पुरावे पुढे आल्यावर तिचें थोर यश ओढाताणींत सापडलें. जो तो या शोधाचें जनकत्व आपल्या देशाला आहे असें प्रतिपादूं लागला आणि तसे दाखले पुढे आणूं लागला. मनुष्यस्वभावच तसा आहे. दुसऱ्याचें यश लुबाडणें, आपलें यश उगाच फुगवणें, अपयश दुसऱ्याच्या माथी मारणे आणि आपला कमीपणा झाकून ठेवणें, इत्यादि गोष्टी त्यास स्वभावत:च प्रिय असतात. कोणताही क्रांतिकारक शोध, लोकोपकारक तत्त्वज्ञान, किंवा मनमोहक कल्पना लोकापुढे आली, की तिच्यापासून लाभणाऱ्या यशाबद्दल मनुष्यामनुष्यांत किंवा राष्ट्राराष्ट्रांत रस्सीखेच सुरू होते. रामायणासारखें सुंदर काव्य, गीतेसारखें शांतिप्रद तत्त्वज्ञान, ताजमहालासारखें नयनमनोहर वास्तुकाम, वेरूळच्या लेण्यासारखे अप्रतिम शिल्प, यांचें यश हिंदवासीयाना देण्यास युरोपियन मनुष्य सहसा तयार होत नाही. कसला तरी व कोठला तरी बादरायण संबंध जोडून वरील प्रशंसनीय विषयांत युरोपच्या बुद्धिमत्तेचा हात आहे असेंच तो या नाही त्या पर्यायाने सुचवितो. हाच मासला युरोपांत निराळ्या प्रकारें आढळतो. मुद्रणकलेंत मूळ कल्पना कोणाची ? दुर्बिणीचा मूळ कल्पक कोण ? वाफेंत शक्ति आहे हें प्रथमत: कोणी जाणलें ? गुरुत्वाकर्षणाचा शोध कोणाचा ? शेक्सपियरचीं नाटकें मुळांत त्याचींच की बेकनचीं ? असे एक ना दोन अनेक विषय वादाचे होऊन बसले आहेत. वास्तविक या जगात सर्वस्वीं नवीन असें काय आहे ?—कांहीच नाही. आदिकालापासून चालू घडीपर्यंत मानवजातीस लाभलेल्या ज्ञानाचीच गोष्ट घ्या. ते कोणा तरी एकाच राष्ट्राला किंवा मनुष्याला स्फुरलेलें नाही. सृष्टींतील प्रत्येक वस्तूला एक अनंत परंपरा आहे; त्याचप्रमाणें मनुष्यजातीची सुधारणाही परंपराजनित

आहे. तींत अखिल मानव जातीची बुद्धि, प्रयत्नवाद, आशानिराशा व सफलताविफलता खर्ची पडलेली आहे. म्हणून या जागतिक संपत्तीवर सर्व मनुष्यमात्राची सत्ता आहे. सर्वसामान्यँकरून मागील पिढीचा बरावाईट अनुभव पुढील पिढीच्या उपयोगीं पडतो. भूतकालांतील एवढ्याशा ज्ञानकणावरून वर्तमानकालीं एखाद्यास एखादी विशेष गोष्ट स्फुरते व त्या दोहोंच्या संमिश्रणाने एक नवीन ज्ञान जगांत प्रकट होते. मग पुढच्या पिढींत आणखी एखादा ज्ञाता प्रकट होतो व त्यात नवीन भर टाकतो. याच रीतीने, कोलंबसाने लाविलेला शोध हा त्याच्या खडतर तपस्येचें प्रत्यक्ष फल असले तरी त्यालाही एक परंपरा होती व तिच्या साह्यानेच त्यास आपला हेतु सिद्धीस नेतां आला. मागे सांगितलेंच आहे, की त्या शतकांतील युरोपियन लोकांचे भौगोलिक ज्ञान तुटपुंजें असलें व समुद्रप्रवासाचीं साधनें कनिष्ठ प्रतीचीं असलीं तरी कित्येक प्रसंगीं वादळात सापडून काही जहाजे अटलांटिकमध्यें पुष्कळ दूरवर लोटलीं जात. पुढे त्या संकटांतून जे लोक दैवाने सुखरूप परत येत, ते सांगत की, पलीकडे कोठेतरी जमीन असावी. कॅनरी व आझोर बेटें त्या काळीं ज्ञात झालीं ती अशा प्रकारानेच. युरोपच्या पश्चिमेस, महासागरांत 'अटलांटिस' नावाचें एक मोठें द्वीप आहे अशी कल्पना तिकडे फार प्राचीन काळापासून प्रचलित होती. ग्रीक तत्त्वज्ञानी प्लेटो याच्या ग्रथांतही या कल्पनेचा उल्लेख आढळतो. याशिवाय युरोपच्या प्राचीन वाङ्मयांतून व कथापुराणांतून अज्ञात भूप्रदेशांचे उल्लेख असत व ते मनुष्यजातीला केव्हा तरी लाभतील असें भविष्यही वर्तविलेलें असे. यामुळे कोलंबसाने शोध लाविलेला भूभाग तो हाच असला पाहिजे, असें जो तो म्हणूं लागला आणि असा शोध अमक्या कालापूर्वी आमच्यांतील अमक्या पुरुषाने पूर्वीच लाविला असें प्रतिपादूं लागला. नार्वे, स्वीडन, हॉलंड, आइसलंड इत्यादि सर्व देशानी दुसऱ्याच्या पुराव्यापेक्षा आपला पुरावा प्राचीन कालात ढकलून कोलंबसाच्या यशाला कमीपणा दिला. आता ऐतिहासिक संशोधनाचें साह्य घेऊन अमेरिकेच्या शोधाची पूर्व-पीठिकाच शोधावयाची म्हटलें तर आपल्यास वेदकालापर्यंत जाऊन भिडतां येईल. मध्यअमेरिकेंत जें प्राचीन-वस्तु-संशोधन चाललें आहे त्यावरून असें स्पष्ट दिसते की, खिस्तीशकापूर्वीच या भूमीच्या अस्तित्वाचें

ज्ञान हिंदुलोकांना होतें. इतकेंच नव्हे तर त्यांनी तेथे जाऊन वसाहतीही केल्या होत्या. बौद्धधर्मीय भिक्षु आपल्या धर्माच्या प्रसारार्थ भारतवर्षाची सीमा सोडून फार दूरवर जात हें इतिहासप्रसिद्धच आहे. त्यानीच उत्तर आशियांतून बेहरिंग सामुद्रधुनींतून अमेरिकेंतही प्रवेश केल्याचें सिद्ध होऊं पाहात आहे. कारण, बुद्धधर्माचे तसे काही अवशेष व द्रविड संस्कृतीचें काही शिल्प तेथे उपलब्ध झालें आहे. अमेरिकेंत मय नांवाची एक सुसंस्कृत मानव जात होऊन गेली. ती तेथे कशी आली हें अद्याप समजलें नाही. तिनें बांधिलेली देवळें व राजप्रासाद द्रविडी बांधकामाशीं फारच मिळते जुळते आहेत, असें संशोधकाना आढळून आलें आहे. तात्पर्य, अमेरिकेच्या मूळ शोधकाचे मालिकेंत हिंदुजातीलाही मान मिळ-ण्यास हरकत नाही !

परंतु असले ऐतिहासिक पुरावे कितीही सबल असले आणि त्यांच्या बलावर अमेरिकेच्या शोधाचें जनकत्व या राष्ट्राकडून त्या राष्ट्राकडे येत जात असलें तरी पंधराव्या शतकाच्या शेवटी कोलंबसाने जो शोध लाविला, त्याचें महत्व अणुमात्रही कमी मानता येत नाही. कोलंबसाच्या दीर्घकालीन परिश्रमाने व तपस्येनेच अमेरिकेचें अस्तित्व प्रत्यक्ष सिद्ध होऊन जगजाहीर झाले आणि त्यानंतरच तो देश युरोपच्या व पुढे सबंध जगाच्या उपयोगी पडूं लागला, ही गोष्ट निर्विवाद होय. मग कोलंबसापूर्वी त्या देशाचें ज्ञान कोणाही व्यक्तीस व राष्ट्रास परंपरेने माहीत झालेलें किंवा सहज स्फुरलेलें असो, त्याचे मूल्य कौतुक करण्यापलीकडे फारसें मानतां येत नाही. असो.

कोणाही व्यक्तीला आपल्या उद्दिष्टपूर्तीकरितां प्राणावर उदार होऊनच झगडावें लागतें. निंदा उपहास, अनास्था, देशत्याग, उपवास, वनवास व बंदिवास या साऱ्या दु:खभोगातून त्यास जावेंच लागतें. कोलंबसाला हीं सारीं दिव्यें करावीं लागलीं. दुसरा एखादा कमी धीराचा मनुष्य असता तर तो या खडतर तपस्येला टिकलाच नसता. या दृष्टीने कोलंबसाचें चरित्र वाचनीय व मननीय आहे. वाचकानी ते समग्र अन्यत्र कोठे वाचावें. या पुस्तकांत त्याचा निर्देश फक्त कामापुरताच करणार आहों.

———

*

# प्रकरण तिसरें

## कोलंबसाचा अद्भुत शोध

या शोधासंबंधीं एक गोष्ट प्रामुख्याने ध्यानांत ठेविली पाहिजे. कोलंबसाने अटलांटिक महासागर ओलांडून जाण्याचा जो खटाटोप केला व त्यात जी धडाडी दाखविली, ती त्या कालाकडे लक्ष दिल्यास अत्यंत अद्भुत—मानवी सामर्थ्याच्या पलीकडची—होती यात शंका नाही. पण त्याचें तें सारें कृत्य अमेरिकेचा शोध लावावयाचा या हेतूने नव्हतें. त्या विस्तीर्ण महासागरापलीकडे एक फार मोठें भूखंड आहे व तें आपण शोधून काढणार अशी काही त्याची प्रतिज्ञा नव्हती. कारण, तसें ज्ञान त्यास नव्हतें. त्याचा हेतु अगदीच भिन्न होता आणि तो तडीला नेण्याकरितां त्याने स्वप्राणावर उदार होऊन झगडा केला. त्यास त्यांत यशही मिळालें. मात्र तें त्याच्या उद्देशाहून अगदी भिन्न. त्याच्या कल्पनेत नसलेले. त्याच्या अपेक्षेपलीकडचे. नवल असे की, ही गोष्ट—आपण एका नव्याच भूमीचा शोध लाविला ही वस्तुस्थिति—त्यासही मरेपर्यंत उमगली नाही. हा चमत्कारिक योगायोग कसा घडला, कोलंबसाची खरी इच्छा कोणती होती, हें पाहावयाचें झाल्यास आपणास त्या थोर पुरुषाच्या चरित्रकथेकडे वळलें पाहिजे, म्हणून आता तिकडेच वळूं.

कोलंबस हा इटाली देशाचा नागरिक. प्रख्यात व्यापारी बंदर जिनोआ ही त्याची जन्मभूमि. येथे त्याचा जन्म इ. स. १४३५-३६ च्या सुमारास झाला. त्याचें कुटुंब साधारण गरीब पण संभावित होतें. त्याच्या मातापित्यास तो पहिलाच मुलगा असल्यामुळें त्याची शरीरप्रकृति सुदर, सुदृढ व निरोगी होती. त्याचा बाप मोठा शहाणा व भला मनुष्य होता. त्याने आपल्या मुलास चांगलें वळण लागेल, तो धर्मनिष्ठ व पापभीरु होईल आणि त्यास योग्य तितकें शिक्षण मिळेल याविषयीं चांगली दक्षता घेतली. यामुळें कोलंबसाचें बालपण मोठ्या शिस्तींत गेलें. बालपणापासूनच त्यास भूगोलविद्येचा, जलपर्यटनाचा व भिन्न भिन्न देश पाहाण्याचा विशेष नाद आहे असें त्याच्या पित्याच्या निदर्शनास आलें. तेव्हा त्याने कोलंबसास त्याच्या आवडीनुरूप शिक्षण दिलें आणि त्यास प्रोत्साहित केलें. त्या काली जिनोआनगर साऱ्या युरोपमध्यें प्रसिद्ध असें मोठें

व्यापारी बंदर होतें. त्यामुळे तेथे भिन्न भिन्न देशांचीं हजारो जहाजें येऊन लागत आणि व्यापारी मालाची मोठ्या प्रमाणावर उलाढाल होई. त्याचप्रमाणें लहानमोठे खलाशी, तांडेल व नाविकलोक, नामांकित व्यापारी, जलस्थलप्रवासी व अडत्ये यांचा भरणा तेथे सदैव असे. आपल्या जन्मभूमीवर घडणाऱ्या या हालचालींपैकी अनेक कोलंबसाच्या पाहण्यात किंवा ऐकण्यांत येत. त्यांचे त्यास भारी कौतुक वाटे. आपण मोठे व्यापारी व्हावें, आपलीं जहाजें असावीं, दूरदूरदेशीं आपण व्यापारास जावें आणि त्याच्या जोरावर विपुल धन मिळवून श्रीमान व्हावे असें मनोराज्य त्याच्या बालमनांत येऊं लागले. परिणाम असा झाला की, आपण खलाशी केव्हा एकदा होतों असें त्यास होऊन गेले. त्याची उत्कंठा फारच बळावली. तो ताब्यात राहणें अशक्यच आहे असे त्याच्या पित्यासही वाटलें. शेवटीं वयाच्या पंधरासोळाव्या वर्षीच कोलंबसाने विद्याभ्यास सोडला व तो एकदम खलाशी बनला. त्याच्या नातेवाइकांत कोलंबो नावाचा एक नाविक होता. त्याचीं स्वतःचीं चार पाच जहाजे होती आणि त्याच्या हाताखाली निढावलेले असे पाचपन्नास खलाशी होते. बाह्यतः हे लोक व्यापारी मालाची ने आण करीत पण यांचा खरा धंदा चाचेगिरीचा होता. भूमध्यसमुद्राच्या विस्तीर्ण जलांगणावर रात्रीं अपरात्री भटकावे आणि सापडेल तेथे लूटमार करावी, असा त्याचा शिरस्ता होता. अर्थात् अशा लोकांची सामाजिक योग्यता किंवा नीतिमत्ता काय प्रतीची असेल हे न सांगताच कळण्यासारखें आहे. कोलंबस कोवळ्या वयात या अशा खलसंगतींत येऊन पडला. समुद्रप्रवास स्वभावतःच कष्टाचा, कंटाळवाणा व धोक्याचा. त्यांत ज्याची माणुसकी समुद्रतळीं गेली आहे अशा चोरादरोडेखोरांशीं नित्याचा प्रसंग, बुद्धि अपरिपक्व आणि वय अल्प. असें असताही कोलंबसास दुर्गुणाची बाधा झाली नाही, हें नवल होय. जगाचें एक महान कृत्य त्याचे हातून पार पडावयाचे होते म्हणून म्हणा किंवा बालपणीं त्यास चांगलें वळण लागलें होते म्हणून म्हणा, त्याने आपल्या परिस्थितीपासून निर्माण होणारा लाभ तेवढा उचलला. जन्मतःच तो सुदृढ व निरोगी असल्यामुळें नव्या परिस्थितींत तो सहज टिकला व आणखी कणखर बनला. स्वभावाने तो श्रद्धाळू, ईश्वरनिष्ठ, जिज्ञासु व अभ्यासू होता. दुष्टसंगतींत येऊनही त्याचा तोच मनोधर्म कायम राहिला. त्याने

शाळा सोडली असली तरी विद्याव्यासंग सोडला नव्हता. त्यामुळें त्याचा फावला वेळ वाचनांत, खलाशी लोकांचे प्रवासवृत्तान्त ऐकण्यांत किंवा भावी मनोराज्यें करण्यांतच जाऊं लागला. असो.

अल्पवयांतच खलाशीपेशा पत्करून घर सोडल्यानंतर कोलंबसाने आपल्या वयाच्या पस्तिसाव्या वर्षापर्यंत भटकंती केली. विपुल धन मिळविण्याची त्याची इच्छा असली तरी ती केव्हाच सफल झाली नाही आणि त्यानेही पण वयांत आल्यानंतर देखील त्या विफलतेची क्षिति बाळगिली नाही. तो शेवटपर्यंत निर्धनच राहिला. कष्टतर जीवनक्रमामुळें त्याचें शरीर मात्र खूपच राकट बनलें. त्याने अनेक बंदरें, द्वीपे, देश व नगरें पाहिलीं. भूमध्यसमुद्र त्याने घरच्या अंगणाप्रमाणें वापरला. अटलांटिक महासागरांत शिरून एकदा त्याने 'आईसलंड'पर्यंत फेरी मारली. तरीपण त्याची समुद्रप्रवासाची हौस तृप्त झाली नाही. घरून निघाल्यावेळीं त्याचें जें बालमनोराज्य होतें त्याचेंही रूपांतर झाले. आता त्याच्या डोक्यात काही निराळेच विचार घोळूं लागले. समुद्रात भटकत असताही त्याने युरोपांतील नामांकित खगोलज्ञ व भूगोलवेत्ते याच्याशीं पत्ररूपाने स्नेहसंबंध जोडला व तो कायम ठेवला. त्याने आपलीं अनुमानें व कल्पना त्या लोकांना कळविल्या व त्यांच्या आपण ऐकून घेतल्या. या देवघेवीने त्याची बुद्धिमत्ता व कल्पकता मोठी तीव्र झाली आणि तिच्या बळावर तो स्वतःस कोणतें महत्कृत्य करिता येईल तें शोधूं लागला. दीर्घ प्रवासामुळे व भिन्न भिन्न व्यक्तींच्या सहवासाने त्याच्या पुस्तकी ज्ञानावर नवा प्रकाश पडला होता. त्यांत त्याने आपल्या जन्मभूमीकडे व धर्माकडे पाहिलें. त्याने त्याच्या हिताहिताचा विचार आरंभिला आणि त्याचें काळीज चर्र झालें. आपल्या प्राणप्रिय ख्रिस्तीधर्माचें मूलपीठ जेरूशलेम तुर्कांच्या–विधर्मीयांच्या–ताब्यांत आहे आणि ते दुष्ट लोक युरोपच्या दारातच येऊन बसल्यामुळे आपल्या जन्मभूमीच्या व्यापारास मोठा धक्का बसला आहे, या दोन विषयत् गोष्टी त्याच्या ध्यानीं येतांच त्यास अत्यंत खेद वाटला. तो तुर्कांचा पुरा द्वेष्टा बनला व वाटेल ते करून त्याना युरोपातून व पालस्टाईनमधून हाकून दिलें पाहिजे असें त्याच्या मनाने घेतलें.

पण हें दुर्घट कार्य करावयाचें कसें ? तुर्कांना हाकून देण्याचा विश्वप्रयत्न युरोपांतील ख्रिस्ती राजेरजवाड्यानी अनेकदा व अनेक वर्षे

केल्याचा इतिहास त्यास पूर्ण अवगत होता. आणि त्यांत युरोपखंड विफलमनोरथ झाल्याचेंही तो जाणून होता. तरीपण पुन्हा तसा प्रयत्न झाला पाहिजे असें त्यास वाटूं लागलें. अशी वेडी आशा वाटण्याचें त्याच्या मनाला एक सबळ कारण मिळालें होतें. त्यानें प्रवासवृत्तान्ताचे जे ग्रंथ वाचले होते, त्यात मार्को पोलो नामक प्रवाशाच्या ग्रंथानें त्याच्या मनावर विलक्षण प्रभाव गाजवला होता. मार्को पोलो हा त्याच्याच देशाचा–इटालीचा–रहिवासी. इ.स. १२५६ ते १३३२ या कालात तो होऊन गेला. यानें आशियाच्या पूर्व टोकापर्यंत प्रवास केला होता आणि चीन व हिंदुस्थान देश आपातत: पाहिले होते. आशिया खंडाच्या पूर्वेस जपान नावाचें एक स्वतंत्र बेट असल्याची वार्ता यानेच पहिल्यादा युरोपला करून दिली होती. चीनच्या राजदरबारीं तो काही वर्षें नोकरही होता. तेथून इटालीस परत आल्यावर त्यानें आपला प्रवासवृत्तान्त लिहून काढून प्रसिद्ध केला. त्यात त्यानें पूर्वेकडील देशांचें इत्थंभूत वर्णन केलें. हिंदुस्थान देश केवढा वैभवसंपन्न आहे, चीन देश किती विस्तृत आहे, तेथील राजे रजवाडे किती श्रीमंत व सुखलोलुप आहेत आणि सगळीकडे सोनें, नाणें, रत्नें, मोतीं कशी ठेचून भरलीं आहेत, व्यापार कसा भरभराटींत आहे आणि एकंदर लोक कसे साधेभोळे आहेत, इत्यादि गोष्टींचें मोठें सविस्तर व सुरस वर्णन पोलोच्या या ग्रंथांत आहे. युरोपच्या लोकांना त्या वेळीं तो ग्रंथ फार विलक्षण वाटला व त्यानी पोलो हा एक थापाड्या प्रवासी आहे असें मानलें. कारण ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत शिकंदर बादशहानें काय ती हिंदुस्थानापर्यंत मजल मारिली होती. त्यावेळीं युरोपास पूर्वेकडील थोडासा भूगोल कळला होता. त्यानंतर अप्रत्यक्ष व्यापारी दळणवळण चालू असलें तरी इतर संबंध अगदीच तुटले होते. पोलोच्या काळापर्यंत हा खंड पडल्यामुळे त्याची माहिती लोकांना अश्रुतपूर्व व असत्य वाटली. पण पुढे पुढे पोलोचा ग्रंथ पंडितमान्य झाला.

कोलंबसानें या ग्रंथाचीं अनेक पारायणें केलीं आणि पोलोस आपला गुरु मानिलें. पोलोप्रमाणेंच आपणही एखादा मोठा प्रवास करून–विशेषत: चीन हिंदुस्थानाकडेच जाऊन–लौकिक मिळविला पाहिजे असें त्याच्या मनानें घेतलें. आता ही कल्पना त्याच्या मनात केव्हा स्फुरली

असावी हें नक्की सांगतां येत नाही. साधारणपणे पंचविशीच्या ऐन आमदानींतच त्यास ती सुचली असावी. तुर्कांना युरोपांतून हाकलून देण्याची त्याची इच्छा पोलोच्या प्रवासवृत्तान्ताने विशेष चेतली ! ख्रिस्ताचे धर्मप्रचारक म्हणून आपण चीन हिंदुस्थानादि देशात जावयाचें, तेथील राजांना व लोकांना ख्रिस्तधर्मी बनवून त्यांच्यामध्ये धर्माभिमान जागृत करावयाचा आणि त्यांच्या साह्याने तुर्कटाचे पेकाट मोडावयाचें अशी कोलंबसाची विचारसरणी होती ! हा आपला विचार कितपत सयुक्तिक किंवा सफल होण्यासारखा आहे याचा त्याने विशेष विचार केलाच नाही. पूर्वेकडील लोकांचा धर्म रानटी असला पाहिजे व त्याना ख्रिस्तपंथ तेव्हाच प्रिय होईल असा त्यास विश्वास होता. असो.

पोलोप्रमाणेच पूर्वदेशाची सफर मारण्याचें मनाशी निश्चित केल्यानंतर कोलंबस मार्गाचा विचार करूं लागला. त्यास भूगोलाची माहिती बऱ्यापैकी होती. पोलोच्या ग्रंथाधारें त्याने काही नकाशेही तयार केले होते. तो स्वभावतः खलाशी असल्यामुळें पूर्वेकडे जाण्याचे खुष्कीचे मार्ग त्यास पसंत नव्हते; आणि पसंत असून तरी उपयोग काय ? मध्ये तुर्कांची अडचण होतीच. तेव्हा हिंदुस्थानास जाण्याचा एखादा स्वतंत्र मार्ग शोधून काढला पाहिजे. अर्थात् तो समुद्रातूनच कोठून तरी सापडणार, असें त्यास वाटूं लागलें आणि याच दृष्टीने तो त्याचे चिंतन करूं लागला. याच सुमारास त्यास पोर्तुगीज लोकांच्या आफ्रिकेला वळसा घालून हिंदुस्थानास जाण्याचा मार्ग शोधण्याच्या मोहिमाची कुणकुण कळली. ती ऐकताच त्यास आणखी स्फुरण चढलें. रात्रंदिवस मग तो त्याच नादाला लागला. उपजीविकेपुरता खलाशीपणा करून बाकीचा सारा वेळ त्याने भूगोलविद्येच्या चिंतनांत घालविण्यास प्रारंभ केला.

त्या काळीं युरोपातील बहुश: सारे लोक पृथ्वी सपाट आहे असे मानीत. कांही कांही भूगोलवेत्त्याना व खगोलशास्त्रज्ञांना ती गोलाकार असली पाहिजे असें वाटत होतें. पण तें सत्य बोलून दाखविण्याची सोय नव्हती. कारण, लोक अगदी धर्मभोळे असून बायबल, धर्मगुरु पोप आणि राजे याची त्याच्यावर विलक्षण छाप होती. ज्याअर्थी पृथ्वीच्या गोलत्वाला बायबलांत आधार नव्हता, त्याअर्थी ती गोल नसलीच पाहिजे असा सार्वत्रिक समज होता. पृथ्वी सूर्याभोवतीं व

आपल्या भोवती फिरते आहे व ती गोलाकार आहे इत्यादि मते पाखंडी मानलीं जात व तीं जो कोणी बोलेल, शिकवील किंवा त्याची तरफदारी करील त्यास शासन होत होतें. इतकेंच नव्हे, तर एका पोपने, पृथ्वी फिरत असली तरी तिने फिरतां कामा नये, असेंही फर्मान काढले होते म्हणतात. पण अशा अंधकारमय स्थितीतही ज्याना ज्ञान स्फुरलें होतें, ते मनांतून पृथ्वीचा गोलाकार मान्य करून होते. अशापैकीच कोलंबस हाही एक होता. तो पूर्ण धार्मिक व श्रद्धाळू असतांही या एका बाबतींत तो नवमतवादी होता. अनुभवाने व अनुमानाने पृथ्वी गोल आहे हें निश्चित झाल्यानंतर त्याने स्वमनाने पृथ्वीचा एक नकाशा तयार केला आणि त्याचे अध्ययन आरंभिलें. त्या वेळीं त्यास एक विलक्षण कल्पना स्फुरली. ज्याअर्थी पृथ्वी गोल आहे त्याअर्थी आशियाखंडाचे पूर्व टोक वळसा घेऊन अटलांटिक महासागराच्या पलीकडे वर कोठे तरी आले असलें पाहिजे. मग जर आपण पश्चिम दिशेचा रोख धरून जहाजें हाकारलीं तर काही कालाने आपण आशियाखंडाच्या पूर्वकिनाऱ्यावर म्हणजे हिंदुस्थानच्या काठाला, कोठेतरी जाऊन पोचणार नाही काय ?– आणि हा मार्ग आफ्रिकाखंडाला वळसा घालून जाण्यापेक्षाही जवळचा व सुलभ असणार नाही काय ?–हे प्रश्न त्याने स्वतःला केले आणि त्याचें अस्तिपक्षीं उत्तर मिळविलें. पृथ्वीचा विस्तार आपण अटकळ बांधतों त्यापेक्षा मोठा असेल ही शंका त्यास कधीच आली नाही. आणि ती आली नाही म्हणूनच बरें झालें. आशियाचें पूर्व टोक जें हिंदुस्थान ते अटलांटिकच्या पलीकडे कोठेतरी जवळच आहे असें त्यास वाटलें म्हणूनच त्यास तो महासागर तरून जाण्याचे धैर्य प्राप्त झाले. तात्पर्य, अटलांटिकमध्यें शिरून पश्चिमेच्या रोखाने हिंदुस्थानाकडे येण्याचाच कोलंबसाचा हेतु होता आणि त्याकरितांच त्याने सारी धडपड केली.

हिंदुस्थानास जाण्याचा मार्ग निश्चित झाल्यानंतर त्या सफरीची सारी तयारी त्याने लिहून काढिली. समुद्रप्रवासाचे नकाशे आखले, जहाजें किती घ्यावयाचीं, खलाशी किती लागतील, अन्नपाणी किती लागेल, या सर्व गोष्टींचें अंदाजपत्रक त्याने तयार केले. कागदी व्यवस्थेंत कसलेंही न्यून राहूं नये म्हणून त्याने तिच्यावर फार फार विचार केला आणि तिला पूर्णत्व दिले. त्याचा आत्मविश्वास वाढला व आपली योजना

प्रत्यक्षांत आणण्याच्या खटपटीस तो मनोभावें लागला. आपण योजिलेली सफर अभूतपूर्व आहे याची त्यास जाणीव होती तथापि ती अशक्य आहे असें मात्र त्यास कदापि वाटेना. पण ती अमलात आणावयाची कशी, हा मोठा प्रश्न होता. तो स्वत: आतापर्यंत निर्धनच होता. त्याचे स्नेहीमंडळही त्याच्याचसारखें! हें कार्य कोणी तरी राजामहाराजानेच हातीं घ्यावयास हवें होतें. त्या काळीं त्याची जन्मभूमि जिनोआ हे एक लहानसें पण स्वतंत्र संस्थान होतें. तेथील राजानेच आपणास आश्रय देऊन स्वदेश व स्वधर्म यांच्या संवर्धनार्थ आपली योजना सिद्धीस नेण्यास झटावें अशी कोलबसाची इच्छा होती. म्हणून त्याने प्रथमत: तशी खटपट केली. परंतु त्यास यश आले नाही. तेव्हा त्याची दृष्टि पोर्तुगालकडे वळली. तेथील राजा दर्यावर्दी लोकाचा चाहता आहे, तेव्हा तिकडेच आपण जावें असा विचार करून तो इ. स. १४७४ च्या सुमारास लिस्बन नगरास आला. पण कोलंबस सर्वस्वीं उपरा मनुष्य असल्यामुळें त्याची त्या दरबारीं मुळींच दाद लागेना. तो वर्षानुवर्ष त्या राजधानींत राहिला आणि राजाश्रय मिळविण्याची त्याने शिकस्त केली. पण फल शून्य. या वेळीं त्यास एक निराळाच लाभ मात्र झाला. तो म्हणजे त्याचा विवाह होय. पेरेस्ट्रेलो नांवाच्या एका प्रसिद्ध दर्यावर्दी मनुष्याची विधवा पत्नी आपल्या उपवर मुलीसह त्या नगरांत राहात होती. त्या मुलीचे कोलंबसावर प्रेम बसलें, तिच्या आईने त्यास मान्यता दिली व कोलबस घरजावई झाला. त्याच्या निराशाकालात त्यास हा मोठा आधार मिळाला. त्याने आपलें जीवनोद्दिष्ट आपल्या पत्नीस व सासूस समजावून दिलें. त्याना तें तात्काल पटलें. दोघींनी त्यास मनापासून प्रोत्साहन दिले. तो स्वत: मोठा आनंदी, शांत, चतुर व प्रेमळ मनाचा असल्यामुळें व त्याची पत्नीही त्यास अनुकूल अशीच मिळाल्यामुळे त्याचा संसार मोठा सुखाचा झाला. एका प्रसिद्ध दर्यावर्द्याचा जावई या नात्याने त्यास प्रतिष्ठा मिळाली व तो स्वत: अत्यंत बहुश्रुत व तज्ज्ञ नाविक असल्यामुळें तिकडूनही त्याचा चागला नांवलौकिक झाला. त्या वेळीं तो नाविक लोकाना लागणारे नकाशे तयार करून देण्याचा व्यवसाय करी आणि आपला व आपल्या कुटुंबाचा चरितार्थ चालवी.

हें सर्व ठीक होतें; परंतु ज्या हेतूकरिता तो रात्रंदिवस तळमळत होता, तो सिद्धीला जाण्याचें सुचिह्न मात्र कांहीच दिसेना. सुमारें दहा वर्षें त्याने या स्थितींत काढलीं. एवढ्या अवधींत त्यास एक मुलगाही झाला. पुढे त्याचें दुर्दैव ओढवलें. त्याची सासू व पत्नी दोघीही वारल्या. तेव्हा त्यास लिस्बन नगरीचा वीट आला. त्याने पोर्तुगाल सोडला व त्याचा प्रतिस्पर्धी स्पेन देश गाठला. या वेळीं तेथील गादीवर राजा फर्डिनंड व त्याची पत्नी इसाबेला हें जोडपें जोडीने राज्य करीत होतें. फर्डिनंड विद्याभिलाषी व गुणग्राहक होता आणि राणी इसाबेला धार्मिक व दयाळू अंत:करणाची होती. परंतु असें आनुकूल्य असतांही तेथे कोलंबसास थारा मिळाला नाही. तेथील दरबारचे पंडित मोठे अहंमन्य व कूपमंडूक वृत्तीचे होते. त्यांनी कोलंबसाची योजना अगदी हास्यास्पद व अशक्य ठरवून त्याचा उपहास केला आणि त्यास धुडकावून लाविलें. राजा फर्डिनंड आपल्या इतर राजकारणांत व्यग्र असल्यामुळें व राणी फारशी स्वतंत्र नसल्यामुळें कोलंबसाची दाद कोणीच घेतली नाही. तेव्हा तो निराश होऊन इंग्लंड, फ्रान्स, हालंड या देशाच्या दरबारींही गेला. परंतु काही उपयोग झाला नाही. जिकडे तिकडे नकार, उपहास आणि कुचेष्टा त्याच्या वाट्याला आली. पुन्हा तो पोर्तुगालकडे वळला. कारण येथेच त्याचा जिव्हाळयाचा संबंध होता व त्याच्यावर लोभ करणारी अनेक मंडळीही होती. तेव्हा त्यांच्या साहाय्याने पुन्हा एकवार प्रयत्न करून पाहावा या इराद्याने तो परत आला.

पण या सुमारास पोर्तुगालच्या दर्यावर्दी मोहिमेत एक महत्त्वाची गोष्ट घडली होती. डायाज नावाच्या एका धाडसी नाविकाने आफ्रिका खंडाचे अगदी खालचें टोक गाठलें होते. मागे सांगितलेच आहे की, त्या लोकांच्या या मोहिमा एकामागून एक सुरू होत्या व दरवेळी ते पुढे पुढे सरकत होते. डायाजने शेवटचें टोक गाठले. पण तेथे भयंकर वादळ झाल्यामुळें तो परत फिरला. दरबारीं आल्यावर त्याने आपला वृत्तान्त राजास कथन केला आणि आपल्या सफरीचे नकाशेही दाखविले. त्यांत त्याने आफ्रिकेच्या खालच्या टोकास Cape of Storm (वादळी भूशिर) असें नांव दिलें होतें. पण राजास तें भयप्रद नाव रुचलें नाही. ज्या हेतूने आपण आफ्रिकेचे येरझारे चालू ठेविले आहेत, तो आता लौकरच

सफल होण्याची दृढतर आशा त्यास वाटूं लागली आणि म्हणून त्याने डायाजने दिलेलें नांव खोडून त्याचे जागीं Cape of Good Hope ( सुखाशेचें भूशिर ) असें वैभवसूचक नाव दिलें. अर्थात् या यशामुळें कोलंबसाची योजना अंमलांत आणण्याची त्यास आवश्यकता वाटली नाही. आपल्या राष्ट्राच्या नाविकानी आटोक्यांत आणिलेले यश कोण सोडील ?— शिवाय त्याच्या दरबारी लोकाना कोलंबसाची योजना मूर्खपणाचीच वाटत होती. तरीपण त्या राजाने कोलंबसाशीं एक खोटे-पणा केलाच. त्याची योजना ऐकण्याचे सोंग करून राजाने त्याने तयार केलेले नकाशे मागून घेतले आणि त्याचे आधारें आपलेंच एक पथक त्या मोहिमेवर गुपचुप पाठविण्याचें ठरविलें. आशाबद्ध कोलंबस फसला ! त्याने आपले कागद राजाच्या स्वाधीन केले. पण राजाने त्या मोहिमेवर पाठविलेले लोक भाडोत्री असल्यामुळे व त्याना त्या गोष्टीची मुळींच आस्था नसल्यामुळें ते लौकरच परत आले. अट-लांटिक अमर्याद आहे व कोलंबस हा पुरा भामटा आहे, त्याच्या नादीं लागण्यांत अर्थ नाही, असा त्यानी राजास सल्ला दिला व कोलंबसास शेवटचा नकार मिळाला ! त्याचे कागदपत्र परत मिळाले हें त्याचें भाग्य !

कोलंबसाची आता मात्र पूर्ण निराशा झाली. त्याची पन्नाशी उलटून गेल्यामुळें तिकडूनही तो कमकुवत होत चालला होता. ध्येयाच्या मागे लागल्यामुळे धन त्यास मिळालें नाही व दुर्दैवाने त्याचें संसारसौ-ख्यही अबाधित ठेविले नाही. अशा विपन्न स्थितीमध्यें त्याचीं आणखी दोनचार वर्षें गेलीं. या कालात त्याची स्थिति एखाद्या भिकाऱ्यापेक्षाही वाईट झाली. पोटात अन्न नाही, अंगावर धड कपडा नाही आणि कोठेही आधार नाही. चिंतेने शरीर व मन खंगून गेलें, मुद्रा जराग्रस्त झाली आणि केस पांढरे झाले. आपलें ध्येय सिद्धीस न जातांच आपण मरणार काय ?—या शंकेने त्यास मतावून सोडलें. अशा स्थितींत तो दैव नेईल तिकडे हिंडत असता, एकदा एका समंजस मठपतीची व त्याची गाठ पडली. तो मठपति आपल्या वृत्त्यनुरूप मोटा कनवाळू होता. कोलंबसाची एकंदर स्थिति पाहून त्यास त्याची करुणा आली. त्याने मोठ्या सहानु-भूतीने त्याची पूसतपास केली. आर्त मनाचा कोलंबस त्या स्नेहार्द्रतेने गहि-वरून गेला व त्याने आपली सारी जीवनकथा व ध्येय त्या महंतास सम-

जावून दिले. तें ऐकून त्यास सखेदाश्चर्य वाटलें. त्याचें स्पेनच्या राजदरबारी मोठे वजन होते. कोलंबसाची योजना त्यास सयुक्तिक वाटली आणि अशा ज्ञानी, महत्त्वाकांक्षी, कष्टाळू व ध्येयप्रवण मनुष्यास राजा फर्डिनंडने विन्मुख करावें हे बरें नाही असें त्याच्या मनाने घेतले. मी तुझें सर्व साह्य करितों असें त्याने कोलंबसास आश्वासन दिलें आणि त्याप्रमाणें पत्रें देऊन त्याने कोलंबसास पुन्हा स्पेनच्या राजाकडे पाठविलें. या प्रसादाने कोलंबसाचें भाग्य पालटले. राजा फर्डिनंड व राणी इसाबेला या दोघानी त्याची प्रत्यक्ष गाठ घेऊन त्याचें म्हणणें ऐकून घेतलें आणि त्याच्या सफरीस मान्यता दिली ! राजाश्रय मिळाल्यावर साधनसामग्री जुळण्यास वेळ लागला नाही. तीन साधारण बऱ्यापैकी जहाजें, एकशेवीस माणसे आणि त्याना दोन तीन महिने पुरेल इतकें अन्नपाणी कोलंबसाच्या स्वाधीन करण्यात आले. सारी जमवाजमव नीट झाल्यावर सफरीच्या आदले दिवशी सर्वांनी चर्चमध्यें जमून मनोभावें देवाची प्रार्थना केली आणि दुसरे दिवशी, म्हणजे ता० ३ आगष्ट १४९२ शुक्रवार रोजीं, कोलंबसाने आपल्या अद्भुत सफरीस प्रारभ केला !

अटलांटिक महासागरांत घुसून थेट पश्चिमेचा रोख धरून गेल्यास आपणास हिंदुस्थानचा किनारा फार लौकर सापडला पाहिजे अशी कोलंबसाची खात्री होती आणि हा आपला मार्ग इतर कोणत्याही मार्गापेक्षा जवळचा पडेल असेंही त्याच्या मनाने घेतलें होतें.

त्यांच्या सफरीचा पहिला महिना साधारणपणें बरा गेला. पण वर अकाश व खाली व भोवतालीं अथांग समुद्र अशा भयप्रद व आश्चर्योत्पादक अवकाशांत त्यांचीं जहाजें गेल्यावर कोलंबसाच्या बरोबरीच्या लोकाचा धीर सुटत चालला. या असल्या सफरीला जाण्याची आवड त्यांपैकी फार थोड्या लोकाना होती. केवळ राजाज्ञेमुळेंच ते या फंदांत पडले होते. परंतु आता त्यांना त्या गोष्टीचा पश्चात्ताप होऊं लागला आणि आपण या भामट्याच्या नादीं उगीच लागलों असें त्यांस वाटूं लागलें. जों जों दिवस लोटूं लागले आणि किनारा दिसण्याची आशा वाटेना तों तों त्या लोकाची समजूत काढणे, त्यांना सांभाळून घेणे व धीर देणें कोलंबसास जड जाऊं लागलें. पण तो मोठ्या खंबीर मनाचा, धीट, हिकमती व समयज्ञ असल्यामुळें त्याने कोणाची मात्रा

चालू दिली नाही. आपणास यश येणार अशी त्याची बालंबाल खात्री होती. त्याने प्रत्यहीं मनोभावें देवाची प्रार्थना करावी आणि करुणा भाकावी. प्रवासाचें वृत्त टिपून ठेवावें आणि जमिनीच्या आशेने पश्चिमेकडे तोंड करून रात्रीच्या रात्री जागून काढाव्या.—असा त्याचा नित्यक्रम होता. शेवटी देवाने त्याच्यावर कृपा केली. जमिनीवर आढळणारीं पांखरें त्यांना दिसलीं व झाडाच्या ताज्या फांद्याही आढळल्या; शेवटीं बरोबर दोन महिने नऊ दिवसांनी — ता. १२ आक्टोबर १४९२— त्यांस एका नव्या भूमीचा सुंदर किनारा दिसला. जमीन! जमीन !! अशा हर्षकल्लोळांत सर्वांची निराशा बुडून गेली.

त्या प्रभातकाळींच त्यानी आपलीं जहाजे किनाऱ्यास लावलीं. कोलंबसाने राजप्रतिनिधीला शोभेल असा पोषाख केला. आणि हातीं स्पेनचें निशाण घेऊन तो त्या जमिनीवर उतरला. मागून बाकीचे लोक उतरले. सर्वांनी जमिनीचें चुंबन घेऊन तिचे अभिवादन केलें आणि नंतर सर्वांनी मिळून दयानिधि परमेश्वराची प्रार्थना केली. इष्टप्राप्तीमुळें कोलंबसाचें हृदय भरून आलें व त्याच्या नेत्रांतून आनंदाचे अश्रु ओघळूं लागले. आता त्याच्या सागातीच्या लोकाना तो अवतारी पुरुष वाटूं लागला.

प्रार्थना आटोपल्यावर कोलंबसाने स्पेनचा झगझगीत राष्ट्रध्वज राजाराणीच्या जयजयकारांत त्या भूमीवर फडकविला आणि तिला San Salvador—तारकभूमि—असें नवें नांव दिलें! अमेरिकेच्या पूर्वभागास असलेल्या 'वेस्ट इंडीज' बेटांपैकी 'बाहामा' नांवाच्या द्वीपसमूहातील कोणत्या तरी एका बेटाच्या किनाऱ्यास कोलंबसाचीं जहाजें लागलीं होतीं. परंतु त्यास त्याच्या अटकळीप्रमाणें तो हिंदुस्थानचाच किनारा आहे असें वाटलें आणि त्या अनुमानानुरूप त्यांनी तेथील एकंदर देखाव्याकडे पाहिलें. नवेपणामुळें त्यांना ती भूमि मोठी मनोहर वाटली. त्या वेळीं तेथील ऋतुमानही आरोग्यप्रद होतें. हिरव्यागार कुरणाने जमीन फुलून गेली होती. मोठमोठे छायादार वृक्ष, नानाप्रकारचीं फुलझाडें व लतावेली यांनी तेथे मोठी शोभा उभी केली होती. मधून मधून स्वच्छ व मधुर जलाचे प्रवाह धावत होते आणि तऱ्हेतऱ्हेच्या पशुपक्ष्यानी तेथील भूमि व्यापिली होती. नग्नावस्थेंत हिंडणारीं मनुष्येंही तेथे होतीं पण तीं निरुपद्रवी असल्यामुळे व त्यांना या गोऱ्या लोकांचें कौतुक वाटल्या-

मुळे त्यांचेकडून कोलंबसाच्या काफिल्यास कसलाच त्रास झाला नाही. उलट यांचा व त्यांचा स्नेहच जडला. कोलंबसाने त्या लोकांना 'इंडियन' असें नांव दिलें.

या स्थानीं कोलंबस जवळ जवळ तीन महिने राहिला. नंतर तो या नव्या भूमींतील चमत्कारिक वस्तु, पशुपक्षी, व चार माणसें घेऊन परत फिरला. आपण शेवटीं यशस्वी झालों हें दाखविण्याची त्यास घाई असल्यामुळें त्याने हिंदुस्थानास येण्याचा प्रमुख हेतु पुढील सफरीवर ढकलला. इ. स. १४९३ च्या मेमध्यें तो परत युरोपच्या किनाऱ्यास लागला. त्याचें यश अद्भुत असल्यामुळें स्पेनच्या राजाराणीने खास दरबार भरवून त्याचें स्वागत केले आणि त्याच्यावर बहुमानाचा नुस्ता वर्षाव केला! साऱ्या राजधानीभर लोकांनी मोठा समारोह करून त्याच्या नावाचा जयजयकार आरंभिला आणि त्याचे ध्वनि-प्रतिध्वनि युरोपखडभर उमटले! यावेळीं कोलंबसाच्या सुदैवाची चरम सीमा झाली! पूर्वी ज्यांनी त्याची टवाळी केली होती, तेच आता त्याचे स्तुतिपाठक बनले; ज्यांनी त्यास अवमानिलें होते ते त्याच्यापुढे नम्रमस्तक झाले; ज्या दर्यासारंगांनी त्यास भामट्या म्हणून संबोधिलें होतें तेच त्यास महाप्रतापी म्हणून वर्णू लागले आणि ज्यांनी आपल्या लवमात्र ज्ञानबलावर त्यास तुच्छ केलें होते तेच त्याचे शिष्य बनले! अल्पकालात त्याच्या कीर्तीने युरोपखंडाच्या चतुःसीमा पाहिल्या. त्याच्या प्रवासावर पोवाडे रचले गेले आणि तीं गीते पोराबाळांच्या तोंडात घोळूं लागलीं. अशा या अभूतपूर्व यशातच कोलंबसाची अवतारसमाप्ती व्हावयास पाहिजे होती. परंतु तसें झालें नाही. त्याच्या महान यशांतूनच अपयश उद्भवलें आणि त्याचा शेवट विपरीत झाला. त्याच्या दैवदुर्विलासाची ही खेदकारक काहाणी येथे थोडक्यातच सांगून टाकणें इष्ट होईल.

कोलंबसाने आपल्या अनुमानानुरूप हिंदुस्थान शोधून काढला होता! हेतु हाच की, तेथील व्यापार हस्तगत करावा, तेथील लोक खिस्ताच्या कळपांत आणावे आणि तेथील राजेरजवाड्यांचे अमूप वैभव लुटावें. स्पेनच्या राजाने त्यास आश्रय दिला तो याच लोभाने. पण पुढे तसा अनुभव मिळाला नाही. पहिल्या सफरीच्या विजयांत या मुख्य

गोष्टीकडे सर्वांचा कानाडोळा झाला होता. खुद्द कोलंबसही दिमाखातच होता. पण पुढे त्याच्या व त्याच्यामुळे स्पेनच्या राजाच्या वाट्यास निराशा आली !

पहिल्या सफरीनंतर त्याने इ. स. १४९३ मध्यें दुसरी, इ. स. १४९८ मध्ये तिसरी आणि इ. स. १५०२ मध्ये चवथी, अशा सफरी केल्या. य़ा प्रत्येक वेळी त्याने नवे नवे भाग शोधले आणि त्यात तो दक्षिण अमेरिकेच्या भूभागावरही जाऊन आला. पण ज्या धनाच्या आशेने व लोभाने त्याने एवढी खटपट केली ते त्याला थोडेही लाभले नाही. उलट त्याच्याबरोबर जाणाऱ्या लोकांचे विलक्षण हाल झाले आणि काही तर मृत्युही पावले! झाले. या साऱ्या अपयशाचे खापर कोलंबसाच्या माथीं फुटलें. त्याचा थोडाही अपराध नसतां तो मूर्ख व थापाड्या ठरला. त्याच्यावर अनेक आरोप आले व त्यास कारागृह पाहावें लागले. पुढे राजाने त्याचा पूर्वकाल आठवून त्यास बंधमुक्त केलें; परंतु इतर कोणत्याही प्रकारे त्याचा परामर्श घेतला नाही. राजाश्रय सुटला. त्याबरोबर सर्वांकडून त्याची अवहेलना झाली! शेवटीं इ. स. १५०६ साली तो कुठेतरी व केव्हातरी भिकाऱ्याच्या मरणाने या नश्वर जगांतून नाहीसा झाला! अल्पकालातच लोक त्यास अजीबात विसरून गेले आणि नवी भूमि शोधून काढण्याचे यश दुसऱ्यासच मिळाले. हा भाग्यवंत 'अमेरिगो वेसपुसी' हा होय. हाही एक इटालियन दर्यावर्दी असून स्पेनच्या आरमारी खात्यांत नोकरीस होता. कोलंबसाचाही तो स्नेही होता असें म्हणतात. याने इ. स. १४९९ मध्यें म्हणजे कोलबसाने तिसरी सफर काढली त्याच्या पुढच्या वर्षी आपली एक स्वतंत्र सफर काढली. कोलंबसाने तयार केलेल्या नकाशाबरहुकूमच त्याने ही मोहीम केली आणि दक्षिण अमेरिकेंत घुसून काही नवे भाग शोधिले. नंतर तिकडून परत आल्यावर त्याने आपल्या प्रवासाचा एक भपकेदार ग्रंथ तयार केला. कोलंबसाने किंवा त्याच्या साथीदारापैकी कोणी इतरानी असा प्रयत्न न केल्यामुळें अमेरिगोच्या त्या ग्रंथास निष्कारण महत्त्व मिळालें. कोलंबसाचें अपयश पसरण्यास व अमेरिगोचा ग्रंथ पंडितमान्य होण्यास एकच गाठ पडली ! परिणाम असा झाला की, लोक मुख्य शोधकास विसरले आणि अमेरिगोस वानूं लागले. आणि

याच धांदलींत एका जर्मन भूगोलपंडिताने, "ज्याअर्थी अमेरिगोने ही नवी भूमि जगास ज्ञात करून दिली, त्याअर्थी त्याचे नाव या भूमीस देऊन त्याचा सत्कार करावा," असा प्रस्ताव केला. जगानेही तो मुकाट्याने मानिला आणि वस्तुतः कोलंबसाने प्रथम पदस्पर्श केलेली भूमि 'अमेरिका' म्हणून दुसऱ्याच्या नांवें जगजाहीर झाली! खुद्द अमेरिगो वेसपुर्सीला सुद्धा ही गोष्ट कळली नाही असे म्हणतात. कोणी म्हणतात तो मोठा दगलबाज होता; त्याने जाणून बुजून कोलंबसाच्या यशाचा अपहार केला. खरें काही असो. आज तें संबंध भूखंड अमेरिका या नांवाखाली आहे. योगायोगच तसा विलक्षण होता, याखेरीज यासंबंधाने दुसरें काय म्हणणार?

---

## प्रकरण चवथें

# शोधाचे पुढील परिणाम

युरोपचे पश्चिमेकडील अटलांटिकचे महाद्वार आता सताड उघडे झाले. स्पेनच्या राजाराणीकरिता कोलंबसाने भयप्रद वाटणाऱ्या महासागरातूनच हिंदुस्थानास जाण्याचा एक नवा व जवळचा मार्ग शोधून काढिला. इतकेच नव्हे तर मोठ्या धडाडीने त्या दूरस्थ भूमीपर्यंत जाऊन तेथे स्पेनचा झेंडाही फडकावला, या वार्तेचा युरोपच्या प्रकृतीवर विलक्षणच परिणाम झाला! भूकंपाचा प्रचंड धक्का बसलेल्या भागात जशी भयंकर उलथापालथ होते, तसेंच युरोपचे झालें. राज्यलोभी राजेरजवाडे, साहसप्रिय नाविक लोक, धनलोभी उद्यमी व व्यापारी, लूटमार करण्यात आनंद मानणारे ठग व चाचे आणि मृगजळामागे धावणारी सामान्य जनता—या सर्वांच्या भिन्न भिन्न मनोरथांना नवीन चालना मिळाली. कोणतेही सबळ कारण नसता, जो तो आता आपले भाग्य फळफळणार या गोड विचारात रंगून गेला आणि मनोराज्यातील भव्य प्रासाद उठवूं लागला!

कांही कालापूर्वी बहुतेक सर्व राजानी व धनिक व्यापाऱ्यानी कोलंबसाची योजना अप्रयोजक ठरवून त्यास कोल्रून लाविले होतें,

परंतु त्याचें यश सिद्ध होतांच सर्वांचे बाहु स्फुरण पावूं लागले. पोर्तुगालच्या राजाची तर मोठीच निराशा झाली. आपण मारे खटाटोप करून **आशेचें भूशिर** गाठलें. पण आपण अशा अर्ध्या मार्गातच आहोंत न आहोंत तोंच ज्याला आपण भामटा म्हणून धुडकावून लाविलें, तोच हा बेटा कोलंबस थेट हिंदुस्थानाचा पल्ला मारून आला; आणि तोही कोणाच्या साह्याने तर आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या. या फसगतीला काय म्हणावें ! आता उद्या स्पेनने हिंदुस्थानाशीं धूमधडाक्याने व्यापार सुरू केला आणि मग आपल्या दर्यासारंगांनी आफ्रिकेला वळसा घालून हिंदुस्थानास जाण्याचे हजार मार्ग शोधून काढिले तरी त्याचा काय उपयोग ? जो सर्वांआधी तोच मोठा स्वार्थ साधी. तात्पर्य, स्पेनची पोळी पिकणार आणि त्या गुर्मीत तो आपणावर सतत गुरगुरत राहणार ! इत्यादि विचारानी पोर्तुगालच्या राजास फारच हळहळ वाटली ! तो आपल्या साऱ्या नाविक लोकांवर रागावला व त्याने त्याची मोठी निर्भर्त्सना केली. परंतु त्याचा तो राग अल्पकालातच वास्कोडिगामा नांवाच्या दर्यासारंगाने घालविला. इ. स. १४९८ सालीं त्याने आफ्रिकेला वळसा घालून हिंदुस्थानचा किनारा गाठला व झामोरिन राजाची भेट घेतली.

याच सालीं इंग्लंडच्या राजाकरिताही एका धाडसी खलाश्याने एक नवी सफर नव्या मार्गाने काढली. याचें नांव जॉन कॅबट. हा एक इटालियनच होता व तो व्यापारी या नात्याने ब्रिस्टोल शहरीं राहात असे. त्यास जेव्हा कोलंबसाचा पराक्रम कळला तेव्हा त्यालाही वीरश्री चढली. इंग्लंडचा राजा सातवा हेनरी याजकडून कॅबट यास काहीच मदत मिळाली नाही. तथापि तेवढ्यावरून निरुत्साह न होतां एक जहाज, स्वतःचा तरुण मुलगा व वीस मनुष्यें एवढ्या सामग्रीसह त्याने कूच केलें. त्याने आपला मार्ग बराच उत्तरेकडून आखल्यामुळें त्याचें जहाज 'लॅब्राडोर' नांवाच्या भूभागाला जाऊन लागलें. कानडा प्रांताच्या पूर्वकिनाऱ्यावर हा प्रदेश आहे. कॅबटची अशी अटकळ होती की, इंग्लंडच्या समांतरच हा भाग असल्यामुळे तेथील हवामान इंग्लंडप्रमाणें असेल. पण ही त्याची कल्पना चुकीची ठरली. त्यावेळी तेथे कडक थंडी पडली असून सारा प्रदेश अगदी रुक्ष व भयाण होता. ती स्थिति पाहून त्या काफि-

त्याची मोठी निराशा झाली. कॅबटने त्या भूमीवर इंग्लंडचें निशाण लाविलें आणि उलट पावलीं तो परत फिरला.

इंग्लंडकरितां हा प्रयत्न सुरू असतां फ्रान्सही गप्प बसला नव्हता. त्याच्या नाविकांनी सफर काढून 'न्यू फाऊंड लँड' नांवाचीं बेटें शोधून काढलीं. तेथे मच्छीमारीच्या धंद्यास फार मोठा अवसर होता. तो त्यानी तात्काळ आरंभिला. हालंड, बेलजम, डेनमार्क, नार्वे-स्वीडन, इत्यादि राष्ट्रांनीही असेच प्रयत्न आरंभिले. तात्पर्य, कोलंबसाने एकदा पायंडा पाडतांच युरोपांतील सर्व लहान मोठ्या देशानी त्या कार्यांत अहमहमिकेने भाग घेतला. अटलांटिकवर जोराची ये जा सुरू झाली. इकडे आफ्रिकेला वळसा घालून जाण्याच्या सफरीही जोरांत सुरू झाल्या. अशा प्रकारें तुर्कांच्या आगमनाने उत्पन्न झालेली अडचण सफा नष्ट झाली. कोलंबसाच्या हयातींतच हें सारे स्थित्यतर घडून आलें. पण त्याच्या दुर्दैवाने त्यास गोता दिल्यामुळें तो मागे पडला तो पडला! असो.

कोलंबस, वेसपुसी किंवा कॅबट यांनी शोधून काढलेले प्रदेश हा हिंदुस्थानचा किंवा आशियाखंडाचा किनारा असला पाहिजे, ही भ्रामक समजूत मात्र अजून नष्ट झाली नव्हती. या भ्रमाचा अगदी पहिला परिणाम म्हणजे पोर्टुगाल व स्पेन या दोन प्रमुख राजसत्तांचें भांडण होय. हे दोन्ही देश त्यावेळीं प्रबळ व अग्रेसर होते. यामुळें त्याच्यामध्यें सर्वच बाबतींत मोठी चुरस होती. कोणत्याही एवढ्याशा कारणाने त्यांच्यामध्यें धुसफूस सुरू होई. कोलंबस व डी गामा यांनी संशोधन केलेल्या नव्या लाभाबद्दलही असाच वाद उपस्थित झाला. दोघांचेंही सैन्य व आरमार तुल्यबल. दोन्ही पक्षाचे खलाशी धाडसी, महत्वाकांक्षी व कलहप्रिय. यामुळें नव्या मार्गाने जावयाचें कोणी, हिंदुस्थानचा व्यापार लुबाडावयाचा कोणी, आणि तेथे मिळणारी लूट आणावयाची कोणी हा प्रश्न पडला व तलवारीचे खणखणाट सुरू झाले. पण रोम येथील धर्मगुरु पोपने आपलें वजन खर्ची घालून हा वाद चातुर्याने मिटविला. त्याने पृथ्वीचा त्या कालचा नकाशा पुढे घेऊन, आज अझोर बेटें दिसतात त्याच्या पश्चिम अंगास, अटलांटिक महासागरांत उत्तर दक्षिण अशी एक रेघ ओढिली आणि त्या रेघेच्या पूर्वेस पोर्टुगालने आणि पश्चिमेच्या बाजूस स्पेनने आपआपले हातपाय पसरावे, असें ठरवून दिलें! त्या कालीं पोपची

सत्ता विशेष होती आणि युरोपियन राजेरजवाड्यांत त्याचा चांगला मान होता. त्यामुळें पोपचा हा निकाल त्या उभय राष्ट्रांनी मान्य केला.

पोपने केलेली ही वाटणी इंग्लंड, फ्रान्स आदिकरून राष्ट्रांना मान्य झाली अशातला भाग मुळींच नाही. पण त्या कागदी वाटणीकरितां तीं तडतही बसली नाहीत. जणूं काय ती गोष्ट आपणास माहीतच नाही अशा धर्तीने त्यांनी आपआपल्या स्वतंत्र सफरी आरंभिल्या. पोर्तुगाल व स्पेन यांना इतर राष्ट्रांची लुडबुड मनातून खपली नाहीच. पण करणार काय? भांडण काढावें तर तें कदाचित् अंगलट येण्याचा संभव या शंकेने त्यांनी तिकडे कानाडोळा केला. पुढे मार्टिन ल्यूथरच्या धार्मिक चळवळीमुळें पोपचीच सत्ता डळमळीत झाल्यामुळें त्याने केलेली जगाची वाटणी केवळ कागदावरच राहिली असो.

तुर्कांनीं निर्माण केलेले बंध तुटून गेले. युरोप आता चौखूर उधळण्यास स्वतंत्र झाला. बाहेर पडण्याचे मार्गही समुद्रावरून असल्यामुळे त्याच्या दर्यावर्दीपणास नवा उत्साह चढला! ज्यास संधि मिळेल, साधनें लाभतील आणि सवड असेल तो या नव्या लोभाच्या मागे लागला. सापडलेले नवे जग कसे आहे याची कोणालाच खरी माहिती नव्हती. पण तेथे सपाटून धन आहे व ते लुटून आणणें अगदी सुलभ आहे असे सर्वांना वाटत होतें. एकदम वैभवसंपन्न होण्याची इच्छा मनुष्यामध्यें जन्मजातच असली पाहिजे. त्याशिवाय तो नुसत्या मृगजळाला का भाळेल?—त्यावेळीं युरोपची प्रजा भारी वाढली होती. त्यांना अन्नपाण्याची वाण पडूं लागली होती. अशा स्थितींत त्यांना हा नवा मार्ग अत्यंत प्रलोभनीय वाटावा यांत नवल तें काय? कोलंबसादि लोकांच्या सफरी धनप्राप्तीच्या बाबतींत विफल होत आहेत, हें स्पष्ट दिसत असतांही इतरांना तत्संबंधीं केव्हाही निराशा वाटली नाहीं. जें त्यास लाभलें नाही तें कदाचित् आपल्या भाग्यांत वाढून ठेविलें असेल, असेंच इतरांना वाटलें आणि त्यांनी प्रयत्न चालू ठेविले.

या दृष्टीने जे प्रयत्न झाले त्यांत दोन प्रयत्न भौगोलिक संशोधनाच्या दृष्टीने अत्यंत यशस्वी ठरले. यांपैकी पहिला 'बालबोवा' नामक खलाश्याने केला. याने इ. स. १५१३ सालीं पनामाची संयोगभूमि ओलांडून पलीकडे एक मोठा महासागर आहे ही गोष्ट प्रसिद्धीस

आणिली. आणि त्याचे मागून दुसरा प्रयत्न मॅगेलन याने केला. हा मुळांत पोर्तुगालच्या राजाच्या पदरीं होता व त्याने डी गामाच्या पुढे जाऊन मसाल्यांचीं बेटें शोधून काढिलीं होतीं. परंतु पोर्तुगालच्या राजदरबाराने त्याचा जसा गौरव करावयास पाहिजे होता तसा न केल्यामुळें तो रागावून स्पेनकडे गेला. तेथे त्याचा तात्काळ बडेजाव झाला. तेव्हा त्याने मोठ्या हिमतीने पृथ्वीप्रदक्षिणा करण्याचें योजिलें. इ. स. १५१९ सालीं तो पांच जहाजें घेऊन स्पेनचा किनारा सोडून निघाला. त्याने दक्षिणेकडे वळून अमेरिकेस वळसा घातला आणि पॅसिफिक महासागरात प्रवेश केला. पुढे या सफरींत तो फिलिपाईन बेटात मारला गेला. पण त्याच्या पांच जहाजांपैकी एका जहाजाने पृथ्वीप्रदक्षिणा पुरी करण्याचें श्रेय मिळविलेंच! मॅगेलनच्या या प्रचंड उद्योगाने युरोपच्या लोकांना अनेक गोष्टी कळल्या. त्या अशा:—पृथ्वी खरोखरच गोलाकार आहे. ती कल्पनेपेक्षाही फार विस्तृत आहे. अमेरिका हें एक फार मोठें भूखंड पश्चिम गोलार्धात अगदी एकटें एक आहे आणि लूटमार करण्यास सवड तर पुष्कळच आहे. कोलंबसाने शोध लावल्यानंतर अवघ्या पंचवीस तीस वर्षांत या गोष्टी सिद्ध झाल्या. एव्हापासूनच युरोपखंडांत एका नव्या क्रांतीचा जन्म झाला! एका नव्या संस्कृतीसह अनेक वैभवांनी संपन्न असें सुवर्णयुग त्याच्या द्वाराशी येऊन ठाकलें आणि आरोळी देऊन म्हणालें: 'अहो! युरोपांतील लोकहो, उठा आणि देवाने वाढून आणिलेल्या या सुवर्णसंधीचा लाभ घ्या! ही पहा हिंदुस्थानची सुवर्णभूमि सर्व ऐहिक वैभवांनी कशी ठेचून भरली आहे! तिचीं सारीं दारें सताड उघडीं आहेत आणि तेथील लोक पूर्ण बेखबर आहेत! चला, लुटा हें सौभाग्य! त्याचप्रमाणें पृथ्वीवर पसरलेले भिन्न भिन्न प्रदेश, द्वीपद्वीपातरें आणि सागर महासागर पहा! सारें वैभव तुमच्याकरिताच आहे. उठा, आपला उंबरठा ओलांडून बाहेर या आणि स्वदेशाभिमानाने व दूरदृष्टीने वागून सारें जग पादाक्रांत करा!'

हा संदेश युरोपातील राष्ट्रांनी कसा ऐकला आणि त्याचें पर्यवसान या विसाव्या शतकांत कोणत्या प्रकारें घडून आलें आहे, हें आपण पाहतोंच आहों.

---

## प्रकरण पांचवें

# स्पॅनिअर्ड लोकांचा धुमाकूळ !

अमेरिका हें एक स्वतंत्र भूखंड आहे, हिंदुस्थान किंवा आशियाखंडाचा एखादा भाग नव्हे, ही गोष्ट सिद्ध झाल्यानंतरही या नव्या जगाचें खरें महत्त्व युरोपांतील कोणत्याही राष्ट्रास नीट अजमावता आलें नाही. उलट, ज्या कारणाकरिता कोलंबसानें एवढी धडपड केली ते सफल झालें नाही – हिंदुस्थानास जाण्याचा जवळचा मार्ग सापडला नाही – हें पाहून अनेकांची निराशा झाली आणि त्याचा पहिला उत्साह मावळला. इंग्लंड व फ्रान्स या दोन्ही राष्ट्रांनी तिकडचा नाद सोडून दिला पोर्तुगीज लोकाना हिंदुस्थानास जाण्याचा मार्ग सापडला होता व पोपच्या वाटणीपत्राप्रमाणें त्याचा पश्चिम अटलांटिकमध्यें संबंधही नव्हता. म्हणून त्यानीही तिकडे दुर्लक्षच केलें. राहिले स्पेन. त्यानेच या नव्या जगाचें संशोधन केलें असल्यामुळें, त्याचें मात्र तिकडे दुर्लक्ष झालें नाही. वास्तविक त्या राष्ट्राचीही निराशा झालीच होती. आपलें प्रतिस्पर्धी राष्ट्र (पोर्तुगाल) हिंदुस्थानाशी व्यापार करूं लागलें आणि आपणास एक नवें भूखंड – ज्याचा सांपत्तिक दृष्ट्या आज प्रत्यक्ष उपयोग कांहीच नाही असें—मात्र सापडलें ही गोष्ट त्यास उत्साहप्रद नव्हतीच. तरीपण त्याने या नव्या लाभाकडे निराळ्या दृष्टीने पाहिलें. ज्याचा प्रत्यक्ष उपयोग दिसत नाही किंवा समजत नाही असा एखादा जिन्नस मनुष्यास सापडला असतां, तो जसा त्याचा उगीच संग्रह करितो, तसें स्पेन राष्ट्राचें अमेरिकेच्या बाबतींत झालें. एक नवी भूमि आपल्या निशाणाखाली आली आहे, तिच्यापासून प्रत्यक्ष लाभ नाहीना, नसो परता. तिच्यावर स्वामित्व ठेवण्यांत नुकसान तर नाही ? असा विचार करून स्पेनने या नव्या भूमीवर आपलें स्वामित्व ठेविलें आणि तें कायम राहावें म्हणून आपले प्रतिनिधि ससैन्य तिकडे रवाना करण्याचा क्रम चालू ठेविला.

साऱ्या युरोपांत त्या वेळीं स्पेनचा भाग्यसूर्य अगदी मध्याह्नीं आला होता. कोलंबसास आश्रय देणारा राजा फर्डिनंड हा मोठा शूर, राज-

कारस्थानी व महत्त्वाकांक्षी होता. त्याने राज्यसूत्रें हातीं आल्यापासून आपल्या राष्ट्राच्या शरीरात घुसलेले मूर लोकाचें शल्य काढून टाकलें होतें व आपल्या राज्यकारभाराला मोठी बळकटी आणिली होती. पुढे तो वारला व त्याच्या मागून त्याचा नातू पाचवा चार्लस हा स्पेनच्या गादीवर आला. हा चार्लस मोठा भाग्यवान होता. गादीवर आल्यानंतर तीनच वर्षांनी पवित्र रोमन साम्राज्याच्या पातशाहीपदावर वारसाहक्काने त्याची निवडणूक झाली. त्यामुळें स्पेन व आस्ट्रिया येथील दोनही राजघराणीं एक झालीं. या एकीने फ्रान्सखेरीज युरोपखंडाचा बराच मोठा भाग चार्लसच्या अमलाखाली आला आणि स्पेनचे प्रस्थ एकदम वाढलें. स्पनचा राजा व प्रजा यांना त्याकाळीं मोठे स्फुरण चढले आणि त्याच्या महत्त्वाकांक्षा अनेक पटीने वाढल्या. त्याच्या उत्साहाचा काही अंश सहजीं लाभलेल्या अमेरिकेकडे वळला. वास्तविक कोलंबस, अमेरिको, बालबोवा इत्यादि नाविकानी धनलोभाने या नव्या खंडाकडे अनेक सफरी काढल्या होत्या व त्या बहुश: साऱ्या विफल ठरल्या होत्या.असें असताही त्याची विफलता पुढच्या नाविकाना फारशी बाधली नाही. जे इतराना लाभले नाही ते कदाचित् आपणास मिळण्याचा संभव आहे या आशेने नवे नवे नाविक नवे नवे प्रयत्न करीतच राहिले. थोडेंफार धाडस असलेल्या व समुद्रप्रवासाची आवड असलेल्या लुग्यासुग्या मनुष्यानेही उठावें, इकडे तिकडे धावपळ करावी, श्रीमंत लोकाना थापा मारून धन जमवावें, राजाश्रय मिळवावा आणि चार सोबती जमवून कोलंबसाने रूढ करून ठेविलेल्या मार्गाने अमेरिकेकडची सफर काढावी, असा स्पॅनिअर्ड लोकाचा शिरस्ताच पडला.

स्पानिअर्ड लोकाचे अमेरिकेकडे हे जे धावे सुरू झाले, ते सारे कोलंबसाच्या मार्गाने असल्यामुळें त्याचा सारा रोख नैऋत्य व दक्षिण या दिशेकडे असे. यामुळें तिकडच्याच भूभागाचें संशोधन विशेष झालें. अल्पकालातच वेस्टइंडीजपैकी बहामा, क्यूबा, पोर्टोरिको, इत्यादि बेटें स्पेनच्या अंमलाखालीं आलीं आणि दक्षिण अमेरिकेच्या किनाऱ्यानेही त्याचा झेंडा फडकत चालला.

धनलोभाने चालू ठेविलेल्या या सफरींत शेवटीं पिझारो नांवाच्या एका धाडशी स्पॅनिअर्डला चागलेंच यश आलें. याने दक्षिण अमेरिकेंत घुसून पेरूदेशापर्यंत मजल मारिली. त्यास तेथे धनाढ्य असे

रानटी राजे आढळले. ते लोक शूर असले तरी शस्त्रास्त्रांच्या बाबतींत अगदीच मागसलेले होते. पिझ्झरोच्या लोकांपुढे त्यांचा मुळीसुद्धा टिकाव लागला नाही. धनलोभ व विजयोन्माद या दोन गोष्टींनी पिसाळलेल्या स्पनिअर्ड्सनी या लोकांना नुस्तें लुटलेंच नाही तर त्यांनी आणखी धन द्यावें म्हणून त्यांची धूळधाण केली !

धनलोभ हा मनुष्यमात्रास चिकटलेला एक शाप आहे. पण त्यांतल्या त्यात त्या वेळचे स्पॅनिअर्ड या शापाने मूर्तिमंत भारलेले दिसतात. ते लोक जितके धाडसी होते तितकेच निर्दय होते. यामुळे जाळपोळ करणें, दुर्बलांना कापून काढणे, लूटमार करणें आणि बायका लुबाडणें या गोष्टींत त्यांना मनापासून आनंद वाटे. पिझ्झरो व त्याच्या बरोबरीचे सैनिक यानी हे सर्व अनन्वित प्रकार केले आणि अमूप धन लुटून आणिलें !

युरोपखंडात अमेरिकेविषयीं अनेक भ्रामक कल्पना अगोदरपासूनच रूढ होत्या. त्यांत पिझ्झरोच्या या यशस्वी स्वारीच्या वर्णनाची भर पडली ! त्याबरोबर लोकवदंतेला विलक्षण बाळसें चढलें. तिने अमेरिकेसंबंधीं ही वार्ता सर्वत्र प्रसृत केली.

" अहो, या नव्या जगातील वैभवसंपन्नतेचें किती म्हणून वर्णन करावें ? शब्दानी तें सागतांच येणार नाही. येथील नद्याचीं वाळवंटें सोनेरी वाळूने चमकत आहेत. इतकेंच नव्हे तर सारी भूमीच अशी मोलवान आहे की, जणूं काय ती सोन्याने मढवून काढली आहे असें वाटतें. येथील रानटी इंडियन लोक अगदी मागसलेले, मूर्ख, बावळट व भेदरट आहेत. पण ते सारे धनाढ्य आहेत ! अगदी क्षुल्लक इंडियन सुद्धा सुवर्णालंकारांनी आपादमस्तक शृंगारलेला असतो आणि त्यांचीं घरेंदारें हिऱ्या-माणकानी व मोत्यांनी सजविलेलीं असतात. शिवाय या देशाच्या गहन अरण्यात काही कांही ठिकाणीं अमृताचे झरे वाहत आहेत. यात स्नान केल्यास अगर त्यांचें जल प्याल्यास मनुष्यास चिर तारुण्य लाभतें. "

तो कालच असा होता की, सामान्य लोकांना किंवा संभावितांना सुद्धा या असल्या अफवा असत्य किंवा अशक्य वाटत नसत. आपण तिकडे जाण्याचा अवकाश, सारें द्रव्यभांडार उघड्यावर पडलें आहे व त्याचा मालक झोडपून काढण्यास योग्य आहे. खुशाल त्यांना लुटावें आणि

धनवान व्हावें आणि अमृतजलाचें पान करून रूप, तारुण्य, बल व आयुष्य मिळवावें. अहाहा ! अशी संधि आपणास मिळेल तर काय बहार होईल! असेच ज्याला त्याला वाटे आणि ज्यास शक्य असेल तो त्या नादाला लागेही. अमेरिकेचें संशोधन होण्यास व तिचें स्वरूप कळून येण्यास लोकांच्या या समजुतीचा फार उपयोग झाला. नाहीतर आपली जन्मभूमि सोडून तीन हजार मैलांवर कोणीही जाताना. असो.

इ. स. १५१३पर्यंत स्पॅनिअर्ड लोकांचा धुमाकूळ दक्षिण अमेरिकेच्या कांही भागापुरताच चालू होता. अद्याप त्यांना उत्तर अमेरिकेची कल्पना आली नव्हती. इंग्लिश फ्रेंचाचे प्रयत्न अगदी वरच्या टोकाने झाले होते. युनायटेड स्टेटसूचा मधला भाग अजून अज्ञात होता. तो वरील अफवेमुळें उजेडांत आला. स्पेनच्या दरबारीं 'पोन्था डी लेयान' नांवाचा एक वृद्ध सरदार होता. याची नेमणूक गव्हर्नर या नात्याने पोर्टोरिको या बेटावर झाली. पण वृद्धापकाळामुळें त्याच्या हातून तें कार्य—लूटमार करण्याचें—नीटसें होईना. त्यास आपल्या जरेचें व दुर्बलतेचें फार वाईट वाटलें. त्याच्या ताब्यात असलेला प्रदेश व तेथील रानटी लोक अगदीच दरिद्री होते. ती गोष्टही त्यास दुःख देणारी होती. तेव्हा त्यास वरील अफवेने वेडें केलें. त्याच्या ताब्यात असलेल्या रानटी लोकांनीही त्यास संपत्तीच्या व अमृताच्या झऱ्याच्या थापा दिल्याच होत्या. लेयान त्यांना भाळला. वायव्य दिशेच्या रोखाने वर गेल्यास काही अंतरापलीकडे असला सुंदर देश आहे असें त्यास कळलें. लागलीच त्याने तिकडे जाण्याकरिता आपल्या खर्चाने एक मोहीम काढली. असला प्रदेश आढळल्यास लेयानने त्याचेवर राजप्रतिनिधि म्हणून राज्य करावे असा वर चार्लस राजानेही त्यास दिला.

लेयान मोठ्या उत्साहाने निघाला. काही काल त्यास बहामा बेटांतच घोटाळावें लागलें. पुढे त्यास वरील रस्ता सापडला. काही आठवड्यानी त्याचीं जहाजें एका नव्या किनाऱ्यास लागलीं. हा प्रदेश दर्शनीं मोठा सुंदर, चित्राविचित्र पुष्पोद्यानाने नटलेला आणि उत्कृष्ट हवापाण्याचा दिसला. त्यावेळचें तेथील ऋतुमानही मोठें बहारीचें होतें. अशा स्थानीं सोन्याच्या खाणी व अमृताचे झरे असतील यांत नवल तें काय ? असें लेयानला वाटलें. आपल्या लोकांनिशीं तो त्या भूमीवर मोठ्या इतमामाने व आनंदी मनाने उतरला. त्या दिवशीं ईस्टरचा सण

होता. स्पॅनिश लोक त्यास फुलाचा सण म्हणत. आणि त्या भूमीवर त्या वेळी जिकडे तिकडे फुलेंच फुलें होतीं. म्हणून लेयानने या नव्या प्रदेशास Florida (फ्लॉरिडा) असें सार्थ नाव दिले आणि त्यावर स्पेनचा झेंडा लाविला ! सध्या नकाशात सेंट ऑगस्टाईन नावाचें जे नगर दाखविले आहे, तेथे लेयानने पदार्पण केलें होतें.

पुढे लेयान धन व अमृत याच्या शोधार्थ त्या प्रदेशांत आत शिरून पुष्कळ भटकला पण त्याला किंवा त्याच्या माणसापैकी कोणालाही कसलाच लभ्यांश झाला नाही. अत्यंत निराश मनाने तो परत पोर्टोरिको येथे आला. पुढे एकदोन वर्षांनी त्यास फ्लॉरिडामध्यें वसाहत करण्याची कल्पना सुचली. तेथील हवापाणी उतम असल्यामुळे त्याची ती कल्पना काही वाईट नव्हती. पण त्यातही त्यास यश आले नाही. तो तिकडे गेला असता त्या प्रयत्नात त्यास एका रानटी मनुष्याने ठार केलें. असो. यानंतर १५२८ च्या सुमारास 'नार्वेझ' व 'डी वाका' नावाचे दोन लुटारू भटकंती करीत मेक्सिकोपर्यंत जाऊन आले. त्यानाही अपेक्षित लभ्यांश झाला नाहीच.

या नव्या देशांतही धन किंवा अमृत कोठेच नाही हें पुन्हा एकवार सिद्ध झालें असताही तसल्या फंदात असलेल्या लोकाना ते सत्य कधीच पटले नाही. अशा वेड्या लोकापैकीच फर्डिनॅड डी सोटो हा एक होता. हा पिझॅरोच्या स्वारीबरोबर काही काल असल्यामुळें व त्याने तिकडे पुष्कळ लूट प्रत्यक्ष मिळविलेली असल्यामुळें त्यास फ्लॉरिडा देशाचें वर्णन ऐकतांच नवी वीरश्री चढली ! तो मिशीला पीळ भरीत म्हणाला, "दोस्तहो, असल्या स्वारीला डी सोटो मारखाच खंदा वीर पाहिजे. फ्लोरिडामध्ये सोनें व रत्नें सापडत नाहीत म्हणजे काय गोष्ट आहे !" असें बोलून त्याने आपल्या स्वारीची जिकडे तिकडे घोषणा केली. स्पेनमध्यें त्या कालीं त्याचा थोडा बोलबालाही होता. त्यामुळें त्याच्या घोषणेला किंमत आली. त्याच्या बरोबर जाण्याकरिता तरुण स्पॅनिअर्डमध्ये स्पर्धा सुरू झाली. अनेकांनी आपली घरेदारे व शेतवाडी सुद्धा विकली आणि डी सोटोकडे अर्ज पाठविले. तो त्यावेळीं भावी विजयाच्या कैफाने अगदी धुंद झाला होता. रानटी लोकाकडून द्रव्य कसें काढावयाचें असतें, याचे राक्षसी पाठ

त्याने पिझारोकडून घेतले होते. तो काय वाटेल त्यास बरोबर येऊं देतो? त्याने आलेल्या तरुणांतून अगदी उलट्या काळजाचे असे सहाशें लोक निवडले व बाकीच्यांना पिटाळून लाविलें! ज्यास डी सोटोच्या बरोबर जाण्यास सापडलें तो परम भाग्यवान गणला जाऊं लागला आणि आता तो धनाढ्य होऊन परत येणार या कल्पनेने अनेकाना हेवाही वाटूं लागला.

डी सोटोने या स्वारीची तयारी पुढील धोरण ठेऊन मोठ्या जोराची केली. कोणत्याही प्रसंगास हार न जाणारे सहाशे शूर गडी, रानटी लोकाशीं झगडण्याकरिता सुधारलेलीं शस्त्रास्त्रें, त्याना लुटल्यावर लाभलेलें द्रव्यभांडार वाहून नेण्याकरितां दोनशें घोडे, इंडियन लोकांना गुलाम व कैदी म्हणून वागविण्याकरितां बेड्या, कादण्या व खोडे, ते मूर्ख लोक सरळपणें वश न झाल्यास त्याच्या अंगाचे लचके तोडून त्याना हैराण करण्याकरिता रक्तास चटावलेले शिकारी कुत्रे आणि आपल्या लोकापैकी कोणाच्याही पोटाचे हाल होऊं नयेत म्हणून खाणेंपिणें, इत्यादि सर्व गोष्टी त्याने गडगंच करून घेतल्या. नंतर या ऐहिक पराक्रमाबरोबर कांही परमार्थ घडावा म्हणून काळे झगे पाघरलेले गंभीर स्वरूपाचे धर्मोपदेशकही घेण्यास तो विसरला नाही. हो, धनलोभाने प्रमत्त झालेल्या लोकांनी रानटी लोकाची लाडगेतोड आरंभिल्यावर, हें सारें तुमच्याच कल्याणाकरितां व उन्नतीकरिता आहे हे त्यांना सागावयाचें कोणी आणि आकाशातील प्रेमळ पित्याचा दिव्य संदेश त्यांना ऐकवावयाचा कोणी! तेव्हा धर्मोपदेशक बरोबर घेणें अगत्याचेंच होतें.

अशी ही मोहीम प्रथमत: स्पेनमधून निघून क्यूबा बेटात गेली आणि तेथून इ. स. १५३९ साली पुन्हा नव्या जोमाने फ्लोरिडाकडे वळली. अनर्थापात करण्याच्या इच्छेने व तयारीनेच ही वावटळ उठली असल्यामुळें फ्लोरिडामध्ये शिरताच तिने आपले उग्र रूप प्रकट केलें. दक्षिण अमेरिकेंत पिझारोच्या स्वारीबरोबर घेतलेला अनुभव व प्रचलित दंतकथा यांच्या आधारें डी सोटो व त्याचे साथीदार यांना पक्कें वाटत होतें की, फ्लोरिडाच्या आंतल्या भागांत धनाढ्य इंडियनाचीं वैभवसंपन्न नगरें आणि देवालयें आढळलींच पाहिजेत. या आशेने पागल बनून ते लोक जयघोष करीत आंतल्या भागांत घुसले! इंडियन लोकांची जमात दिसली रे दिसली की, या टोळधाडीने त्याच्यावर हल्ला चढवावा.

गरीब बिचारे ते जंगली लोक. त्यांच्याजवळ युरोपीय लोकांप्रमाणें शस्त्रास्त्रें किंवा कुटिलनीति नव्हती. बहुशः ते प्रतिकाराच्या भानगडींत न पडतां शरण जात किंवा पलायन करीत. परंतु त्याच्यावर तुटून पडणाऱ्या लांडग्यांना माणुसकी नव्हती व सारासार विचारही नव्हता. त्यानी निर्दयपणाने कांहींना कापून काढावें आणि कांहीना कैद करावें. नंतर पकडींत सांपडलेल्याना "चला धन काढा. सोनें कुठे आहे तें दाखवा," असा तगादा करावा. रानावनांत हिंडून, कंदमुळें खाऊन आणि खोपटांत राहून काल कंठणारे ते लोक या सुधारलेल्या गौरकाय ख्रिस्तानुयायांना काय देणार न् काय सांगणार ? खुणेच्या भाषेंत ते आपली असमर्थता प्रकट करीत. पण ती त्या धनलोभी लांडग्याना मुळीच पटत नसे. मग त्या निरुपद्रवी दुर्बलांचे जे हाल करण्यांत येत त्याचें वर्णन काय करावें ! एकाही धर्मोपदेशकाला किंवा स्पॅनिअर्डला हा साधा विचार सुचला नाही की, हे जंगली लोक श्रीमान् असतील कोठून. छे, हा विचारच त्याच्या डोक्यांत आला नाही. त्यांनी मग अत्यंत अघोरतेने त्या लोकाचे हाल आरंभिले. कांहींना रक्त फुटेपर्यंत झोडपून काढलें ! कांहींना पाय बांधून फरफटत नेले ! कांहींच्या वर शिकारी कुत्रे घालून त्याचेकरवीं त्याचे लचके तोडविले ! कांहींना जिवंत जाळण्यात आलें आणि कांहींना हात पाय तोडून ठार करण्यात आलें ! —आणि हीं सारीं अनन्वित कृत्यें त्या लोकानी सांजसकाळ येशु-ख्रिस्ताची प्रार्थना करीत केलीं ! डी सोटो आपल्या साथीदारांसह त्या रानटी लोकाना सुधारणेचे हे पाठ पढवीत असता, त्याच्याबरोबर असलेले पाद्रीलोकही केवळ प्रार्थना चालविण्याचेंच काम करून राहिले नाहीत. तर फावल्या वेळीं त्यानी त्या जंगली लोकाना आकाशातील तारक किती दयाळू आहे, तो सर्व लेकरांकडे किती समदृष्टीने पाहतो आणि साऱ्या लोकानी त्याचें अनुयायित्व पत्करल्यास जगांत शांतीचें साम्राज्य कसें पसरणार आहे, यावर प्रवचनें देऊन त्याचें पारमार्थिक-कल्याण साधण्याचें पुण्यकर्मही आचरिलें !

धनलोभाने स्पॅनिअर्ड लोकांनी कसकसे अनर्थ केले हें वर सांगितलेंच आहे. त्यानीच स्त्रीलोभाने काय केलें असेल हें निराळें सांगण्याचें कारणच नाही. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास एवढेंच म्हणतां येईल

कीं, अधमाधम कृत्ये, अत्याचार, निर्लज्जपणा आणि क्रूरता करण्याचे सारे प्रकार त्या लोकानी पावलोपावलीं केले !

डी सोटो आपल्या साथीदारासह मैलोगणिक गेला आणि मार्गात आढळलेल्या रानटी लोकांना त्याने त्राहि भगवन् केलें ; पण इतकें करूनही त्यास तोळाभर सोनेसुद्धा लाधलें नाही ! त्याच्या पकडींत सांपडलेले इंडियन माराच्या व हाल अपेष्टाच्या भयाने नित्य नव्या नव्या थापा देत आणि संधि मिळाल्यास पळून जात. मग मात्र ते त्याचे कट्टे शत्रु होत आणि शक्य त्या प्रकारानी त्यास उपद्रव पोचवीत ! त्यांनी संघशक्तीने हा प्रतिकार प्रारंभिला. डी सोटोच्या स्वारीला अन्नपाणी मिळूं नये, सरळ मार्ग सांपडूं नये आणि त्याच्या अडचणी वाढाव्या असे प्रयत्न त्यानी सर्रास चालू ठेविले. पण तेवढ्याने त्याची गुर्मी जिरली नाही. तो पुढे पुढेच चालला. प्रथम तो सरळ उत्तरेकडे गेला. नंतर तो पश्चिमेकडे वळला. काही काळ पश्चिमेकडे जाऊन नंतर खाली दक्षिणेकडे वळला. अशी त्याने खालवर व मागेपुढे अनेक वळणें घेतलीं. कांही काळाने एका स्थानी त्यास मिसिसिपी ही प्रचंड नदी आडवी आली. हिच्या प्रवाहास जोराचा वेग असून पाणी अगदी कर्दममय होतें. पात्रही अर्धाकोस रुंदीचें. डी सोटोला ही नदी ओलाडून जाण्यास विलक्षण कष्ट पडले. त्याच्या बरोबरीचीं काही माणसें व जनावरेंही त्या प्रयत्नात दगावलीं. तरी त्याने माघार घेतली नाही. असा तो सुमारें दोन वर्षे भटकला आणि एकूण दीड हजार मैलाचा प्रवास त्याने केला. नकाशात फ्लोरिडा, जार्जिया, आलबामा आणि मिसिसिपी अशीं जी संस्थानें आज दाखविलीं जातात, त्या सर्वांतून तो आपल्या साथीदारासह भटकला ! ही सारी भूमि त्याने इडियन लोकाच्या रक्ताने शिंपडली आणि अनेक अधम कृत्यें करून आपल्या माणुसकीस कलंक लाविला ! बरें एवढ्या खटाटोपानंतर लाभ काय झाला म्हणाल तर कांहीच नाही. उलट, इंडियन लोकाच्या शत्रुत्वामुळें स्वभावतःच कष्टमय असलेला प्रवास आणखी कष्टमय झाला आणि त्याच्या सर्व लोकाचे विलक्षण हाल झाले ! त्यामुळे त्याचे सहाय्यक भराभर मृत्युमुखीं पडूं लागले. शेवटीं ही दगदग त्यासही जाणवली. तोही आजारी पडला व त्यांतच त्याचा अंत झाला !

डी सोटोच्या सफरीची झालेली ही वाताहात सर्वत्र कळताच मात्र स्पॅनिअर्ड लोकांचा माज एकदम उतरला. उठल्या बसल्या सफरी काढून धनाच्या मार्गे लागण्याचें वेड लोकाच्या मनातून पुष्कळच कमी झालें आणि फ्लोरिडाचें नंदनवन तसेंच पडून राहिले. पुढे इ. स. १५६२ पर्यंत विशेष कांही घडले नाही. या साली मात्र झॉन रिबोह नावाच्या एका फ्रेंच धर्मोपदेशकाच्या मनांत फ्लोरिडामध्यें ह्यूजेनॉट्स लोकाची एक वसाहत स्थापावी असें आलें. वास्तविक तो स्पेनचा रहिवासी किंवा प्रजाजन नव्हे. फ्लोरिडावर स्पेनच्या राजाची सत्ता आहे ही गोष्टही त्यास ज्ञात होती. असें असताही त्याने तिकडून वसाहतीची परवानगी न काढतांच आपली सफर काढिली. पोर्ट रायल नावाचें जें स्थान आज नकाशांत दाखविलें जातें तेथे त्याने आपल्या वसाहतीस प्रारंभ केला. पण ही गोष्ट चार्लस राजास कळतांच त्याला मोटा राग आला. वास्तविक त्याचें तरी या वसाहतीमुळें काय नुकसान होणार होतें? फारतर त्या वसाहतवाल्यांना 'तुम्ही आमचे प्रजाजन व्हा; आणि तशी इच्छा नसल्यास जागा सोडा,' असा निरोप पाठवावयाचा. पण तसें त्याने न करितां मॅडेथ नावाचा एक अविचारी व क्रूर सरदार ससैन्य त्या वसाहतीवर धाडला. हा मॅडेथ डी सोटोचा अवतार होता. त्याने फ्लोरिडामध्यें जाऊन अचानकपणे वरील ह्यूजेनॉट्स लोकाच्या वसाहतीवर छापा घातला आणि निर्दयतेने हत्याकाड केलें! बायका मुलें तेवढीं त्याने वगळलीं आणि बाकीचे सारे फ्रेंच न्याय अन्याय न पाहतां कापून काढिले. ही गोष्ट फ्रान्स देशास कळतांच तेथे मोठी खळबळ उडाली. या अमानुष कृत्याचा जबाब स्पेनच्या राजास विचारला पाहिजे असें जो तो ह्मणूं लागला. पण फ्रान्सच्या राजास त्याचें विशेष महत्व वाटलें नाही व त्याने काहीच उचल केली नाही. पण डेहगुर्जे नांवाच्या दुसऱ्या एका धर्मोपदेशकास या अन्यायाची अत्यंत चीड आली. त्याने स्वतःच्या खर्चाने स्वारीची तयारी केली. तो धावत्या गतीने फ्लोरिडामध्यें गेला. मॅडेथने फ्रेंचांची कत्तल करितांना बायकामुलें वगळण्याइतकी माणुसकी दाखविली होती. डेहगुर्जने तेवढाही विवेक दाखविला नाही. त्याने तेथे आढळला तेवढा स्पॅनिअर्ड एक जात कापून काढिला आणि घडलेल्या अन्यायाचा सव्याज सूड उगवला !

फ्लोरिडा हे नैसर्गिक पुष्पोद्यानाने नटलेलें संस्थान आहे. तेथील हवापाणीही उत्कृष्ट आहे. असें असता युरोपांतील सुधारलेल्या लोकांनी तेथे जाऊन निरपराध रानटी लोकाचें रक्त सांडलें आणि पुढे आपसांत कत्तल करून त्या नंदनवनाचे स्मशान बनविलें ! गरीब विचारे इंडियन लोक ! त्यानी असे कोणतें महत्पाप केलें होतें म्हणून त्यांच्या भाग्याने त्यास हें प्राणसंकट दाखविलें परमेश्वरास माहीत ! 'देवो दुर्बलघातकः' म्हणतात तेंच खरें.

---

## प्रकरण सहावें

## वन्यावस्थेंतील अमेरिका

गौरकाय युरोपियनाचे आगमन होण्यापूर्वी बाह्य जगताला पूर्ण अज्ञात अशी अमेरिकेची सर्वसमृद्ध भूमि पूर्ण रानटी स्थितींत होती. काही अगदी रुक्ष व रेताड भाग वगळता बाकीचा सर्व प्रदेश मोठमोठ्या गहन अरण्यानी व्यापिलेला होता. इथे तिथे पसरलेले सानथोर पर्वत, त्यांच्यामधील विस्तृत दऱ्या व खोरी, त्यातून वाहणारे प्रचंड नद व नद्या आणि त्याच्या आसमन्तातील प्रात, गगनभेदी वृक्षानी, दीर्घकाय लतावेलींनी व अनेक प्रकारच्या झाडाझुडपांनी नुस्ता गजबजून गेला होता. जिकडे पाहावें तिकडे एकापेक्षा एक गहन व भयप्रद अशीं अरण्येंच अरण्यें. यातच मधून मधून लाबवर पसरलेलीं माळरानें होतीं; परंतु तींही रितीं नव्हती. त्याच्यावर उंच उंच गवताचीं कुरणें (Prairies) सपाटून माजली होती. वनश्रीच्या या वैभवाला शोभेल अशी जीवसृष्टीही तेथे विपुल व विविध प्रकारची होती. जलचर, स्थलचर व खचर, तृणाहारी व मासाहारी अशा जातींचे भिन्न भिन्न पशुपक्षी, जीवजन्तु व सरपटणारे प्राणी तेथे स्वच्छंदाने विहरत होते आणि जीवनार्थ कलह चिकाटीने लढवून आपलें अस्तित्व टिकवून होते. क्षेत्राच्या विस्तृतपणामुळें सर्वांच्या वाढीला भरपूर वाव असला तरी गर्दीमुळें सर्वांचा उपसर्ग सर्वांना होत होता आणि त्यात सृष्टि-नियमानुसार सबलाचे संवर्धन होऊन निर्बलाचा नाश होण्याचे कार्य

अप्रतिहत सुरू होतें. यातच केव्हा केव्हा निसर्गाच्या कोपाचीही भर पडत होती. कधी मुसळधार पाऊस पडून नद-नद्यांना राक्षसी पूर येत होते तर कधी पर्वतानाही उखडून काढूं पाहणारा झंझावात सुटून अरण्यें उध्वस्त होत होतीं. कधी जुनाट वृक्षाच्या आपसातील घर्षणानें अग्नि निर्माण होऊन तो चारी दिशाना भडकत सुटत होता तर कधी दीर्घ अवर्षण पडून साऱ्या सृष्टीला प्रेतकळा येत होती. प्रलय कोण-ताही असो पण तो मोठा उग्र स्वरूपाचा असे व त्यावेळीं संहाराचें भीषण तांडव सर्वांवर सारख्या प्रमाणात चाले. असें होतें तरी संहारा-पेक्षा संवर्धन जोमात होते यात शंका नाही. अनुकूल हवामान, विपुल जलसंचय व नियमित ऋतुचक्र यामुळें त्या भूमीचे वन्य तारुण्य सगळी-कडून ओसंडत असल्याचा भास होत होता. असो.

अशा या स्थानी प्राणिमात्राचा मुकुटमणि व सर्वांवर सत्ता चालवूं पाहणारा बुद्धिमान मानव मात्र अगदीच अल्प प्रमाणांत होता. तो म्हणजे तेथील मूळ रहिवासी ' रेड इंडियन ' होय. या लोकाचें हें नाव भौगोलिक दृष्ट्या बरोबर नाही. अमेरिकेंतील मूळ रहिवासी या नात्याने ' अमेरिकन्स ' हे नाव किंवा ते स्वत:ला ज्या नांवाने संबोधीत असतील तें नांव त्याना जगाकडूनही मिळण्यास हवे होतें. पण तसे घडलें नाही. त्याना रेड इंडियन हें चुकीचें नाव मिळाले. या चुकीचा सूत्रपात प्रथमत: कोलंबसाकडून झाला. त्याने अजाणतेपणें नवीन शोधून काढिलेल्या भूखंडावर हिंदभूमीचा आरोप केला व तेथे त्यास आढळलेल्या लोकाना त्याने इंडियन ठरविले. मग त्याचाच अनुवाद जगानेही केला. पुढे घडून आलेल्या संशोधनांत या नव्या जगाविषयीच्या इतर अनेक चुकीच्या समजुती हळूहळू दुरुस्त होत गेल्या; पण तेथील मूळच्या रहिवाश्याना मिळालेलें भ्रामक व गैरलागू नाव मात्र तसेंच कायम राहिलें. तें आजतागाईत चालू आहे. थोडा फरक पडला तो एवढाच की, लोक ताम्रवर्णी असल्यामुळें जग त्यांना रेड इंडियन–तांबडे हिंदी–असें संबोधूं लागलें. वास्तविक त्यांचा व हिंदुलोकाचा किंवा हिंदुस्थानचा अर्थाअर्थी कांही एक संबंध नाही.

आपल्या चुकीच्या समजुतीप्रमाणे युरोपियन लोकांनी अमेरिकेच्या मूळ रहिवाश्यांना रेड इंडियन असें नांव दिले असलें तरी ते लोक

स्वतःला स्वतःच्या भाषेंत ' **खरीं माणसें** ' असें म्हणत. म्हणजे त्यांच्या दृष्टीने हेंच त्याचे जातिवाचक नांव. हें अगदी साधें असलें तरी त्यांना तें अन्वर्थक होतें, असें म्हणण्यास हरकत नाही. त्या काळच्या युरोपियन लोकाच्या तुलनेने ते लोक अगदी मागासलेले व रानटी होते, हें खरें; पण त्याच्या राहणीचा व साध्या भोळया आचाराविचाराचा कस लावला तर त्याच्या अंगीं खरी माणुसकी युरोपियनापेक्षा विशेष होती, असेंच म्हणावें लागेल. त्याचा व युरोपियन लोकाचा संबध घडल्यावर प्रथमतः त्यांनी या गौरकायांशीं जो सरळ व स्नेहमय व्यवहार केला, त्यावरूनच त्या ' **खऱ्या मनुष्य** 'जातीची योग्यता कळण्यासारखी आहे. त्यांच्या भल्या भावाचा मोबदला युरोपियनानी त्यास कसा दिला याची चुणूक वाचकांना गतप्रकरणीं दाखविलेली आहेच.

त्या कालीं हीच ' खरीं माणसें ' किंवा रेड इंडियन लोक वन्य अमेरिकेचे एकटे एक स्वामी होते. परंतु गाढ अज्ञानामुळें त्याना आपल्या स्वामित्वाची योग्यता किंवा महती रतिमात्र माहीत नव्हती. बाह्य जगत् केवढे विशाल आहे, याची जशी त्याना काहीच जाणीव नव्हती, तशीच ज्या भूमींत ते वंशपरंपरा नादत आले होते, ती किती समृद्ध व निसर्गसाधनसपन्न आहे, याचीही नव्हती. तेथील अरण्यात विचरणाऱ्या पशुपक्ष्याप्रमाणेच त्याचा संसार चालला होता. क्षेत्राच्या मानाने त्याची सख्याही अत्यंत अल्प होती. अमेरिकेचे एकंदर क्षेत्र-फळ अदमासे तीस लक्ष चौरस मैल आहे. असें असतां एवढ्या मोठ्या प्रदेशात या लोकाची संख्या पुरती पाच लक्षही नव्हती. जमिनीवर सहजी विस्कटून पडलेल्या धान्यकणाप्रमाणे त्याच्या लहान लहान टोळया साऱ्या देशभर पसरलेल्या होत्या. कोठे कोठे ते दाटीवाटीने वसले होते. कोठे अगदी पांगून होते आणि काही भाग तर पूर्ण निर्जन होता.

रेड इंडियनांची ही सारी लोकसंख्या प्रायः एका वर्णाची, स्वभा-वाची व वंशाची होती. परंतु भूमि विस्तृत असल्यामुळे त्यांच्या लहान-मोठ्या जमाती एकमेकापासून तुटून पडलेल्या होत्या. या दूरत्वामुळें त्यांच्यामध्यें अनेक जाति उपजाति निर्माण झाल्या होत्या. देश, प्रांत व भाषापरत्वें त्याच्यामध्यें विलक्षण भिन्नत्व निर्माण झालेलें होतें. सपाट प्रदेशांतले लोक उंच व धिप्पाड तर डोंगराळ प्रदेशांतील लोक मध्यम

उंचीचे असे होते. त्यांतले त्यांत त्यांचे काही गट प्रमुख होते. मिसिसिपीच्या पूर्वभागांत अल्गोंकिन, इराक्वा, मोबीलिआन व नॅटशे हीं कुळें प्रमुख होतीं. बाकीच्या स्थानीं चिरोकी, नारांगसेट, मॉहॉक, चिक्सा, चोक्टा, डाकोटास इत्यादि अनेक कुळें व उपकुळें नांदत होतीं. काही जमातींमध्यें चागलें सख्य तर कांहींच्यामध्यें वंशपरंपरेचें हाडवैर होतें. ज्याच्यामध्यें सख्य होतें, त्यांच्यामध्येंही कारणपरत्वें कुरापती निघतच होत्या. सबलाने दुर्बलाला व शूराने भेकडाला चिरडावयाचें हा त्रिकालाबाधित न्याय त्यांच्यांतही होता.

त्या रानटी लोकात असें भिन्नत्व कितीही असलें तरी वर्ण व स्वभाव या दृष्टीने ते एकरूप होते. त्यांच्या शरीराचा वर्ण ताम्रधातूप्रमाणें तांबूस होता. त्यांची देहयष्टि उंच, बळकट व राकट होती. युरोपियन लोकाच्या मानाने त्याची कपाळपट्टी बारीक, डोळे लांबट, बुबळें काळीं पण बारीक व काहींशीं चौकोनी, नाक सरळ, उंच व किंचित् पसरट, जबडा काहीसा रुंद, गालाची हाडें वर आलेलीं, असे त्याचें सामान्य स्वरूप होतें. त्यांच्या केशाची ठेवणही विशेष स्वरूपाची होती. ते लांब सडक, काळे पण घोड्याच्या आयाळीप्रमाणें राठ होते. पुरुषांना दाढी मिशा नाममात्र उगवलेल्या असत. त्याच्या बायका आपले केस लांबलचक वाढवीत व त्याच्या वेण्या घालीत; पुरुष डोक्याबरोबर केस कातरीत किंवा जटा वाढवीत. कुरळ्या केसांचा मात्र या लोकात पूर्ण अभाव होता. पुरुषाच्या डोक्याच्या केसांना वाढ भरपूर होती. पण ते डोक्यावर ठेवणें किंवा न ठेवणें, ते अजीबात कातरून टाकणे किंवा काही विशिष्ट पद्धतीने राखणें हें त्या पुरुषाच्या पराक्रमावर अवलंबून असे. टाळूपासून खाली मानेपर्यंत एक लांबलचक केसाचा पट्टा ठेवून तो झुबकेदार वाढविणे ही गोष्ट त्या लोकांत मोठी मानाची व शौर्याची गणली जाई. वयांत आलेला प्रत्येक तरुण असा झुबका ठेवण्यास मोठा उत्सुक असे; पण हा मान त्यास सहज साध्य होणारा नसे. प्रतिस्पर्धी ज्ञातींतल्या किंवा कुळांतल्या ज्या पुरुषाने असला झुबका ठेविला असेल, त्याच्याशीं द्वंद्वयुद्ध खेळून, त्याचा झुबका मुळासकट उपटून आणिला तरच त्यास स्वतःच्या टाळूवर झुबका ठेवण्याचा अधिकार प्राप्त होई. यामुळें प्रत्येक तरुण असले युद्ध खेळण्यास सदा टपलेला असे. आपला

झुबका न गमावणें व दुसऱ्याचा उपटून आणणें हे मोठे युद्धकौशल्य मानले जाई. अशाप्रकारे विजयी झालेला वीर मग आपल्या झुबक्यात पक्ष्यांचीं चित्रित्र व मनोहर रंगांचीं पिसें खोवून व शत्रूचा आणिलेला झुबका गळयात अडकवून किंवा आपल्या तंबाकूच्या नळीला किंवा वाजवावयाच्या शिंगटाला गोंड्याप्रमाणें लटकावून मोठ्या दिमाखाने समाजात वावरे. त्याचें हें मिरविणें म्हणजे इतर तरुणाना युद्धाचे आह्वानच असे. शत्रुपक्षाकडील नायकाचा झुबका काढून आणणारा मोठा योद्धा मानला जाऊन, त्याच्या जातीचे नायकत्व त्याचेकडे येण्यासही तें मोठें साधन होई. असो.

अमेरिकेचे हे रानटी इंडियन लोक युरोपियनांच्या मानाने मागसलेले व अज्ञानी असले तरी ते अगदी पशुकोटींत जमा होण्यासारखे नव्हते. केवळ गिरिकंदरीं राहून नग्नावस्थेंत फिरणाऱ्या कांही वन्य जाती या भूतलावर अद्यापि आहेत. पण त्यांच्यापेक्षा अमेरिकेचे मूळ रहिवासी पुष्कळच सुधारलेले होते. त्यांना अग्नि माहीत होता. शेती करणे, आश्रयार्थ कुटिका बाधणें, कातड्याचीं वस्त्रें बनवणे, झाडाच्या ढोलीपासून किंवा चिवट सालीपासून नावा तयार करणे, धनुष्य बाण बाळगून शिकार करणें, मातीचीं किंवा लाकडाचीं भाडीं तयार करणें, मासे धरण्याकरितां जाळी विणणे, सापळे तयार करून त्यांत सावजें पकडणें, इत्यादि जीवनास आवश्यक असलेल्या गोष्टी त्यांच्यामध्ये चागल्या रूढ झालेल्या होत्या. या परिस्थित्यनुरूप त्याची भाषा साधीसुधी व बिनभानगडीची होती. भाषेला लिपि नसल्यामुळें त्याना लिहिण्याची कला अवगत नसली पाहिजे हें उघड आहे. मात्र पशुपक्ष्याची व मनुष्यांचीं ओबडधोबड चित्रें रेखाटून आपला भाव प्रकट करण्याचें त्यांना ज्ञान होतें.

थंडीवाऱ्यापासून आपलें व आपल्या कुटुंबांतील लहानथोर व्यक्तींचें संरक्षण व्हावें म्हणून हे लोक घरें बाधीत; पण तीं अगदी साधी व भिकार असत. दोन डांब पुरून त्याच्यावर एक आडवा वासा टाकावयाचा आणि त्यावर कातडी, साली किंवा पालापाचोळा पसरून द्यावयाचा. त्याला कसलाही आकार नाही किंवा बळकटी नाही. प्रसंग पडतांच घर उठवावें आणि चालू लागावें. या घरांना त्याच्या भाषेंत 'विगवाम' ( Wigwam ) म्हणत. या घराच्या आकाराचे मोजमाप

ठरलेलें नसे. एका जोडप्याला राहाण्यापुरती लहान किंवा पांचपन्नास माणसांचा समावेश होईल अशीं मोठीं बांधली जात. लज्जारक्षण किंवा मर्यादा यांची ओळख नसल्यामुळें एका घरांत सर्व स्त्रीपुरुषांचा समावेश होई व साऱ्यांचा जीवनक्रम स्वच्छंदाने चाले. स्वच्छतेची किंवा शुद्ध हवेची चाड कोणालाच नसल्यामुळें तिकडूनही एकत्र व गर्दीने राहण्याची खंत कोणालाच वाटत नसे. अशा पांचपन्नास विगवामांचे एक खेडें वसलें जाई. तें आपल्यापरी स्वतंत्र असे आणि त्याच्या भोंवतालचा प्रांत त्यांच्या स्वामित्वाखाली गणला जाई.

या लोकांत राजसत्तेचा अभाव होता. प्रत्येक जमातीचा कोणीतरी एक लढवय्या नायक असे. पण त्याचा खरा अधिकार युद्धकालींच मानिला जाई. इतर वेळीं या नायकाचा लोकांवर फारसा दाब नसे. पण सामाजिक दृष्ट्या कोणीही फारसा स्वतंत्र नव्हता. चालत आलेल्या रूढि व वंशानुवंश चालत आलेल्या परंपरा सर्वांनी पाळल्या पाहिजेत असा त्यांचा कटाक्ष होता. कोणाही तरुण स्त्रीपुरुषाला वाटेल त्या स्त्रीपुरुषाशीं विवाह करण्याचें स्वातंत्र्य नव्हतें. पंचायत बसली असता कोणी कोठे व कसे बसावयाचे याचे नियम ठरलेले होते. कोणी कोणतीं आभूषणें घालावयाचीं वा कातडीं पांघरावयाचीं यालाही निर्बंध होता. एखाद्या योध्याने पराक्रमाने मिळविलेलें एखादे विजयचिह्न तशाच धर्तीने दुसऱ्याने वापरण्याची मनाई होती. प्रत्येक जातीचे वैशिष्ट्यदर्शक असे एखादें चिह्न ( badge ) असे. याना ते लोक टॉटेम म्हणत. हें चिह्न कोणातरी प्राण्याचें चित्र असे. या चिह्नाचा उपयोग थडग्यावरून, शपथविधीच्या वेळी किंवा वज्रलेखावर केला जाई. प्रत्येक जात आपलें टॉटेम मोठें पूज्य मानी. त्यांना ते देवतास्वरूपच वाटे. समाजांत कलह वा कांही भानगडी निर्माण झाल्या किंवा दोन जातींत कलह माजला तर त्याचा निर्णय करण्याकरितां वृद्धजनांची पंचायत बसे. या सभांतून जे निर्णय होत, ते नोंदून ठेवण्याची त्यांची प्रथा मोठी चमत्कारिक होती. शंख शिंपा यांच्या माळा किंवा पट्टे विशेष पद्धतीने गुंफले जात आणि त्यातून पंचाईताचा निर्णय गोवला जाई. या पट्ट्याना ते वामूपम् ( Wampum ) म्हणत. हे वाम्पम् अनेक एकत्र केले असले तरी कोणता वाम्पम् कशाकरितां आहे व ते

कोणत्या काळीं झाला हें वृद्ध व अनुभवी इंडियनास तेव्हाच सांगता येत असे. इतराना त्याचा उलगडा व्हावयाचा नाही. युरोपियनांच्या आगमनानंतर इंडियन लोकाचे हे वाम्पम् काचमण्यात बनूं लागले. दोन जातींतील तह, जमिनीची खरेदीविक्री, व्यापाराव्यवहारांचीं वचनें सारीं या वाम्पममध्यें नोंदली जात. युरोपियन लोकांशीं झालेले तहही या पद्धतीने केले गेले आहेत व त्याना त्या लोकांत अद्यापीही मान आहे. अस्तु.

या लोकाच्या इतर सामाजिक चालीरीति त्यांच्या त्या अवस्थेस अनुरूप अशाच होत्या. विवाहसंस्कार पवित्र व गंभीर मानला जात नसला तरी त्याला कांही रूप होतें. बालविवाह प्रचलित नव्हता; परंतु वडील माणसांच्या अनुमतीवाचून कोणाही स्त्रीपुरुषाला आपला जोडीदार निवडतां येत नव्हता. मुलाने वधू नियोजित झाल्यावर कांही भेट घेऊन वधूपित्याकडे जावयाचें अशी चाल होती. वधूपित्याने ती भेट स्वीकारल्यास तो विवाह कायम होई. लग्नसमारंभ अगदी साधा जातिभोजनापुरता असे. विवाहानंतर जावयाने सासऱ्याचे घरीं काही दिवस काढण्याची चाल कोठे कोठे प्रचलित होती. एक पुरुष अनेक बायका करूं शके. याच्या उलट स्त्रीला मात्र काही करता येत नसे. पुनर्विवाह व घटस्फोट याच्याही चाली त्या लोकात रूढ होत्या. घटस्फोटाला विशेष महत्त्व नव्हतें. स्त्रीपुरुष एकमेकावर नाखूश झालीं की, त्यानी खुशाल एकमेकांचा त्याग करावा आणि दुसरा जोडीदार पाहावा. इतकें असूनही त्या लोकात व्यभिचार, बीजसकर यांचें प्रमाण अत्यंत अल्प होतें. घाणेरडे रोग तर त्या लोकाना माहीतच नव्हते. संकर नसल्यामुळें त्या लोकांची प्रजा पिढ्यानपिढ्या एकसारखी व पूर्ण निर्व्यंग निपजे. युरोपियन लोकाना पहिल्या पहिल्यांदा इंडियन लोकांत शारीरिक व्यंग असलेला किंवा वेडा पिसा असा एकही मनुष्य आढळला नाही. रानटी लोकांतील हें पावित्र्य लक्षांत घेण्यासारखे आहे.

या लोकांत स्त्रियांना फरसा मान नव्हता. पुरुष हा स्वभावत: आळशी असे. शिकार करणें, मासे धरणें, झुंजा खेळून केसांचे झुबके मिळविणें आणि युद्धाची सामग्री जुळवणें एवढ्या गोष्टी पुरुषाकडे असत. त्याने शिकार करून घरीं आणून टाकिली की, त्याचें संसारांतील महत्त्वाचें काम संपलें. मग तो खुशाल चार आपल्यासारखे रिकामटेकडे

स्नेही जमवून तंबाकू ओढीत चकाट्या पिटीत काळ घालवी. बायकांना मात्र अनेक कामें करावीं लागत. लाकडावर लाकूड घासून अग्नि प्रदीप्त करणें, मांसमच्छ पकवणें, अपत्यांचें संगोपन करणें, विगवामची डागडुजी करणें, काठीने जमीन पोखरून मका लावणे व तंबाकूची लागवड करणें, कातड्याचीं वस्त्रें बनविणे, इत्यादि इत्यादि शेंकडो कामें तिच्याकडे असत. आणि त्या कामांखाली तिचा पिट्टा पडला तरी घरांतील पुरुष तिच्याकडे लक्ष देत नसत. त्या लोकाना युरोपियन लोकांचें स्त्रीदाक्षिण्य हास्यास्पद व तिरस्कारार्ह वाटे. आपसांत ते या विषयाची कुटाळकी करीत.

अमेरिकेची भूमि कापूस पिकविण्यास समर्थ असतांही रानटी इंडियनांना त्याचा शोध लागला नाही व त्याची त्यांना आवश्यकताही भासली नाही. निरनिराळ्या जनावरांच्या कातड्यापासून ते आपले शरीर रक्षण करीत. उन्हाळ्यात स्त्रीपुरुष कटिवस्त्र वापरीत. थंडीच्या दिवसात केसाळ जनावराच्या कातड्यापासून बनविलेले अंगरखे व विजारी वापरीत. शंख, शिंपा, शत्रूचे दांत, पक्ष्यांचीं सुंदर पिसें व हिंस्र पशूंच्या नख्या, इत्यादि वस्तूंपासून ते अनेक भूषणें बनवीत व त्यांच्या योगें आपला देह शृंगारीत. चेहऱ्यावर व अंगावर निरनिराळ्या रंगाचे पट्टे ओढून किंवा भडक रंगांत गोंदून घेऊन नटण्याचाही त्यांना मोठा नाद होता. भडक शेंदरी, तजेलदार निळा व अगदी काळा हे त्यांचे आवडीचे रंग होते. शत्रूवर चाल करून जाते वेळीं ते आपलीं स्वरूपें शक्य तितकीं भेसूर करून बाहेर पडत.

हे लोक रानटी व मासाहारी असले तरी स्वभावाने नृशंस नव्हते. उलट मनमिळाऊ, स्नेह जाणणारे, विनोदी, धीट व अत्यंत सोशीक असे होते. शत्रूवर दया करण्याचा थोरपणा त्यांना माहीत नव्हता पण त्याबरोबरच मित्रत्व दाखवून दगलबाजी करण्याचे ज्ञानही त्याना नव्हतें. जशास तसें असा त्यांचा सरळ व्यवहार होता. त्यांतले त्यांत त्याचा अत्यंत नामांकित गुण म्हणजे सोशीकपणा. देहाला वाटेल तेवढें दुःख होवो, तें मुद्रेवर दर्शविणें किंवा हाय हाय करणें ही गोष्ट ते लोक मोठी कमीपणाची मानीत. देहाला अगदी तुच्छ लेखणें व त्याच्यावर निसर्गाकडून किंवा शत्रूकडून केवढाही अत्याचार झाला तरी त्याबद्दल यत्किंचितही दुःख न दर्शविणें या गोष्टी तो मोठ्या मानाच्या समजे. या गुणाची

शिकवण त्यास अगदी बालपणापासून मिळे. लहानपणीं त्यांच्या मुलात या सोशीकपणाचे प्रयोग चालत. दहापांच मुलें एकत्र झाल्यावर सर्वांनी जळते कोळसे हातानी उचलून उघड्या खाकेंत आवळून धरावयाचे. जो मुलगा हूं की चूं न करील व सर्वांहून जास्त वेळ तो निखारा धरील तो मोठा शूर मानला जाई. बालपणापासून अंगीकृत केलेला हा गुण निसर्गाशीं झगडतांना त्या लोकाना चागला उपयोगीं पडला असेल, परंतु गौरकायाशीं संबंध आल्यावर मात्र त्याचा सोशीकपणा त्यांना पदोपदीं नडला ! स्वतःस सुसंस्कृत म्हणविणाऱ्या युरोपियनानी द्रव्यलोभापायीं त्या स्वभावतः निरुपद्रवी रानटी लोकांवर जे भयंकर अत्याचार केले त्यास मूळ कारण गौरकायांची राक्षसी वृत्ति तर खरीच; पण ताम्रवर्णीयांनी ते जुलूम निर्विकार मुद्रेने सोसले, हेंही एक कारण घडले असलें पाहिजे. कोणताही देहदंड मुकाट्याने व दुःख न दर्शवितां सोसल्यावर अत्याचारी मनुष्यास आपला छळ सुसह्य आहे व माणुसकीला फारसा सोडून नाही असें का वाटूं नये ?

अशा या खुळया सोशीक ताम्रवर्णीयाचा देवधर्मही सामान्य स्वरूपाचा होता. सृष्टीचें कार्य चांगल्या प्रकारें चालवून सर्वांना सुख देणारा असा एक भला देव आकाशात कोठेतरी आहे व त्याच्याच जोडीला मनुष्यास त्रास देणारा व त्याच्या मार्गात विघ्नें आणारा असा एक खट्याळ देव आहे अशी त्याची समजूत होती. चागल्या देवास भजण्याचें कारण नाही कारण तो स्वभावतःच दयाळू आहे; पण खट्याळ देव गप्प बसणारा नाही, त्याची उपासना केली तरच तो प्रसन्न राहील, असा विचार करून तो सुसरी, वाघ, भुतेंखेतें यांना भजत असे. पापपुण्य, इहलोक परलोक, पुनर्जन्म, पूर्वसंचित इत्यादि गोष्टी त्यास माहीत नव्हत्या. खिस्ती धर्माशीं संबंध आल्यावरही त्यास आपला पूर्वपरंपरेने चालत आलेला ओबडधोबड धर्म कनिष्ठ प्रतीचा वाटला नाही, किंवा खिस्तधर्माचा श्रेष्ठपणा पटला नाही. अस्तु.

कोलंबसाला व त्याच्या मागून गेलेल्या इतर लोकांना अमेरिकेमध्यें ज्या रानटी मनुष्यजाती आढळल्या, त्याची सामान्य स्थिति त्या काळीं वर वर्णन केल्याप्रमाणें होती.

पृथ्वीवरील इतर कोणत्याही मानव वंशाशीं या लोकांचें साम्य आढळत नाही. वर्ण, रूप, भाषा व संस्कृति या दृष्टीनेही ते अगदी भिन्न

दिसतात. यामुळें त्यांचें मूलस्थान कोणतें व त्याचा पूर्वेतिहास काय असावा हें जाणण्याची उत्कंठा वाटते; परंतु या गोष्टी अद्यापिही निश्चित स्वरूपांत ज्ञात झालेल्या नाहीत. हा इतिहास प्रकाशांत आणण्याच्या इच्छेने तद्देशीय इतिहासशास्त्रज्ञांनी व पुराणसंशोधकानी पुष्कळ प्रयत्न चालविले आहेत. त्यावरून असें दिसून येतें की, रेड इंडियन लोकाचें आगमन त्या देशांत होण्यापूर्वी तेथे बौद्धिक व सांस्कृतिक दृष्ट्या श्रेष्ठ असे एक दोन मानववंश नांदून गेले असावे. पण ते कसे नष्ट झाले व त्यांच्या जागीं रेड इंडियन कोठून व कसे आले हें एक कोडें आहे. तें केव्हा उलगडले जावो वा न जावो, त्याच्याशीं आपल्याला काहीच कर्तव्य नाही. एवढें स्पष्ट आहे की, पंधराव्या शतकानंतर युरोपियनांची जी लाट त्या देशावर जाऊन आदळली, ती त्या वेळच्या तेथील मूळ रहिवाश्याच्या नाशास कारणीभूत झाली. तसें पाहिलें तर ते लोक भेकड किंवा दुर्बल नव्हते. मल्लयुद्धाचा प्रसंग पडता तर त्यातही ते गौरकायांना हार गेले नसते. उलट भारीच झाले असते. तिरंदाजीमध्यें ते मोठे निष्णात होते; परंतु बंदुकीसारख्या घातक साधनापुढे त्यांचा जुनापुराणा तिरकमटा कसा तग धरणार? त्याची वन्यावस्था त्याना नडली! युरोपियनाचें बुद्धि-बल व शस्त्रबल त्यांना अजिंक्य झालें. बरें, ते आपण होऊन युरोपिय-नांच्या वाटेस गेले म्हणावें; तर तसेंही झालें नाही. उलट सर्व प्रकारच्या भिन्नत्वामुळें हे गौरकाय लोक देवलोकींचीं माणसें असावीं असा त्याना भास झाला. या भोळ्या कल्पनेस अनुसरून त्यानी त्या लोकांचें मना-पासून स्वागत केले व त्याना यथाशक्ति साह्यही पोंचविलें. पण स्वार्थी व नृशंसवृत्तीच्या युरोपियनांना त्या चांगुलपणाचे काय होय! त्यांनी धर्मा-धर्म व साधी माणुसकीही गुंडाळून ठेवून त्या लोकावर वरवंटा फिरविला!

अशा प्रकारें त्या रानटी लोकांचा युरोपियनांपुढे पाडाव झाला तरी त्याच्यापासून घेण्या-शिकण्यासारख्या कांही महत्त्वाच्या गोष्टी त्यांना आढ-ळल्या. मका हें चटकन लागवडीस येणारें, सुलभतेने पिकणारें व मुबलक पैदा होणारें धान्य, तंबाकूसारखी अमृतवल्ली व बटाट्यासारखा उपयुक्त कंद हे जीवनोपकारक पदार्थ त्यांना रेड इंडियनांकडूनच प्राप्त झाले. या-शिवाय झाडाच्या चिवट सालींपासून छोट्या नावा ( Birch BarkCanoe ) बनविण्याची विद्या व मोक्यासिन ( Moccasin ) नांवाचा बर्फावरून घस-

रत पळत जाण्याचा बूट या दोन अत्यंत कल्पकतेच्या गोष्टी ते या रानटी लोकांपासूनच शिकले. पुढे युरोपियनांना अमेरिकेंत जाऊन वसाहती करण्याचा प्रसंग आला, त्यावेळीं त्यांना इंडियनलोकांनी दिलेलें हें विद्याधन फारच उपयोगीं पडलें. तें नसतें तर युरोपियन लोकाचा त्या देशात निभाव लागणें पुष्कळच कठीण होतें. उलटपक्षीं रेड इंडियन रानटी असला तरी त्यालाही बुद्धि व गुणग्राहकता याचें थोडेंसे देणें होतेंच. त्यानेंही युरोपियन लोकांच्या कांहीं विद्या चटकन उचलल्या. बंदुकीचें व अश्वारोहणाचें महत्त्व त्यास तात्काल पटलें. अचूक तिरंदाजीमध्यें तो मुळांतच निष्णात होता. तेव्हा बंदुकीची नेमबाजी शिकणे त्यास मुळींच कठीण गेले नाही. घोड्याच्या उघड्या पाठीवर बसून घोडा भरधांव फेकण्यांत त्याने आपल्या गुरूवरही ताण केली. परंतु युद्धशास्त्रातील या दोन महत्त्वाच्या विद्या साध्य करून घेतल्यावरही त्यास आपला नाश टाळता आला नाही. बंदूक व तिला लागणारी दारू व गोळया कशा बनवितात, याचा त्याने कधीच विचार न केल्यामुळें त्याची फसगत झाली. बंदुकीची दारू हें एक प्रकारचें बीं आहे व तें शेतात पेरल्याने उगवते अशी थाप देऊन युरोपियन लोकानी त्यास अनेकदा फसविलें. त्यामुळें तो चिडला पण सावध झाला नाही.

पण या रानटी लोकांचा खरा नाश त्यानी युरोपियन लोकांचे कांहीं घाणेरडे दुर्गुण उचलल्यामुळें झाला. आपसांत विश्वासघात करणें किंवा गोड बोलून गळा कापणें ही कपटविद्या तो जाणत नव्हता. त्याचप्रमाणें व्यभिचार करण्याचेंही त्यास ज्ञान नव्हतें; आणि मद्य तर त्याच्या स्वप्नांतही त्यास माहीत नव्हतें. पण या तीन्ही गोष्टी त्याने युरोपियन लोकांपासून घेतल्या. तंबाकूखेरीज मादक पदार्थ माहीत नसलेल्या त्या रानटी लोकांना मद्याची चटक पहिल्या क्षणाला लागली. अल्पावधींत तो पुरा मद्यपी बनला! मग त्याने स्वजन, स्वजाति व स्वभूमि यांच्याशीं द्रोह करण्यामध्यें कांहीं बाकी ठेविली नाही. ‘ खरा मनुष्य ’ या साध्या परंतु गोड पदवीपासून तो कायमचा ढळला. त्याची ही मद्याची चटक गोऱ्या लोकांच्या स्वार्थसाधनाला चांगली उपयोगी पडली. प्रसंग पडेल त्याप्रमाणें त्यांनी कधी त्यास मित्र म्हणून लुबाडलें व कधी शत्रु लेखून कापून काढलें. कधी दोन राष्ट्रांनी त्याचा बाधाप्रमाणें उपयोग करून

घेतला आणि कधी त्याची ढाल बनवून स्वतःचें रक्षण केलें! 'अमेरिकें-तील संयुक्त संस्थाने' उदयास येताना हे सारे प्रकार घडले व त्यांत मद्यवश इंडियन भरडला गेला!

---

# प्रकरण सातवें

# वसाहतीचे पहिले प्रयोग

कोलंबसाने अमेरिकेचा शोध लाविल्यास आता उणीपुरीं ऐंशी वर्षे लोटून गेलीं होतीं. हा काळपर्यंत त्या भूखंडाचें हळूहळू संशोधन होत गेले आणि स्पेनचें जुलमी आधिपत्यच त्यावर चालू राहिलें. युरोपखंडातील इतर छोटींमोठीं राष्ट्रें आपआपल्या धाद्लींत असल्यामुळें स्पेनच्या या ठेव्याकडे कोणाचेंही विशेष लक्ष गेलें नाही. अगदी आरंभाला इंग्लंड व फ्रान्स या दोन देशानी या बाबतींत थोडीशी चळवळ केली होती; पण ती त्यांना शेवटपर्यंत निभावता न आल्यामुळें स्पेनचा मार्ग निष्कटक राहिला. स्पेनने मात्र आपलें स्वामित्व टिकविण्याकरितां आपले अधिकारी सशस्त्र सैन्यासह तिकडे रवाना करीत राहण्याची प्रथा चालू ठेविली, द्रव्यलोभाने लुटारू लोकानाही तिकडे जाऊन धुमाकूळ घालण्याची परवानगी दिली आणि इथे तिथे काही भुरट्या वसाहतीही स्थापन केल्या. परंतु यापलीकडे त्यास त्या भूमीचें विशेष महत्त्व वाटलें नाही. वास्तविक कोलंबसाच्या द्वारे त्या राष्ट्रास हें एक फार मोठें घबाड सहजीं लाधलें होतें. सुपीक भूमि, आरोग्यप्रद हवापाणी व शेतीभातीला अनुकूल असें हवामान या त्रयीमुळे युरोपांतील कोणत्याही देशापेक्षा अमेरिका श्रेष्ठ होती. तेव्हा आपल्या वाढत्या प्रजेपैकी काही कुटुंबें तिकडे धाडून नवा स्पेन वसवावा व आपल्या जातीचा नवा विस्तार करावा, ही कल्पना राजा, प्रजा किंवा मंत्री यांपैकी कोणाला तरी सुचण्यास हवी होती. परंतु तसें झालें नाही. मुळापासून स्पेनची दृष्टि केवळ सोन्याचांदीवर होती आणि तीस अनुसरून त्याने अनेक खटाटोप व अत्याचार केले. त्या समृद्ध व सुंदर भूमीचा चातुर्याने उपभोग घेण्याच्या ऐवजीं एखाद्या भुरट्या

चोराप्रमाणे त्याने तिला लुटण्याचा लुबाडण्याचा मात्र प्रयत्न केला. आणि गव्हाणींतील श्वानाप्रमाणें आपलें स्वामित्व तेवढें राखून ठेविलें. कदाचित् युरोपमध्यें त्याचे जें प्रस्थ माजत चाललें होतें, त्याच्या धुंदींत त्यास अमेरिकेकडे नीटसें पाहतां आलें नसेल. पण त्याने मिळालेल्या देणगीचा म्हणावा तसा उपयोग करून घेतला नाही एवढें बरीक खरें. उत्कर्षाची परमावधि झाल्यावर राष्ट्रास फार लाबचें दिसेनासें होतें. पण सुसंधि मोठी मानिनी आहे. तिचा योग्य तो सत्कार न झाल्यास ती एकाकडून दुसऱ्याकडे जाते. स्पेनला अमेरिकेची योग्यता समजत नाही असें दिसून येताच संधीने इंग्लंडकडे तोंड फिरविले. हा चमत्कार का व कसा झाला, हें पाहण्यास आपणास युरोपच्या त्या वेळच्या एकंदर परिस्थितीची थोडी-शी ओळख करून घेतली पाहिजे, म्हणून आपण आता तिकडे वळूं.

सोळाव्या शतकात युरोपचें एकंदर वातावरण मोठें अंदाधुंदीचें झालें होते. बहुतेक लहान मोठीं राष्ट्रें परस्पराशीं कलागती करून झगडत होतीं व कोणी कोणास जुमानीत नव्हतें. सर्वांत प्रबल सत्ता स्पेनची व धार्मिक वर्चस्व रोमनगरस्थ पोप महाराजाचें. पण यांपैकी कोणालाही प्रजे-च्या सुखादुःखाची किंवा हिताहिताची पर्वा नव्हती. धर्माच्या नांवाखाली पोप धर्मगुरूपासून तो खालच्या पाद्यापर्यंत सर्वांकडून अन्याय, अत्या-चार सर्रास चालू होते. बहुतेक धर्मपीठें, मठ, देवालयें व क्षेत्रें नीति-भ्रष्ट धर्माधिकाऱ्याच्या सावळ्यागोंधळाने किटून गेलीं होती आणि त्यावि-रुद्ध चकार शब्द काढण्याइतकेंही स्वातंत्र्य सामान्य प्रजेला नव्हतें. 'बळी तो कान पिळी' व 'धनवान् तो पुण्यवान्' हा न्याय सर्वत्र अवलंबिला जात होता. त्या कालच्या बहुतेक राजाचा राजधर्म अमक्या गादीवर हक्क सांग, तमक्या स्त्रीशीं लग्न कर, कोणाला तुरुंगात टाक, कोणाचा वध कर, कोणा दुष्टाला डोक्यावर चढवून ठेव, कोणाला भलतेच अधिकार दे, अमूक विद्वान् नवे सिद्धांत प्रतिपादन करतो त्याचा छळ कर, अमुकाने अमूक ज्ञान शोधून काढलें पण तें बायबलाशी समत नाही, तर तें जाळून टाक अशा प्रकारचा होता व त्यास पोपचा पूर्ण पाठिंबा मिळत होता. या अशा अनियंत्रित राजसत्तेमुळें व अनीतिमूलक धर्मसत्तेमुळें सत्य, न्याय, शांति, समाधान, पावित्र्य याचें निकृंतन झालें व प्रजेचें जीवित, चित्त व वित्त अत्यंत धोक्यात सापडलें! व्यापार डबघाईला आला, शेतकरी

नागवला गेला आणि सामान्य व्यवहारही कष्टप्रद होऊन बसला! बेदिल झालेलीं सैन्ये सेनापतीवाचून भटकूं लागलीं. चोराजारांचा सुळसुळाट झाला व कलहकल्लागती माजल्या! कोणतेंही स्वातंत्र्य नाही, खरें बोलण्याची सोय नाही, जीविताची शाश्वती नाही व अन्यायप्रतीकाराचें सामर्थ्य नाही, असा फार मोठा कोंडमारा सामान्य जनतेचा होऊन बसला! ही स्थिति कोठवर निभणार? प्रजेच्या आंतल्या आत धुमसणाऱ्या तडफडाटाने पेट घेतला! धीट पाठ व मृत्यूस तुच्छ लेखणाऱ्या विद्वानाकडून व नीतिमान धर्मनिष्ठाकडून, राजा प्रजानुरंजनार्थ आहे की तिला सतावण्याकरितां आहे? धर्म प्रजेच्या कल्याणाकरिता आहे की सर्वस्वनाशाकरितां आहे? धर्मशासक धर्माच्या प्रसारार्थ की अधर्माच्या वर्धनार्थ आहेत?—असे उद्गार निघूं लागले! मुद्रणकला आता प्रतिष्ठेला पोचली असल्यामुळें विद्वानाचे व नीतिमानाचे हे संदेश तिच्या साह्याने घरोघरीं पोचले. अल्पावकाशांत मार्टिन ल्यूथर व जॉन केलविन हे दोन थोर पुरुष खिस्ती धर्माच्या सुधारणेकरिता उत्साहाने पुढे आले त्यांनी आपल्या अमोघ वाणीने लोकांचीं अंतःकरणें आपल्याकडे खेचून घेतलीं आणि धर्माचें व धर्माधिकाऱ्याचे प्रचलित स्वरूप किती निंद्य व अधःपतित आहे हें त्याना पटवून दिलें. त्यांच्या या कृतीने पोपच्या धार्मिक सत्तेला मोठाच सुरुंग लागला व त्यामुळें राजांचीं सिंहासनेंही डळमळीत झालीं! अर्थात् ही अमर्यादा मदोन्मत्त झालेली कोणती राजसत्ता किंवा धर्मसत्ता मुकाट्याने सहन करील? धर्मदंड व राजदंड एकत्र आले व त्यांनी व उग्ररूप धारण करून हें तेज जागच्या जागीं दडपून टाकण्याकरिता जोराचा प्रयत्न चालविला; पण त्याना त्यांत म्हणावें तसें यश आलें नाही. धर्मसुधारणेच्या ज्वाला सगळीकडे भडकत चालल्या!

इंग्लंड समुद्रापलीकडे अगदी तुटून असलें तरी तें खिस्तधर्मीय असल्यामुळें तेथेही या सुधारणेच्या ठिणग्या उडाल्या! तेथील राजा आठवा हेन्री धार्मिकदृष्ट्या पोपच्या अंकित होता व त्याला ही आग नकोच होती. तेव्हा त्याने तशी दडपादडपी तात्काळ चालू केली; पण त्यांत त्याने आपला एक स्वार्थ साधून घेतला. काही खाजगी कुरापतीमुळें त्याचें व पोपचें बिनसलें होतें व त्यास पोपची धर्मसत्ता नकोशी झाली होती. ती त्याने या संधींत उडवून टाकली! इंग्लंडचें धर्मपीठ

त्याने स्वतंत्र केलें आणि तेथील धर्माध्यक्ष इंग्लंडचा सिंहसनाधिष्ठ राजाच असला पाहिजे, असा कायदा करून त्याने रोम येथील मुख्य पीठाशीं असलेलें आपले माडलिकत्व नष्ट करून टाकलें! इंग्लंडच्या राजाची ही कारवाई पोपला रुचली नाहीच; पण त्यातल्या त्यांत स्पेनच्या राजाला ती मुळींच रुचली नाही. कारण, पवित्र रोमन पातशाहीचा तो प्रमुख होता. इंग्लंडची ही धिटाई त्यास कशी खपणार?

या सुमारास स्पेनचें व इग्लंडचें मोठें सख्य होतें अशांतला भाग नाही. विशेष बिनसत जाऊं नये म्हणून दोन राजघराण्यात शरीरसंबंधही जोडले गेले होते. परंतु आठव्या हेनरीच्या वरील कृतीने स्नेहाचें मूळ तुटलें आणि कलहाला अंकुर फुटले.

मार्टिन ल्यूथरने सुरू केलेलें धार्मिक सुधारणेचें आदोलन पोपची किंवा राजेरजवाड्याची जुलमी सत्ता न जुमानता वाढीला लागलें व सामान्य जनतेमध्यें जोराची जागृति झाली. पण त्याबरोबर या चळवळीच्या पोटीं द्वैतभावाचे एक नवें संकट जन्मास आलें. तें म्हणजे ख्रिस्ती धर्मात दोन पंथ निर्माण झाले हे होय. जुन्या धर्माचे अभिमानी रोमन कॅथोलिक व नव्या धर्माचे पुरस्कर्ते प्रॉटेस्टंट. अल्पावधींतच हे दोनही पंथ एकमेकाचे कट्टे वैरी बनले. कांही देश व राजे रोमन कॅथोलिकचे अनुयायी व काही प्रॉटेस्टंट पंथाचे अनुयायी झाले. पूर्वीपासून चालू असलेली लाथाळी विशेष जोमाने चालविण्यास ह्या पंथभेदामुळे एक नवीन साधन उपस्थित झालें. प्रजेच्या त्रासांत आणखी भर पडली. योगायोग असा की, स्पेन हें मुळापासून रोमन कॅथोलिक पंथाकडे झुकलें व इंग्लंडात प्रॉटेस्टंटपंथास उठाव मिळाला. तेव्हा त्या दोघातील कलह आणखी वाढला.

अशा घटना होता होतां इ. स. १५५८मध्यें इंग्लंडच्या सिंहासनावर एलिझाबेथ ही इतिहासप्रसिद्ध राणी अधिष्ठित झाली. ही प्रॉटेस्टंटपंथाची अभिमानी होती. अर्थात् या राजाश्रयामुळें तो पंथ इंग्लंडमध्यें चांगलाच फोफावला! राणी एलिझाबेथ मोठी धोरणी, समंजस, गुणग्राहक, सुसंस्कृत होती. त्याचप्रमाणें धर्ममताचे बाबतींत ती उदारमनस्क व नेमस्त होती. पूर्वीच्या हेकड राजाप्रमाणें अवास्तवं धर्माभिमान बाळगून तिने भिन्नपंथीय लोकांचा छळ केला नाही. ह्या नेमस्त धोरणामुळें ती आपल्या प्रजेंत तात्काळ

लोकप्रिय झाली व दोन्ही पंथाचे लोक तिला वानूं लागले. हिच्या कारकी-र्दीचें एकंदर धोरण प्रजानुरंजनाचें असल्यामुळें या वेळीं इंग्लंडचा चांगला भाग्योदय झाला. लोकाचें राजकीय व धार्मिक स्वातंत्र्य मर्यादित असलें तरी कोणालाही अकारण त्रास होण्याचें थांबलें. विद्या, व्यापार, कला-कौशल्य, उद्योगधंदे, शौर्य - धैर्य व लोकशिक्षण या गोष्टींना उत्तेजन मिळूं लागलें. बेकन, शेक्सपियर, रॅली, ड्रेक इत्यादि नामांकित पुरुष याच काळीं उदयास आले. आणि भविष्यकालातील ब्रिटिशसाम्राज्याचा सूत्रपातही याच वेळीं झाला.

अशा सुवर्णसंधीमध्ये इंग्लंडच्या काही नाविकाचें लक्ष अमेरिकेकडे वळले. स्पेनशीं मूकस्वरूपांत चालू असलेली स्पर्धा त्याच्या बुडाशीं होती. इ. स. १५७६ सालीं फ्रोबीशर नावाच्या दर्यासारंगाने अमेरिकेपर्यंत एकं-दर तीन सफरी केल्या. त्यांचा उपयोग त्यास किंवा इंग्लडास म्हणण्या-सारखा झाला नाही. पण लोकाच्या पराक्रमास एक नवा मार्ग खुला झाला.

फ्रोबीशरच्या स्वाऱ्या सुरू आहेत तोंच सर फ्रांसीस ड्रेक नांवाचा आणखी एक लढवय्या नाविक पुढे आला. खरें म्हणजे दर्यावर वाट-मारी करणारा हा एक लुटारूच होता. परंतु परिस्थितीचा पगडा त्याच्या मनावर होऊन तो पक्का स्वदेशाभिमानी बनला ! स्वभावतः तो मोठा शूर व धडाडीचा पुरुष होता. अटलांटिक महासागरावर स्पेनचें स्वामित्व असावें व त्याच्या जहाजानी अमेरिकेकडे जाऊन लूटमार करावी आणि पुन्हा मोठ्या दिमाखाने परत मिरवीत यावें, ही गोष्ट त्यास मोठी दुःखाची व अपमानास्पद वाटूं लागली. तेव्हा त्याने स्पेनचें आरमारी वर्चस्व हाणून पाडण्याचा निश्चय केला. त्याच्याजवळ साधनसामग्री अल्प असतांही त्याने भर समुद्रांत स्पेनचीं जहाजें लुटण्याचा तडाखा सुरू केला व त्यांत त्यास विलक्षण यश आलें ! आपण सुरू केलेल्या कलागतीने इंग्लंड व स्पेन यांच्यामध्यें धुमसत असलेलें वैर पेट घेईल व कदाचित त्याचा परिणाम वाईट होईल असें भय ड्रेकला स्वप्नांतही शिवलें नाही. जेणेंकरून समुद्रावरील स्पेनची सत्ता खिळखिळी होईल व इंग्लंडच्या दर्यावर्दी लोकांची त्यास दहशत बसेल, असा पराक्रम करण्याचा त्याने विडाच उचलला होता. स्पेनकरितां मॅगेलन नांवाच्या नाविकाने पृथ्वी-प्रदक्षिणा करून मोठें यश मिळविलें होतें. तें सुद्धा निष्प्रभ व्हावें म्हणून

ड्रेकने अल्प साधनावर पृथ्वीला वळसा घालण्याचें ठरविलें आणि तोही निश्चय तडीला नेला. यावेळींही त्याने स्पेनचीं जहाजें आढळलीं तेथे लुटलीं!

या सुमारास स्पेनच्या गादीवर दुसरा फिलिप नांवाचा राजा आला होता. हा विचाराने कोता व पक्का धर्मवेडा होता. इंग्लंडचा तो मनापासून द्वेष करी. ड्रेकने सुरू केलेला उपद्याप त्यास मुळींच खपला नाही. त्याने मोठ्या तावातावाने या अन्यायाबद्दल इंग्लंडला जाब विचारिला व याद राखून असा, माझ्याशीं प्रसंग आहे अशी धमकी दिली. राणी एलिझाबेथ व मंत्रिमंडळ एकदम युद्धांत पडूं इच्छीत नव्हतें. त्यांनी ड्रेक हा चांचा आहे, त्याचा बंदोबस्त आम्हांला करतां येत नाहीं, असें म्हणून कानावर हात ठेविले. हें उत्तर फिलिपला मुळींच पटलें नाही. मनांतून जळफळत तो संधीची वाट पाहूं लागला.

इकडे इंग्लंडच्या नाविकांचे अमेरिकेकडे जाऊन संशोधन करण्याचे प्रयत्न चालूच होते. अद्यापिही तें भूखंड किती विस्तृत आहे याची अटकळ कोणाला झाली नसल्यामुळे तें ओलांडून हिंदुस्थानास जाण्याचा एखादा नवा मार्ग सापडल्यास शोधून काढावा असाच बहुतेकांचा हेतु होता. ड्रेकनंतर असा प्रयत्न हम्फ्रे गिलबर्ट याने आरंभिला. हा गृहस्थ धनाढय असून इंग्लंडच्या दरबारांतील प्रसिद्ध राजकारणी सर वॉल्टर रॅली याचा सावत्र भाऊ होता. रॅलीच्या प्रोत्साहनाने त्याने इ. स. १५७८ सालीं एक व इ. स. १५८३ सालीं दुसरी अशा दोन सफरी केल्या. त्या म्हणाव्या तितक्या यशस्वी झाल्या नाहीत व दुसऱ्या सफरींत हम्फ्रे गिलबर्ट वादळांत सापडून मृत्यूही पावला. पण त्याने अमेरिकेसंबंधीं बरीच माहिती मिळवून ठेविली होती, ती रॅलच्या उपयोगीं पडली.

त्या कालीं इंग्लंडमध्यें जे खरे थोर पुरुष होऊन गेले, त्यांत वाल्टर रॅलीची गणना प्रामुख्याने केली पाहिजे. हा श्रीमान कुळांत जन्मला असतांही मोठा विद्याव्यासंगी, शूर योद्धा, नाविक, मुत्सद्दी, लेखक व द्रष्टा होता. यामुळें राणी एलिझाबेथला तो मोठा प्रिय असून दरबारांतही त्याचें चांगलें वजन होतें. इंग्लंडविषयीं त्यास मोठा अभिमान असून त्याच्या हितवृद्धयर्थ तो मनापासून झटत असे. कोणत्याही नव्या गोष्टीकडे तो या दृष्टीने पाही आणि खोल विचार करी. आतापर्यंत अमेरिकेविषयीं जेवढें ज्ञान प्रसृत झालें होतें, तें रॅलीच्या दृष्टिपथांतून

चुकलें नव्हतें. हम्फ्रे गिलबर्टने मिळविलेली माहितीही त्यास विचारार्ह व प्रोत्साहक वाटली. तीसंबंधीं विचार करीत असतां ' या नव्या भूखंडांत इंग्रज लोकांनी जाऊन कायमच्या वसाहती कां करूं नयेत ?' अशी कल्पना त्यास स्फुरली. लागलीच ती त्याच्या मनांत दृढमूल झाली. अमेरिकेंत जाऊन वसाहती करण्यांत इंग्लंडचें निःसंशय हित आहे, असें त्यास पक्कें वाटलें. त्याप्रमाणें त्याने एक योजना तयार केली आणि ती राणीपुढे ठेवली. तिलाही ती मान्य झाली. तिने त्यास अमेरिकेत जाऊन वसाहती करण्याबद्दलची सनद बहाल केली. या सनदेस धरून रॅलीने स्वखर्चाने प्रथमतः एक चौकशीमंडळ अमेरिकेंत धाडलें. इ. स. १५८४ सालीं हें मंडळ अमेरिकेंत आज जेथे कॅरोलिना नांवाचें संस्थान दाखविलें जाते, त्या किनाऱ्यास लागलें. त्यातील लोकानी वसाहतीचें स्थल निश्चित केलें आणि जरूर ती माहिती घेऊन तें परत फिरलें. त्यांनी राणीस व रॅलीस जें प्रतिवृत्त सादर केलें, त्याचा आशय असा होता की, ' उद्योगी इंग्रज कुटुंबें, दूधदुभत्याचीं व शेतीचीं जनावरे आणि औतें एवढी सामग्री अमेरिकेंत जाईल तर तेथे प्रति स्वर्ग अवतरेल !'

हें प्रसादचिह्न पाहताच राणीस आनंद झाला व रॅलीस मोठा उत्साह चढला. राणीने या नव्या प्रदेशाचें आपले नावें नामकरण केले. ती स्वतः Virgin Queen (कुमारी राज्ञी) म्हणून प्रसिद्ध होती. रॅलीची ही नवी वसाहत त्याच पद्धतीने Virgin (व्हर्जिन) अनुपभुक्तच होती. म्हणून तिचें नांव ' व्हर्जिनिया ' ठेवण्यात आले.

इ. स. १५८५ सालीं रॅलीने १०८ माणसाचा एक काफिला वसाहतीकरितां तयार केला. त्यांना सर्व साधनसामुग्री जुळवून दिली आणि राल्फ लेन नामक एका शहाण्या मनुष्यास सर्वाधिकारी नेमून व्हर्जिनियाकडे रवाना केले.

रॅलीने साधक बाधक विचार करून वसाहतीचा सूत्रपात केला असल्यामुळें ती यशाला येण्याचा संभव पुष्कळच होता. परंतु कोणतेंही चांगलें कार्य एकदम सफल होऊं नये असा परमेश्वरी संकल्पच आहे की काय कोण जाणे ! रॅलीची वसाहत एका वर्षांत मोडकळीस आली. मुख्याधिकारी लेन हा योग्य मनुष्य होता परंतु बाकीचे लोक त्या कष्टमय

कार्यास अगदीच अयोग्य होते. त्यांना त्या भयाण देशांत चैन पडेना. ते कंटाळून स्वदेशीं परत आले !

पहिला डाव अशा प्रकारे फिसकटलेला पाहून रॅलीस थोडासा खेद वाटला. दरबारातही त्याची थोडीशी कुचेष्टा झाली. पण तेवढ्याने अंगीकृत कार्य सोडून देण्याइतका तो दुबळया मनाचा नव्हता. अमेरिकेत वसाहती झाल्या पाहिजेत व त्या नावारूपाला आल्यावाचून राहाणार नाहीत, असा त्यास विश्वास होता. पहिल्या अपयशाने न गांगरता किंवा निराश न होता, तिच्या तयारींत काय चुकलें असावें याचा त्याने पुन्हा विचार केला. तेव्हा त्यास आढळून आले की, वसाहतीला आपण सारे पुरुष पाठविले ही चूक झाली. गृहिणीवाचून घर नाही व घरावाचून स्थाईकपणा नाही. म्हणून त्याने दुसऱ्या सफरींत स्त्रीपुरुषमिश्रित कुटुंबे पाठविण्याचें ठरविलें. इ. स. १५८७ सालीं त्याने नव्या वसाहतीकरिता नवी योजना केली आणि व्हाईट नावाच्या अधिकाऱ्यास नेमून जहाजें हाकारली ! या जमावात व्हाईटची मुलगी, जावई ही माणसेंसुद्धा होतीं. अमेरिकेच्या किनाऱ्याला ही टोळी योग्य अवकाशाने पोचली. व्हाईटची कन्या—मिसेस डेअर—ही गरोदर होती, ती या नव्या प्रांतांत प्रसूत झाली व तिला एक कन्या झाली. अमेरिकेच्या भूमीवर इंग्लिश मातापित्याच्या पोटीं जन्मास आलेलें हें पहिलें अपत्य. या नव्या कन्येचें नांव व्हर्जिनिया असें ठेवण्यात आलें. नव्या वसाहतीस प्रारंभ झाला. सगळीकडे व्यवस्था नीट लागलेली पाहून व्हाईट नवी कुमक आणण्याकरितां इंग्लंडला परतला. वास्तविक तो लागलाच परत फिरणार होता. परंतु कांहींना कांही अडचणी येऊन त्यास तीन वर्षेपर्यंत अमेरिकेस जाता आलें नाही. पुढे तो आला. पण आश्चर्य असे की, सारी वसाहत नाहीशी झाल्याचें त्याच्या निदर्शनास आलें ! अगदी एकही मनुष्य आढळलें नाही. त्याने पुढे आजूबाजूचीं जंगलें तुडवून पुष्कळ शोध घेतला; पण काही उपयोग झाला नाही. त्या वसाहतींतील सारींच्या सारीं माणसें अन्नाभावीं मृत्यमुखीं पडलीं, की रानटी इंडियनांनी त्यांस कापून काढलें, की आणखी काही उत्पात होऊन सर्वांचा नाश झाला, याचा कांहीच थांग लागला नाही. पुढे कित्येक वर्षे या एका-

एकी नापत्ता झालेल्या वसाहतीच्या शोधार्थ प्रयत्न चालू होते. परंतु ते सारे निष्फल झाले ! हें गूढ आजतागायत तसेंच कायम आहे.

रॅलीचा दुसरा प्रयत्नही अशा चमत्कारिक तऱ्हेने फसलेला पाहून त्यास मोठी निराशा वाटली. या कार्यात त्याने स्वताच्या पदरचे पांच सहा लाख रुपये वेचले होते व तो निष्कांचन बनला होता. कदाचित् आणखी एकदा त्याने प्रयत्न केला असता; परंतु पुढे त्याचेच ग्रह फिरले. राणी एलिझाबेथची त्याच्यावर अवकृपा झाली व त्यास कारावास भोगावा लागला. इंग्लंडच्या हिताकरितां त्याने अविश्रात परिश्रम घेतले असतांही त्याचें चीज पुढच्या राजवटीत झालें नाही. उलट त्यास फासावर लटकविण्यांत आले! असो.

अमेरिकेमध्यें आपली प्रजा पाठवून वसाहती करण्याचे इंग्लंडचे प्रयत्न इतर कोणाच्या ध्यानीं आले नाहीत तरी स्पेनचें तिकडे लक्ष होतें. अर्थात् इंग्लंडचा हा नवा लुब्रेपणा त्यास खपला नाही. आपल्यासारख्या प्रबल राष्ट्राच्या सत्तेखाली असलेल्या भूभागात येऊन इंग्लंडसारख्या तुच्छ राष्ट्राने गडबड करावी हें त्यास कसें रुचणार? आतापर्यंत त्याने इंग्लंडचे कितीतरी अपराध दुर्लक्षिले होते. पण यापुढे असें दुर्लक्ष उपयोगाचें नाही, असें राजा फिलिप याने ठरविलें. त्याने इंग्लंडवर हल्ला चढविण्याकरितां 'आरमाडा' (Armada) नांवाचें एक प्रचंड आरमार तयार केलें आणि इ. स. १५८८ सालीं स्वारी केली ! पण इंग्लंडही बेसावध नव्हतें. त्यानेंही न डगमगतां निकराने तोंड दिलें! स्पेनची तयारी प्रचंड असली तरी तींत व्यवस्था नव्हती ह्मणा किंवा त्याचें दैव त्यास प्रतिकूल झालें ह्मणा, इंग्लंडने प्रतिहल्ला चढवितांच स्पेनच्या आरमारांत गोंधळ उडाला ! त्यांतच समुद्रावर एक प्रचंड वादळ उठलें व त्यानेंही स्पेनचा पाठपुरावा केला ! वाऱ्यावर भूस उडून जावें त्याप्रमाणें स्पेनच्या आरमाराची स्थिति झाली ! विजयश्रीने इंग्लंडच्या गळ्यांत माळ घातली ! या पराभवाने स्पेनचें कंबरडेंच मोडलें. त्याची अटलांटिक महासागरावरील सत्ता संपुष्टांत आली; सुसंधीने इंग्लडकडे आपलें तोंड वळविलें व अमेरिकेची भाग्यसूत्रें अप्रत्यक्षत: इंग्लंडकडे गेलीं !

---

# आठवें प्रकरण

## नव्या सनदा व नव्या वसाहती

उद्योगी इंग्लिश कुटुंब अमेरिकेंत पाठवून तेथे त्यांच्याकरवीं इंग्लंडच्या नव्या वसाहती स्थापण्यामध्यें रॅली विफलमनोरथ झाला असला तरी, मरेपर्यंत त्यास अशी खात्री होती की, आज ना उद्या इंग्लंडला वसाहतीचा प्रश्न हातीं घ्यावा लागेल. म्हणून त्याने भविष्य वर्तवून ठेविलें की, भविष्यकालीं अटलांटिकाच्या पलीकडे इंगीलश लोकांनी स्थापलेलें एक नवें साम्राज्य उदयास येईल. रॅलीची ही भविष्यवाणी मात्र फोल ठरली नाही. पाव शतकाच्या आतच त्याच्या आशाबीजाला अंकुर फुटले.

स्पेनचें अजिंक्य आरमार उध्वस्त करून इंग्लंडने त्यावर जो विजय मिळविला तो जितका अद्भुत होता तितकाच त्यास प्रोत्साहकही होता. त्या विजयानंतर इंग्लडच्या एकंदर परिस्थितींत मोठाच पालट पडला. आता त्यास बाहेरून परचक्र येण्याची धास्ती राहिली नाही, समुद्रावरील वर्चस्व त्याच्या वाट्याला आले आणि इतर राष्ट्रांवर त्याचा थोडासा वचक बसला. व्यक्तीला काय किंवा राष्ट्राला काय धाडसाने अंगीकारिलेल्या एखाद्या कार्यांत यश आलें म्हणजे त्यास नवे पराक्रम करण्याचें स्फुरण चढते. इंग्लंडला आता अशीच वीरश्री चढली. तें मुळापासून व्यापारी राष्ट्र असल्यामुळें त्याच्या पराक्रमाची दृष्टि तिकडेच वळली. इ. स. १५९९ सालीं तेथील व्यापाऱ्यानी प्रसिद्ध ईस्ट इंडिया कंपनी स्थापन करून हिंदुस्थानाकडे मोर्चा वळविला.

अमेरिकेकडील सफरी तितक्याशा फलद्रूप झाल्या नव्हत्या; पण तिकडचा नाद धाडसी नाविकांनी सोडला नव्हता. कांही लोक नवीन आडाखे बांधून त्या धांदलींत होतेच. त्यापैकीच एकाने इ. स. १६०२ सालीं एक विशेष पराक्रम करून दाखविला. याचें नाव गोसनोल्ड. आतापर्यंत अमेरिकेकडे जाण्याचे युरोपियन लोकाचे दोनच मार्ग ठरलेले होते. एक दक्षिणदिशेच्या रोखाने वेस्टइंडीज बेटावरून जाण्याचा आणि दुसरा उत्तरेच्या रोखाने न्यू-फौंड-लंडवरून कानडाच्या किनाऱ्यावर उतरण्याचा. पण हे दोन्ही मार्ग लांबचे व जिकिरीचे होते.

गोसनोल्डने ते दोन्ही टाळले व आपला एक सरळ पश्चिम दिशेचा मार्ग काढिला ! त्यावेळेच्या मानाने गोसनोल्डचें हें धाडस नवलाचें होतें. परंतु त्यांत त्यास चांगलेंच यश मिळालें. या नव्या मार्गाने अमेरिकेच्या किनाऱ्यास पोचण्यास त्यास नेहमीपेक्षा आठ दिवस कमी लागले व हजार मैलांचा प्रवास वाचला ! सकृद्दर्शनीं गोसनोल्डचे हें यश कोणाच्या फारसें लक्षात आलें नाही पण भविष्यकाळीं त्यामुळे इंग्लडचा चागलाच लाभ झाला.

पूर्वेकडे हिंदुस्थान व पश्चिमेकडे अमेरिका इतक्या लाबवर आपल्या महत्वाकांक्षेला इंग्लडने वाव करून दिल्यामुळें त्यास युरोपच्या राजकारणात अडकून पडण्याचें गैर वाटूं लागलें. ह्मणून त्याने तिकडचे संबंध आवरत आणिले व तिकडे गुंतलेले सैन्य परत बोलावून खर्चातही बचत केली. त्याची ही योजना राष्ट्रहिताच्या दृष्टीने लाभदायक व सुज्ञपणाची ठरली तरी तीतून एक नवाच प्रश्न उपस्थित झाला. परत बोलाविलेल्या सैन्याचा कोठे, कसा व काय उपयोग करावयाचा, हाच तो प्रश्न होय. हा सुलभतेने सुटण्यास इंग्लंडला पुरती सवडही सापडली नाही तोंच त्यात आणखी एका भानगडीची भर पडली. या काळीं इंग्लंडच्या शेतकऱ्याना असा एक अनुभव आला की, धान्य पिकवून शेती करण्यापेक्षा मेंढ्या पाळून त्याचेपासून लोकर कमावणें कमी त्रासाचें व खर्चाचें असून त्यात फायदा मात्र विशेष आहे. मग कष्टप्रद अशा कृषीच्या नादीं कोण लागतो ? भराभर शेताचीं कुरणें बनूं लागलीं व त्या धंद्यांत गुंतलेले शेंकडो मजूर बेकार होऊं लागले ! रिकामटेकडेपणामुळें उपद्रवी बनत चाललेल्या सैनिकाचे काय करावयाचें हा प्रश्न इंग्लंडपुढे होताच. त्यातच बेकार मजुराच्या प्रश्नाची भर पडली. हे संकट राष्ट्राच्या स्वाध्यास हानिकर होतें. तेव्हा ते शक्य तितक्या लौकर नाहीसें करणें इंग्लंडला भाग होतें. अडचण उपस्थित झाली की, तींतून सुटण्याचा मार्गही उपलब्ध होतोच. मंत्रिमंडळाला रॅलीच्या वसाहतीबाबतच्या प्रयत्नांचें स्मरण झालें व तो मागे पडलेला प्रश्न पुन्हा धसाला लागला.

याच संधीला इंग्लिश व्यापारी वर्गालाही एक अडचण तीव्रतेने भासूं लागली होती. त्या लोकानी आपल्या व्यापाराचा व्याप फार दूरवर नेऊन पोचाविण्याचें निश्चित केलें असल्यामुळे व त्यात त्याचा जमही

बसूं लागल्यामुळें त्यांना वाहतुकीची जहाजें अपुरीं पडूं लागलीं होतीं. या धंद्यास लागणारें महत्त्वाचें सारें सामान अमेरिकेंत विपुल असल्याची वार्ता जगजाहीरच होती. तेव्हा त्यानाही अमेरिकेंत जाऊन नव्या वसाहती स्थापण्याची व तेथे जहाजें बांधण्याचा धंदा मोठ्या प्रमाणावर सुरू करण्याची कल्पना समुचित वाटूं लागली. त्यांनी तो प्रश्न तात्काळ हातीं घेतला. आपसातील चुरशीमुळें या कार्यास दोन कंपन्या उद्युक्त झाल्या. एक लंडन कंपनी व दुसरी प्लायमाऊथ कंपनी. दोन्ही कंपन्यांच्या चालकांनी वसाहतीच्या सनदा मिळविण्याकरितां राजाकडे अर्ज केले. या वेळीं पहिल्या जेम्सची कारकीर्द सुरू होती. त्याने विशेष आढेवेढे न घेतां दोघांनाही सनदा करून दिल्या. या नव्या वसाहती व्हर्जिनियामध्येंच स्थापण्याचें ठरलें. लंडन कंपनीने दक्षिण भागांत व प्लायमाऊथ कंपनीने उत्तर भागांत आपआपल्या वसाहती वसवाव्या आणि उभयतांमध्यें कलहाचा प्रसंग निर्माण होऊं नये म्हणून दोघांच्या सरहद्दीवर जमिनीचा एक पट्टा अगदी मोकळा सोडावा, असा करार करण्यात आला. याशिवाय त्या सनदात खालील तीन अटी प्रमुख होत्या.

१. दोन्ही कंपन्यानी स्वखर्चाने वसाहती स्थापाव्या व नेमून दिलेल्या प्रदेशाची वहिवाट फुकट करावी. त्याकरिता कसलाही कर किंवा सेवा राजास मोबदल्यादाखल देऊं नये. परंतु जरकरितां सोन्याच्या किंवा रत्नांच्या खाणी आढळल्या किंवा काही मोलवान लूट सापडली तर त्या सर्वांत राजाचा एक पंचमांश हिस्सा असावा.

२. प्रत्येक वसाहतीचा राज्यकारभार राजाने निवडलेल्या मंत्रिमंडळाने लंडनमध्यें बसून चालवावा. या मंडळाने वसाहतीकरितां अध्यक्ष निवडणें, कामदार पाठविणें, कायदेकानू करणें या गोष्टी कराव्या आणि राजाच्या हुकमतीखाली चालावें.

३. इंग्लंडमध्यें इंग्लिश नागरिकास जे जे अधिकार किंवा सवलती आहेत, त्या सर्व जशाच्या तशा वसाहतींतील प्रजाजनास बिनतक्रार मिळाव्या.

राजा व कंपन्या यांच्यामध्यें वरील अटीचे करार झाले. तशाच पद्धतीचे वसाहतवाले व कंपन्या यांच्यामध्येंही झाले. त्यातही तीन अटी प्रमुख व ध्यानांत ठेवण्यासारख्या होत्या. त्या येणेंप्रमाणें :—

१. वसाहतीमध्यें इंग्लिश धर्मपीठास ( Episcopal Church ला ) धरून धर्माची स्थापना व्हावी. व सारे धार्मिक विधि त्याच्याप्रमाणेंच पाळले जावे. या कार्यार्थ लागणारे धर्माधिकारी इंग्लंडमधून पाठविले जातील व त्यांचा खर्च वसाहतींना करावा लागेल.

२. वसाहतवाल्यांनी आपआपल्या सामर्थ्याप्रमाणे जंगल तोडून शेतजमीन तयार करावी व त्यांत धान्य निर्माण करावे. कोणतें पीक प्रामुख्याने काढावयाचें तें कंपनीचे अधिकारी ठरवितील. पहिलीं पांच वर्षें कोणालाही कसलीही जमीन मालकी हक्काने मिळणार नाही. किंवा शेतांत निर्माण झालेला माल स्वतःचा म्हणतां येणार नाही. तयार झालेला सारा माल कंपनीच्या कोठारांत आणून भरला पाहिजे. नंतर प्रत्येकाच्या गरजेप्रमाणें उपजीविकेचीं साधनें कंपनीकडून पुरविण्यात येतील.

३. फावल्या वेळात वसाहतवाल्यानी भोवतालच्या प्रदेशांत आंत घुसून नवें संशोधन करावें. शक्य तर पश्चिमेकडे असलेल्या पॅसिफिक महासागराकडे जाणारा जवळचा मार्ग शोधून काढावा व मिळेल तेवढी माहिती कंपनीस पुरवावी.

वरील अटींसंबंधीं थोडासा विचार केल्यास असें स्पष्ट दिसतें की, त्या वसाहतवाल्यांना प्रोत्साहन देणाऱ्या मुळींच नव्हत्या. त्यामुळें लंडन कंपनीचा वसाहती स्थापन करण्याचा हेतु जागचे जागींच जिरला असता. पण त्या वेळीं त्याना जॉन स्मिथ नावाचा एक मोठा हुशार हस्तक भेटला त्याने निकराचा प्रयत्न करून कंपनीची योजना मूर्त स्वरूपास आणिली.

जॉन स्मिथ हा वयाने अगदी तरुण—सत्तावीस वर्षांचा—होता. परतु लहानपणापासूनच तो हूड असल्यामुळें त्याने इंग्लंडांत व युरोपात पुष्कळ प्रवास केला होता व नाना प्रकारचे खडतर अनुभव घेतले होते. या रोख शिक्षणाने त्याच्या अंगीं शौर्य, धैर्य, प्रसंगावधान, कष्टसहिष्णुता उद्योगतत्परता, मनमिळाऊपणा इत्यादि गुणांचा चांगला प्रकर्ष झाला होता. पुढारी होण्याच्या योग्यतेचा तो असल्यामुळें कंपनीने त्यास हाताशीं धरलें.

शेवटीं जॉन स्मिथनें वसाहतीस जाण्याकरितां १०५ माणसें तयार केलीं. कंपनीने त्यांच्या प्रवासाची व पुढील कालाची तरतूद करून दिली. नंतर इ. स. १६०७ सालच्या जानेवारीच्या पहिल्या तारखेस जॉन स्मिथने आपला काफिला अमेरिकेकडे हाकारिला. त्यांचा प्रवासमार्ग त्यांनी

वेस्टइंडीज बेटावरून आखला. धिमेपणाने प्रवास करीत हे लोक मे महि-न्यांत उत्तर अमेरिकेंतील व्हर्जिनिया प्रांताच्या किनाऱ्यास लागले. त्यावेळीं तेथे वसंतऋतु असल्यामुळें साऱ्या प्रदेशावर अवर्णनीय शोभा पसरली होती. सुंदर व नयनमनोहर वनश्री, स्फटिकासारखे नदीनाले, पशु-पक्ष्यांची समृद्धि व समशीतोष्ण हवा या परिस्थितीमुळे वसाहतीस आलेल्या लोकांना मोठा आनंद वाटला. जॉन स्मिथने आपणास दिलेल्या थापा अगदीच फोल नाहीत असें त्यांना वाटलें. स्वदेश सोडल्याचें दुःख व निराशा ते विसरले.

किनाऱ्यावर उतरल्यावर त्यानी वसाहतीला योग्य अशा स्थलाचा शोध चालविला. प्रथमतः त्याना एक मोठी नदी लागली. राजाच्या सन्मानार्थ त्यानी तिला 'जेम्स रिव्हर' असे नाव दिलें आणि तिच्याच काठीं एका प्रशस्त जाग्यावर 'जेम्स टाऊन' नामक ग्रामाची स्थापना केली.

वसाहतीस प्रारंभ तर छान झाला. जॉन स्मिथ सारखा नायक लाभल्यामुळे व त्याच्या बरोबरीचे लोकही खुशीत असल्यामुळे वसाह-तीचा नवा उपक्रम सर्वांनाच मोठा उत्साहप्रद वाटला. परतु ही स्थिति दीर्घकाल टिकली नाही. लौकरच उन्हाळा सुरू झाला. त्याचा ताप त्या शीतदेशवासीय लोकांना असह्य होऊं लागला. रोजची कामेंही काही कमी कष्टाची नव्हतीं. झाडी तोडावी, जमीन साफ करावी, पर्णकुटिकेचे सामान जमवावें, तेव्हा कोठे निवार्तपणे राहण्यास स्थान मिळूं लागलें. शेतजमीन तयार करणें तर याहीपेक्षा कष्टाचे होतें. प्रत्येकाने प्रत्यही काही तरी कष्ट केल्यावाचून त्याचा निर्वाह होणें कठिणच होते व आपणास असे सारखे कष्ट करावे लागतील अशी त्या लोकाची अटकळ नव्हती. यामुळें जो तो त्रासूं लागला व कष्टाला कंटाळूं लागला. कित्येक आजारी पडले, व कांही तर फटकन् प्राणासही मुकल. अशा खडतर स्थितींत उरलेल्या लोकांना सांभाळून घेऊन, त्याच्याकडून वसाहतीचे कार्य चालू ठेवणें जॉन स्मिथलाही मोठे कठिण व निराशाजनक वाटूं लागलें. मध्यंतरीं कांही उपद्यापी लोकांना एके स्थानीं सोनेरी चमक असलेली जमीन आढ-ळली. लागलीच हुलड उठली सोन्याची खाण सापडली म्हणून. मग कोण कोणाचें ऐकतो ! जो तो हातांतील महत्त्वाचीं कामें तशींच टाकून कुदळ फावडें घेऊन त्या आमिषाकडे धावूं लागला. त्या सोनेरी मातींत

गुंजभरही सोनें लाभणें शक्य नव्हतें व जॉन स्मिथने ती गोष्ट त्या लोकांना परोपरीने समजाऊन सांगितली. पण ती कोणीही मनावर घेतली नाही. जेव्हा प्रयोगाअंती ती गोष्ट सिद्ध झाली तेव्हा त्या लोकांचें तें वेड ओसरले. पण आता त्यांपैकी कोणीही वसाहतीचे काम हातीं घेईना. आम्ही या भिकार देशांत राहूं इच्छीत नाही, आम्ही उपाशी मरूं पण स्वदेशीं जाऊं असा त्यांनी आग्रह धरिला. जॉन स्मिथची समजावणी व धमकावणी विफल होऊं लागली. पुढे काय करावयचें हे कोणासच उमगेना. साधनाची अनुकूलता असती तर आपल्या नायकास न जुमानतां ते कंटाळलेले लोक खात्रीने परत फिरले असते; परंतु पावसाळा अगदी डोक्यावर आल्यामुळें व जहाजें तयार नसल्यामुळें त्यांची अडवणूक झाली. पुढे पावसाळा आला. उन्हाळ्याचा उपशम झाला. पण इतर आपत्ति वाढल्या. बरोबर आणिलेल्या धान्याचा पुरवठा संपत आलाच होता, त्यांत तो भिजला व कुजून वाया जाऊं लागला. राहण्याकरितां बांधलेल्या झोपड्या उन्हाळ्याकरिता ठीक होत्या; पण पावसाळ्यास त्या निकामी ठरल्या. थंडीवाऱ्यापासून रक्षण होणें कष्टमय झालें. त्यांत तापाची साथ सुरू झाली व अनेक लोक दगावले! हिवाळा येईपर्यंत १०५ पैकी निम्मे लोकही राहिले नाहीत. इतका प्रसंग ओढवला तरी जॉन स्मिथची हिंमत खचली नाही. त्याने उरलेल्या लोकाना धीर देत सांभाळून धरिलें.

पुढे हिवाळा प्राप्त झाला. लागवड केलेलें धान्य मुबलक निर्माण झालें. हवाही सुसह्य झाली. सवयीमुळें वसाहतवाल्यांना कष्टही सहन होऊं लागले. ह्या फरकामुळें त्या लोकांची स्वदेशीं परत जाण्याची ऊर्मि थंडावली.

संकटाचें आकाश निवळून थोडी स्थिरस्थावर झाल्यामुळें स्मिथने आंतील प्रदेशाचें संशोधन करण्याचें नवें कार्य हातीं घेतलें. पॅसिफिक महासागर तेथून फारतर दोनशें मैलावर असेल अशी त्या वेळची समजूत होती. तेव्हा तिकडचा मार्ग निश्चित करावा म्हणून स्मिथ काही लोकांसह आंतल्या प्रदेशात घुसला. पण तो फारसा आंत गेला नाही तोंच रानटी इंडियन लोकांनी त्याच्या टोळीवर हल्ला करून सारे लोक कापून काढले व स्मिथला कैद केलें. अनुपम धैर्य दाखविल्यामुळेंच इंडियन

लोकांचा नायक पोटान हा त्याचेवर खूष झाला व त्याने त्यास इतरांतून वाचविलें. त्या लोकाच्या कैदेंत पडल्यावर स्मिथने चटकन् पळून जाण्याची घाई केली नाही. तर तो त्याच्यामध्यें खेळीमेळीने मिसळला व त्याना प्रिय झाला. नायक पोटान यास पोकाहोटास नावाची एक बारा वर्षांची मुलगी होती. तिचा व स्मिथचा चांगला लोभ जडला. त्याने तिला आपल्या कन्येप्रमाणें मानलें. पुढे तिच्या प्रयत्नाने व रद-बदलीने स्मिथची मुक्तता झाली. जडलेला स्नेह कायम राखण्याचें अभि-वचन देऊन व घेऊन तो वसाहतीकडे परत फिरला. त्यांच्या पश्चात् वसाहतीची वाताहतच झाली होती. पण ती त्याने तात्काळ सुधारली.

जॉन स्मिथने वसाहत वसविण्याकरिता व जगविण्याकरितां केलेले हे अविश्रांत परिश्रम लंडन कंपनीच्या लक्षात आल्यावाचून राहिले नाहीत. तिने राजाकडे शिफारस करून त्यासच वसाहतीचा पहिला गव्हर्नर म्हणून नेमून टाकलें. मिळालेल्या या स्थानाचा त्याने फार चांगला उपयोग केला. तो स्वतः अत्यंत उद्योगी, धीरगंभीर स्वभावाचा व न्यायी अस-ल्यामुळें त्याचा अधिकार वसाहतवाल्यानाही मानवला. स्मिथने उद्योगी, कष्टाळू व कल्पक शेतकऱ्याना व कामगाराना भरपूर उत्तेजन दिलें आणि इंग्लंडहून वसाहतीकरिता आणखी लोक आणविले. एका प्रसिद्ध रेड इंडियनाच्या मुलीला त्याने धर्मपुत्री मानिली असल्यामुळे त्या लोका-कडूनही वसाहतीस उपसर्ग पोचेनासा झाला. त्यातच आणखी एक विशेष गोष्ट घडली. वसाहतीकरितां आलेल्या नव्या टोळींत जॉन रोल्फ नांवाचा एक उत्साही व महत्त्वाकांक्षी तरुण होता. याचें प्रेम पोकाहों-टासवर बसलें. तिनेही तें मान्य केले. पुढे तिने स्वेच्छेने, ख्रिस्तीधर्म स्वीकारला व ती रोल्फची धर्मपत्नी झाली. या संबधामुळे इंडियन लोक व वसाहतवाले याचे संबंध आणखी दृढ झाले.

जॉन स्मिथ हा तरुणच असल्यामुळें त्याची उत्कर्षप्रद कारकीर्द दीर्घकाल चालण्यास कांहीच प्रत्यवाय नव्हता; परंतु काही अपघात होऊन तो एकाएकी भयंकर आजारी पडला व प्रकृतिस्वास्थ्याकरिता त्यास इंग्ल-डला जाणें भाग पडलें. आपल्या पश्चात् वसाहतीचें कार्य बिनबोभाट चालावें म्हणून त्याने योग्य ती व्यवस्था केली; परंतु तो गेल्यावर मुख्य आधारस्तंभ काढून घेतलेल्या घराप्रमाणें वसाहतीची स्थिति झाली! वसा-

हतींतील गोरे व जंगलातील इंडियन या दोघांवरही जॉन स्मिथने चांगला वचक बसविला होता. तो नाहीसा होतांच सारे दुवे विस्कळीत झाले. स्मिथने प्रस्थापित केलेली शांतता व सुव्यवस्था मोडत चालली. वसाहतवाल्यांमध्यें आळस, निरुद्योगीपणा व आपमतलबीपणा शिरला. आणि तिकडे इंडियन लोकांनी राखलेला स्नेहही तुटला. आतापर्यंत वसाहतीची लोकसंख्या पांचशेंपर्यंत गेली होती व स्मिथच्या प्रयत्नाने व प्रोत्साहनाने तींत सारखी भर पडत होती; पण त्याच्या पश्चात् सारा गोंधळ उडाला. नवीन लोक येण्याचें बंद झालें. असलेल्यांत रोगराईचें प्रमाण वाढलें आणि रानटी लोकांच्या चोरट्या हल्ल्यांना कांही बळी पडूं लागले. मनुष्यहानीचा हा कहर असा उसळला की, सहा महिन्यात पांचशेंपैकी अवघे साठ लोक जिवंत राहिले ! जेम्स टाऊन एवढेंसें खेडें. पण तें आता अगदी उजाड झालें व सर्वत्र थडगींच थडगीं दिसूं लागलीं ! हा भयंकर प्रकार पाहिल्यावर उरलेल्या लोकांना तरी कसा धीर निघणार ! त्यांना आपल्या दुर्दैवाचा अगदी वैताग आला. जेम्स टाऊनला आग लाऊन द्यावी आणि मुकाट्याने इंग्लंडला चालतें व्हावें असे त्यांच्या मनाने घेतले. व्हर्जिनियाची भूमि पुनश्च ओसाड पडण्याची वेळ आली.

परंतु इकडे इंग्लंडमध्ये लंडन कंपनीचे चालक कांही स्वस्थ बसले नव्हते. जॉन स्मिथ बरा होऊन परत जाण्याचें चिन्ह दिसत नाहीं असें दिसून येतांच त्यांनी नव्या माणसांसह व भरपूर साधनसामुग्रीसह डेलावेअर नांवाचा नवा अधिकारी तात्काळ रवाना केला. त्यास इंग्लंडहून निघण्यास उशीर झाला असला तरी अमेरिकेच्या किनाऱ्याला मात्र तो अगदी वेळेवर येऊन लागला. त्याने परत निघण्याचा तयारींत असलेल्या लोकांना थोपवून धरलें व त्यांना धीर दिला आणि वसाहतीचा मृत्यु मोठ्या शिकस्तीने टाळला !

डेलावेअर हा शिपाईपेशाचा गडी असल्यामुळें व त्यांत त्याचें वयही फार झाल्यामुळें वसाहतीची विस्कटलेली घडी पुन्हा बसविण्याइतका वकूब त्याच्या अंगीं नव्हता. यामुळें अल्पकालातच त्याने राजीनामा देऊन स्वदेशीं गमन केलें. त्याच्या मागून डेल नावाचा नवा गव्हर्नर नेमण्यांत आला. हा एक सैन्याधिकारीच होता. पण त्याची शिस्त कडक व उत्साह दांडगा होता. अल्पकालांत त्याने वसाहतीस

व्यवस्थित रूप दिलें. पण तें देत असता त्यास आढळून आलें की, कंपनीने वसाहतवाल्यांशीं जे करार मदार केले आहेत, ते अन्याय-मूलक आहेत. तात्काळ त्याने वसाहतवाल्यांचा पक्ष उचलून धरला व पूर्वीचे नियम बदलून घेतले. प्रत्येक वसाहतवाल्यास घर बांधण्याकरितां व भोंवतालीं बाग करण्याकरिता भरपूर जागा स्वामित्वाच्या हक्काने मिळावी. शेतजमिनी मालकी हक्काने विकत दिल्या जाव्या आणि जो कोणी वसाहतीच्या उत्कर्षाकरितां सतत झटेल, लोकोपयोगाचीं कामें करील आणि कांही महत्त्वाचें कार्य करून दाखवील त्यास पारितोषिक म्हणून वंशपरंपरेने चालणारी भूमि द्यावी. डेलच्या या सुधारणा फार महत्त्वाच्या होत्या. त्याचा परिणाम वसाहतवाल्यांवर फारच चांगला झाला. स्वामित्व व स्वातंत्र्य मिळाल्यामुळें त्यांना नवा उत्साह चढला.

डेलचा कारभार कडक शिस्तीचा असला तरी वरील सुधारणा घडून आल्यामुळें वसाहत झपाट्याने वाढूं लागली. त्यातच आणखी एका लाभदायक गोष्टीची भर पडली. ती म्हणजे तंबाकूची लागवड होय. हा काळपर्यंत त्या वल्लीकडे गोऱ्या वसाहतवाल्यांचे विशेष लक्ष गेलें नव्हते. पण तिची माहिती व महती सर्वत्र पसरत चालली होती. युरोपच्या पेठेला तिची मागणी वाढत चालल्याचें दिसून आलें. आता-पर्यंत तिची खरेदी इंडियन लोकांकडून होत असे. पण त्याच्याशीं वसा-हतवाल्यांचें बिनसल्यामुळें तिकडून पुरवठा होण्यास अडचण पडूं लागली. तेव्हा गोऱ्या शेतकऱ्यांनी तिची लागवड करण्याचें निश्चित केलें. पोकाहोंटासशीं विवाहबद्ध होऊन इंडियन जमातीशीं एकजीव झालेल्या जॉन रोल्फने या कामीं पुढाकार घेतला. इ. स. १६१२ सालीं त्याने पहिलें पीक लावले व मग त्याचे अनुकरण इतर लोकांनी केले. व्हर्जिनियाची भूमि तंबाकूच्या पिकाला अति पोषक असल्यामुळें उच्च प्रतीचा माल निर्माण होऊं लागला व युरोपच्या पेठेंत तो खपूंही लागला! तंबाकूच्या पिकाचें हें माहात्म्य वर्णन करून सांगण्याचे कारण असें की, या एका पदार्थाने व्हर्जिनियाची भूमि आबादीआबाद होण्यास फारच साह्य झालें. वसाहतवाल्यांना आता जमिनीचें स्वामित्व मिळाल्यामुळें त्यांचें भाग्य त्यांच्या प्रयत्नाशीं निगडित झालें आणि तंबाकूने त्यास वरप्रसादच दिला.

पुढे डेलची कारकीर्द संपली. त्याच्या जागीं ईडेले नांवाचा नवा गव्हर्नर आला. याचा कारभारही लोकांना फार सुखाचा व उत्कर्षप्रद झाला. तंबाकूच्या पिकाला तर विलक्षणच महत्त्व चढलें. मागणी भरपूर व किंमत भरमसाट यामुळें त्या वल्लीला सोन्या नाण्याचें रूप लाभलें. व्यापारी देवघेव, नोकराचाकराचें वेतन, अपराध्यांना दंड, इत्यादि व्यवहार तंबाकूच्या देवघेवीने होऊं लागला. इतकेंच नव्हे तर आणखी एक फारच गमतीचा व्यवहार तंबाकूने केला. आतापर्यंत वसाहतवाल्यात सडेसोट लोकांचाच भरणा होत होता. पण त्यांना स्वामित्व, स्वातंत्र्य, स्वास्थ्य व द्रव्य याची अनुकूलता लाभताच त्यांना घर व गृहिणी याची आवश्यकता तीव्रतेने भासूं लागली. ‘ आमच्या-करितां विवाहेच्छु तरुणी पाहिजेत.’ अशी मागणी सर्वसामान्य लोकांनी ईडेले गव्हर्नराकडे केली. त्यासही ती पटली. त्याने ती लंडन कंपनीकडे रवाना केली. तिला तंबाकू पाहिजे होती. तिने कळविलें की, पक्की दीडमण तंबाकू देणाऱ्यास नोवरी पुरविली जाईल. मग काय विचारतां! ही वार्ता जाहीर होताच जो तो खंडणी जमवूं लागला आणि आपल्या बायकोची मार्गप्रतीक्षा करूं लागला. पुढे इ. स. १६१९ सालीं कंपनीने नव्वद तरुणींचा एक तांडा अमेरिकेस धाडून दिला. ज्याची खंडणी तयार होती व जे बंदरावर हजर होते, त्याना बायको मिळाली ! अस्तु.

व्हर्जिनियाच्या वसाहतीला आता चांगलेच स्वरूप येत चाललें. तंबाकूच्या पिकाचें लोकाना अगदी वेड लागल्यामुळे भराभर जंगलें तुटूं लागलीं, नव्या जमिनी लागवडीस येऊं लागल्या, नवीं गावें वसूं लागलीं व वसाहतीचें क्षेत्र विस्तृत होत चाललें. इंग्लंडातील सधन शेतकरी व बेकार मजूर याचा ओघ तिकडे वळला. आपलें दैव काढण्यास अमेरिका हें एक उत्तम स्थल आहे ही गोष्ट इंग्लंडांतील लोकांना पटूं लागली.

वसाहतीचा राज्यकारभार आतापर्यंत लंडन कंपनीतर्फे चाले व ती राजाच्या हुकमतीखाली असे. यामुळें स्वतंत्र नागरिक या नात्याने वसाहतवाल्याना व्हर्जिनियाच्या राज्यकारभारांत कांहीच महत्त्व नव्हतें. परंतु त्याचीं घरेंदारें होऊन त्याना स्वास्थ्य मिळताच त्यांना हा उणेपणा जाणवूं लागला. त्यानी आपली संघटना केली व तिच्या बलावर

या प्रश्नास चालना दिली. लोकाची ही तयारी पाहून लंडन कंपनीनेही विशेष ओढून धरलें नाही. तिने राजाकरवीं ईंडले गव्हर्नरास राज्यकारभार लोकच्छंदानुवर्ती करण्याची आज्ञा दिली. या वेळीं वसाहतीमध्यें एकंदर अकरा गाव असून लोकसंख्या पंधरा हजारावर होती. प्राथमिक शिक्षणाची सोय बऱ्यापैकी असल्यामुळें लोकामध्यें शिक्षित लोकांचे प्रमाण ठीक होतें. प्रत्येक जाणत्या स्त्रीपुरुषास मताधिकार देण्यांत आला. प्रत्येक गावानें आपल्या तर्फे दोन प्रतिनिधि निवडून द्यावे व अशा प्रतिनिधींचें एक मंडळ स्थापून त्याच्या अनुमतीने वसाहतीस आवश्यक व पोषक असे कायदेकानू व्हावे व एकंदर कारभार त्या तंत्राने चालावा असें ठरलें. या योजनेस अनुसरून इ. स. १६१९च्या जुलैच्या ३० तारखेला हें लोकनियुक्त मंडळ जेम्सटाऊन येथे जमलें. प्रत्येक गावाने आपले प्रतिनिधि अगत्याने पाठविल्यामुळें ही सभा प्राथमिक स्वरूपाची असली तरी मोठी महत्त्वाची ठरली. या सभेतर्फे भावी लोकशाहीचें बीजारोपण झालें म्हणण्यास हरकत नाही. इग्लंडने आपल्या पहिल्या वसाहतीला लोकनियुक्त मंडळातर्फे राज्यकारभार चालविण्याची ही जी सवलत दिली, ती त्या लोकाना पचूं देऊं नये म्हणून पुढच्या कालात इंग्लडच्या सिंहासनाधिष्ठ राजांनी व त्याच्या अरेरावी मंत्र्यांनी पुष्कळ खटपट केली व तींत अनेक अडचणी आणिल्या. परंतु एकदा सुटलेला हा बाण त्या देशास सर्वस्वी परत घेता आला नाही. आणि पुढे हाच चुकून मिळालेला वर त्याच्या पुढच्या स्वातंत्र्यास उपयोगी पडला ! अस्तु.

इग्लंडची ही तरारत चाललेली वसाहत आपल्या स्वातंत्र्याची मुहूर्तमेढ रोवून पुढच्या मार्गास लागली असतां, याच सालीं—इ. स. १६१९ सालीं—तिच्या हातून एका पापकर्मास प्रारंभ झाला. तें म्हणजे अमेरिकेच्या भूमीवर आफ्रिकेंतील नीग्रो लोकांची जनावराप्रमाणे खरेदी विक्री होय. या सालापर्यंत अमेरिकेत एकही नीग्रो गुलाम नव्हता. पण १६१९ च्या आगष्टमध्ये डच लोकांनी जेम्स टाऊनच्या बाजारात वीस नीग्रो विक्रीला आणिले. गबर शेतकऱ्यानी ते तात्काळ विकत घेतले. शेतकामांत गुरासारखे काबाडकष्ट करणारे, उन्हातान्हात टिकणारे, कोणत्याही जुलमाचा प्रतिकार करण्यास निःसहाय असणारे असे मजूर वसा-

हतवाल्याना पाहिजेच होते. इतका वेळ गोऱ्या जातींतूनच असे मजूर आणावे लागत. पण ही बाब कष्टाची, पैशाची व लज्जेची होती. डच लोकानी हा एक स्वतंत्र सोपा मार्ग दाखवून दिला. मानवजातीला कलंकभूत असा हा व्यापार तात्काळ जोराला लागला. पण या विषया-संबधीं पुढे ऊहापोह होणार असल्यामुळें तूर्त इतकेंच पुरे.

जेम्स राजाने सनद दिल्याप्रमाणें व्हर्जिनियाची मालकी लंडन कंपनीकडे इ. स. १६२४ पर्यंत राहिली. पुढे त्याने ती सनद रद्द करून तो प्रांत आपल्या मालकीचा करून टाकला! पुढे जेम्स वारला व चार्लस पहिला त्याच्या जागीं आला. याने वसाहतीच्या राज्यकारभारांत किंवा लोकनियुक्त मंडळात जरी ढवळाढवळ केली नाही, तरी आपल्या कृपे-तील सर विलियम बर्कले या नावाचा करड्या स्वभावाचा गव्हर्नर धाडला. हा मोठा अहमन्य व राजसत्तावादी होता. लोकशाहीचीं तत्त्वें त्यास मुळीच मान्य नव्हती. यामुळें तो येताच त्याने आपला कारभार त्या थाटाने चालविला! त्याने लोकनियुक्त मंडळ मोडलें नाही; परतु तें कःपदार्थ मानून त्यास बाहुलीचें स्वरूप दिलें. बर्क्लेची ही वागणूक वसाहतवाल्यां-पैकी पुष्कळाना खपली नाही, पण त्याच्यापैकी जे सधन होते किंवा होत चालले होते, त्याना समता व बंधुता रुचत नव्हती. श्रीमत गरीब हा भेद समाजात असलाच पाहिजे, असें त्यांना वाटत असल्यामुळें ते बर्क्लेला मिळाले व सामान्य जनतेचें नशीब फिरलें.

---

## प्रकरण नववें

# इंग्लिशेतर लोकांच्या वसाहती

लंडन कंपनीने व्हर्जिनिया प्रांत नव्याने वसविण्याकरितां आपली माणसें धाडून एक वर्ष लोटलें नाही तोंच फ्रेंच लोकांचेंही लक्ष त्याच भागीकडे वेधलें. पूर्वी त्यांनी तसा उपक्रम केला होता म्हणून त्यांना इंग्लिशांचे अनुकरण करण्याची इच्छा झाली, की त्यांची व इंग्लिशांची

अलीकडे अग्रेसरत्वाबद्दल जी स्पर्धा सुरू झाली होती तिच्यामुळें त्याना वसाहत करण्याचा प्रयत्न इष्ट व आवश्यक वाटला, हें काही सागता येणार नाही. एवढें खरें की, इंग्रजांच्या वसाहतीस कितपत यश येतें, हें पडताळून पाहण्याची वाट सुद्धा त्या लोकांनी पाहिली नाही. आपण यासंबंधीं काही हालचाल केली नाही तर न जाणों पुढे कोणता प्रसंग ओढवेल, असें त्यास वाटलें असावें.

त्या कालीं फ्रान्समध्यें चॅम्पलेन नावाचा एक धाडसी व महत्त्वाकांक्षी फ्रेंचमन राहात होता. त्याने हे कार्य अंगीकारिलें. इ. स. १६०८ साली त्याने फ्रान्सचा किनारा सोडला आणि यथावकाश अमेरिकेचा गाठला. 'सेंट लॉरेन्स' नावाच्या आखातात येऊन त्याने आपलीं जहाजें नागरलीं. या आखातास त्याच नावाची एक मोठी नदी येऊन मिळते. तिच्या मुखानून चॅम्पलेन दीडशे कोस आत गेला. नंतर किनाऱ्यावर उतरून त्याने भोवतालच्या प्रदेशाची पाहणी केली. दक्षिणेकडच्या भागात त्यास एक सरोवर लागलें. त्यास त्याने आपलें नांव दिलें. नंतर तो परत फिरला. त्याने स्वत: पाहणी केलेल्या प्रदेशास 'न्यू फ्रान्स' असें नाव दिलें आणि सेंट लारेन्स नदीच्या कांठीं एक चागलेसे स्थळ पाहून तेथे क्वेबेक नावाचे गांवठाण वसविलें! लडन कपनीच्या सघटित प्रयत्नाच्या मानाने चॅम्पलेनचा हा प्रयत्न क्षुद्रतर असला तरी भविष्य कालीं तो चांगल्या नावारूपास आला. आणि इंग्लिश वसाहतींना तो एक जोमदार शह लागला!

फ्रेंचांची ही वसाहत होऊन एक वर्षही लोटले नाही तोंच युरोपातील आणखी एका राष्ट्रास फ्रेंचाच्या पावलावर पाऊल टाकण्याची इच्छा झाली. हे राष्ट्र ह्मणजे 'हॉलंड' उर्फ 'नेदर्लॅंड्स' होय. सोळाव्या शतकाच्या अंतापर्यंत हे चिमुकलें राष्ट्र स्पॅनिश लोकांच्या जुलमी अंमलाखालीं घोळसलें जात होतें व आपलें स्वातंत्र्य परत मिळविण्याकरिता त्याची सारखी धडपड सुरू होती. शेवटीं इ. स. १६०९ मध्ये त्याच्या प्रयत्नास यश आलं व तें पूर्ण स्वतंत्र झाले. यानंतर तेथे प्रजासत्ता स्थापन झाली. एव्हापासूनच त्या उद्योन्मुख राष्ट्राने आत्मोत्कर्षाचे अनेक उपक्रम हातीं घेतले. इंग्लड, फ्रान्स,

स्पेन इत्यादि राष्ट्रें ज्या अर्थी अटलांटिक ओलांडून दूर देशांतरीं जात आहेत, त्या अर्थी आपणही या चढाओढींत भाग घेतला पाहिजे, असें त्यास वाटलें. म्हणून त्याने अमेरिकेंत जाऊन आपली वसाहत स्थापण्याचा निश्चय केला.

हॉलंडला स्वातंत्र्य मिळवून देण्याचे कामीं इंग्लंडने त्या काळीं थोडें फार साह्य डच लोकांना केलें होतें. या परोपकारात स्पेनचा जोर कमी व्हावा हा स्वार्थ होताच, तरीपण तेव्हढ्या संबंधामुळें हॉलंड व इंग्लड यांचें चांगलें सख्य जमलें होतें. याचा परिणाम असा झाला होता की, हॉलडने पुष्कळ सुयोग्य इंग्रज लोकांना आपल्या पदरीं नोकरीस ठेविलें होतें. त्यापैकीच हडसन या नावाचा एक इंग्रज आरमारी खात्यात कप्तान होता. आपल्या लोकाची एक वसाहत अमेरिकेच्या भूमीवर करण्याचें ठरल्यानतर हॉलडने त्या कार्याची पूर्व तयारी करण्याची जबाबदारी हडसन साहेबावर टाकली व त्यानेही ती चोख बजावली.

इ. स. १६०९ सालीं हडसन अमेरिकेस आला. आज ज्या स्थानीं अमेरिकेंतील प्रख्यात नगर 'न्यूयार्क' वसलें आहे, तेथे तो आला. या स्थानी 'लाँग' व 'मानहाटन' नांवाचीं दोन बेटें असून एक नदीही समुद्रास येऊन मिळाली आहे. हडसनने या नदींतून आंत शिरून चॅम्पलेन प्रमाणेंच आतील प्रदेशाची पाहाणी केली, तेव्हा आढळून आलें की, तो भाग वसाहत करण्यास योग्य असून तेथून इंडियन लोकांशीं लोकर खरेदीचा मोठा व्यापार चालविता येईल. हे संशोधन झाल्यावर त्याने इंडियन लोकाशीं स्नेह जोडला, ज्या नदींतून त्याने प्रवास केला होता तिला हडसन असें आपलें नाव दिलें आणि भोवतालच्या प्रदेशास 'न्यू नेदर्लंड' कल्पिलें. वास्तविक याच सुमारास गेल्या प्रकरणांत सांगितलेला जॉनास्मिथ–व्हर्जिनिया प्रांताचा पहिला गव्हर्नर– या प्रांताची पाहणी करून गेला होता व त्याने या प्रातास 'न्यू इंग्लंड' असें नांव दिलें होते; परंतु ही गोष्ट हडसनला समजली नाही व आपल्यावर सोपविलेलें कार्य संपलें असें मानून तो परत फिरला. हॉलंडला आल्यावर त्याने आपला वृत्तांत लोकसभेस सादर केला.

हडसनने पुरविलेली माहिती डच लोकांना मोठी प्रोत्साहक व अनुकरणीय वाटली. लागलीच तिने आपले अधिकारी तिकडे पाठविले. त्यांनी जाऊन त्या भूमीचें स्वामित्व आपल्याकडे घेतलें व तेथे आपला राष्ट्रध्वज फडकविला! परंतु हॉलंडचें हें कृत्य फ्रेंच किंवा इंग्लिश या दोघानाही रुचलें नाही. वास्तविक अमेरिकेच्या भूमीवर तेही उपरेच होते. त्याचेच अनुकरण डच लोकांनी केलें असतां त्यांना वैषम्य वाटण्याचें काय कारण होतें? परंतु त्यांना हॉलंडची लुडबूड खपली नाही. त्यांनी या संबंधांत तात्काळ शस्त्र उचललें नाही, पण हॉलंडला दमदाटी मात्र दिली! नवचैतन्याने स्फुरलेल्या डच लोकानी तिकडे दुर्लक्ष केलें आणि इंग्लिश व फ्रेंच यांच्या वसाहतीच्या दुबेळक्यांत आपल्या वसाहतीची पाचर मारली!

इंग्रजाप्रमाणें डचानीही या कार्याकरितां 'वेस्ट इंडिया कंपनी' नांवाची एक मंडळी स्थापन केली आणि तिच्याकडे हे वसाहतीचें कार्य सोपविलें. त्या कालीं हॉलंडची सामान्य प्रजा बहुतकाल पारतंत्र्यात पड-ल्यामुळें अगदी दरिद्री व त्राणरहित झाली होती. तेव्हा तिच्याकडून वसाहतीच्या कार्यास उठाव मिळणें कठीणच होतें. म्हणून धनिक लोकांना या बाबतींत प्रोत्साहन देण्यांत आलें. तें असें:--

१. जो धनिक स्वताच्या खर्चाने पन्नास किंवा त्यांहून जास्त डच कुटुंबें वसाहतीकरितां न्यू नेदर्लंडास नेईल, त्यास त्या त्या प्रमाणांत लहान मोठा भूप्रदेश इनाम म्हणून देण्यात येईल. शिवाय त्यास पॅट्रन ( Patroon ) या नांवाची बहुमानास्पद पदवीही मिळेल. २. त्याने नेलेलीं कुटुंबें त्याच्या पूर्ण ताब्यांत राहतील. त्याने त्यांच्यावर वाटेल तशी सत्ता गाजवावी. ३. वसाहतीस गेलेल्या लोकांनी आपल्या मालकाकरितां त्याच्या इच्छे-प्रमाणें शेतीभाती करावी आणि होईल तें उत्पन्न मालकालाच--तो घेईल त्या भावाने--विकावें. जमिनीचें स्वामित्व त्यांना मिळणार नाही. त्याना कमींत कमी दहा वर्षें तरी असे राहावें लागेल व पुढेही पॅट्रनच्या इच्छे-वाचून त्यांची सुटका होणार नाही. ४. वसाहतवाल्यांना पॅट्रनकडून शेतीचीं जनावरें व औतें पुरवण्यात येतील, मुलांच्या शिक्षणाप्रीत्यर्थ शाळा घालून देण्यांत येतील व प्रत्येक गावास धर्ममंदिरही बांधून देण्यांत येईल. इत्यादि.

या अटी धनिकांना मोठ्या प्रलोभक असल्या तरी सामान्य लोकाना प्रक्षोभकच होत्या. त्यांच्या प्रभावाने दुष्ट सत्ता व अपमानास्पद दास्य निर्माण होणार होतें. परंतु तिकडे कोणाचें लक्ष गेले नाही. धनिकांनी आपलें भांडार उघडलें, दारिद्र्यास कंटाळलेल्या व परिस्थितीने लाचार बनलेल्या कुटुंबांनी वसाहतीस जाण्याचें मान्य केलें, कंपनीने बाकीची तयारी केली आणि इ. स. १६२६ साली पीटर मायन्यूट नावाच्या गव्हर्नराच्या आधिपत्याखाली डच लोकाचा एक काफिला अमेरिकेकडे रवाना झाला !

अमेरिकेच्या किनाऱ्यास लागल्यावर पीटर मायन्यूटने आपल्या राष्ट्राची सचोटी व व्यापारी प्रामाणिकपणा दाखविण्याकरिता व पुढे मागे स्वामित्वाचा प्रश्न उभा राहिल्यास भरपूर पुरावा असावा म्हणून हडसन नदीच्या मुखाशीं असलेलें व वसाहतीला अत्यत योग्य असें 'मानहाटन' नांवाचें बेट इडियन लोकापासून खरेदी घेतले ! याचे क्षेत्रफळ १४००० एकर होतें व त्याबद्दल पीटर मायन्यूटने इंडियन लोकाना दिलें काय ? –अवघे चोवीस रुपये ! आणि तेंही सोन्या नाण्यात नव्हे तर काचमणी, ब्लॅकेटें व मीठ इत्यादि सामान्य पदार्थ देऊन. बाकीच्या प्रदेशाची खरेदी याच पद्धतीने झाली. नंतर मानहाटन बेटावर समुद्र किनाऱ्यास लागून 'न्यू आमस्टरडाम' नावाचें गाव वसविण्यांत आलें.

पीटर मायन्यूट हा मोठा धोरणी गव्हर्नर होता. त्याने एक दोन प्रमुख माऱ्याचीं ठिकाणे हेरून तेथे लढाऊ किल्ले उभारले आणि त्याच्यात सैन्य व दारूगोळा आणून ठेविला. अर्थात् खालच्या बाजूस बसलेल्या इंग्रजांना व वरच्या बाजूस असलेल्या फ्रेंचाना हे एक आह्वानच होतें. असो.

अल्पावधींत डचांची वसाहत नांवारूपाला येत चालली. तोंच तो यशस्वी प्रयत्न पाहूनच की काय, कोण जाणे, स्वीडन देशाला वसाहतीचा लोभ सुटला ! युरोपातील इतर राष्ट्रानी आपले नवे देश वसवावे मग त्यात आपला स्वीडन का नको ? अशा महत्त्वाकांक्षेने त्यास पछाडलें. त्यानेही वसाहतीच्या पूर्वतयारीकरिता इ. स. १६३८ मध्यें आपले लोक अमेरिकेस धाडिले. तेथे त्यानी डेलावेअर नांवाच्या नदीच्या आसपासचा मुलूख पसंत केला व त्यास 'न्यू स्वीडन' असे नाव दिले. नंतर थोड्याच अवधींत तेथे अनेक स्वीडिश कुटुंबें आलीं व त्यांनी स्वीडिश वसाहतीची प्राणप्रतिष्ठा केली.

पण त्या लोकांचें हें सुखस्वप्न फार काळ टिकलें नाही. ‘न्यू नेदर्लंड’च्या डच लोकानी आपली सरहद्द वाढवीत ‘न्यूस्वीडन’पर्यंत आणिली आणि हद्दीला हद्दी भिडल्यावर कुरापतीस प्रारंभ केला. या वेळीं न्यू नेदर्लंडावर स्टीव्हिसेंट नांवाचा मनुष्य गव्हर्नर होता. हॉलंडच्या स्वातंत्र्याकरिता जें युद्ध चाललें होतें, त्यांत याने मोठें नांव मिळविलें होतें. या पराक्रमातच त्याचा एक पाय नाहीसा होऊन त्याचे जागीं चांदीने मढविलेला लाकडी पाय आला होता. स्टीव्हिसेंटला तें वैगुण्य बहुमानास्पद होतें. स्वभावाने हा मोठा मानी व संतापी असल्यामुळें त्याची कारकीर्द मोठी कडकपणें सुरू होती. त्यास स्वीडनचा वरील प्रयत्न कसा रुचणार ? त्याने ही वसाहत नामशेष करण्याचा निश्चय केला आणि इ. स. १६५४ सालीं तो सिद्धीला नेला ! स्वीडिश लोकांना स्वतःच्या वसाहतीचें सरक्षण करण्याचें तितकेसे सामर्थ्य नव्हतें. व असें एखादें संकट आपल्या मार्गांत येईल याची कल्पना त्यांना नव्हती. त्यामुळें ते हरले. स्टीव्हिसेंटने त्याचा सारा प्रदेश बळकावून न्यू नेदर्लंडांत सामील केला. जीं स्वीडिश कुटुंबे डचांचा अधिकार मानण्यास तयार नव्हती, त्याना हाकलून देण्यात आलें व बाकीच्यांवर आपल्या पद्धतीचा राज्यकारभार चालू केला.

स्टीव्हिसेंट परक्या लोकांनाच जुलमी होता असें नव्हे. त्याच्या ताब्यात असलेली न्यू नेदर्लंडची सामान्य डच प्रजाही त्यास तुच्छच होती. हॉलंड स्वतः परदास्यांतून सुटून स्वतंत्र लोकसत्ताक झालें असता त्यास आपली वसाहत मात्र त्या तत्त्वाप्रमाणें स्थापण्याची इच्छा झाली नाही. अरेरावी व गुलामगिरी याचेवरच तिची उभारणी होती. लोकांना स्वातंत्र्य काडीचें नव्हतें. गव्हर्नर अगर इतर अधिकारी किंवा पेट्रून यांच्या विरुद्ध ब्र काढण्याची सोय नव्हती. सामान्य अपराधाकरिता भर चौकांत अपराधी मनुष्यास चाबकाने फोडून काढण्यांत येई किंवा फासावर लटकाविण्यात येई ! या गांजणुकीने सारी प्रजा खवळून गेली. ज्या लोकांनी हॉलंडच्या स्वातंत्र्याकरिता आपले रक्त सांडलें, त्यांच्यापैकींच कांहींच्या वंशजाना वसाहतींत नवी गुलामगिरी प्राप्त झाली ! त्याबरोबर त्यांच्यामध्ये असंतोषाचा अग्नि धुमसूं लागला.

स्टीव्हिसेंटने उन्मत्तपणांत आपल्या प्रजेच्या या असंतोषाकडे फारसें लक्ष दिलें नाही; बाकी त्याने इतर राज्यव्यवस्था चांगली ठेविली होती. केव्हा केव्हा त्याने न्यायही मोठे चांगले दिले. न्यू ॲमस्टरडामच्या उत्तरेकडून इंडियन लोकाचा मधून मधून मोठा उपसर्ग होई. त्याच्या निवारणार्थ त्याने त्या दिशेला बेटाच्या पूर्वपश्चिम अशी एक मोठी तटबंदी बांधली. आज न्यूयॉर्क नगरांत वॉलस्ट्रीट नावाचा सर्व जगांत श्रेष्ठ असा जो सराफ कट्टा आहे, तो याच तटबंदीचा भाग होय. असो.

परंतु इतर ही सारी व्यवस्था ठाकठिकीची असली तरी डच वसाहतवाल्याना साध्या माणुसकीला शोभण्याइतपतही स्वातंत्र्य नसल्यामुळें त्याना इतर कोणत्याही गोष्टींत प्रेम किंवा आनंद वाटेना. संघटित प्रयत्नाने स्वातंत्र्याची चळवळ करणें त्याना प्राप्त झालें. स्टीव्हिसेंटने अत्याचाराने ती दडपून टाकण्याचा प्रथम प्रयत्न करून पाहिला. पण तो सफल होत नाही व लोकक्षोभ तर वाढतो आहे असें पाहताच त्याने आपल्या कह्यात सतत राहील असे एक लोकप्रतिनिधि मंडळ स्थापण्याचें सोंग केलें; परंतु लोकांना तें पसत पडेना व त्यापेक्षा विशेष कांही देण्यास स्टीव्हिसेंट कबूल होईना. तेव्हा डच वसाहतवाले उघड बंडास प्रवृत्त झाले !

इकडे इंग्लंड या अंतःस्थ कलहाकडे डोळे लाऊन बसलें होतें. हॉलंडने जसा स्वीडनचा घास घेतला, तसा त्याना या डच वसाहतीचा घास घ्यावयाचा होताच. आता त्यानी संधि साधली. डच प्रजा आमच्या अंमलाखाली आल्यास आम्ही त्याना ब्रिटिश नागरिकाचे हक्क देण्यास तयार आहों, असें वर्तमान जाहीर करण्यात आले. नंतर ड्यूक ऑफ यॉर्क या शूर सेनापतीस या मोहिमेवर पाठविले. एके दिवशीं सकाळी पाहतात तों न्यू आमस्टरडामच्या समोर पसरलेल्या समुद्रात इंग्लिशांची आरमारी जहाजें तोफा रोखून उभी !

हें अनाहूत संकट पाहताच गव्हर्नर स्टीव्हिसेंट गांगरला, संतापला व युद्धास प्रवृत्त झाला. परंतु त्याच्या जुलमी अमलास कंटाळलेली प्रजा त्यास साह्य करण्यास राजी होईना. त्याने त्याची पुष्कळ मनधरणी केली. पण ती विफल झाली. स्टीव्हिसेंटला मुकाट्याने शरण जावें लागलें. अल्पावधींत हॉलंडच्या राष्ट्रध्वजाच्या स्थानीं इंग्लंडचें निशाण फडफडूं लागलें.

बेडकाने फुलपाखरूं मटकवावें व त्या आनंदांत जिभल्या चाटीत बसावें न बसावें तोंच हळूच एका सर्पाने येऊन त्यासच गिळावें तसा प्रकार झाला! इ. स. १६६४ सालीं न्यू नेदर्लंड नामशेष झालें. त्याची राजधानी न्यू ॲमस्टरडाम यासही न्यूयॉर्क असें नाव मिळालें व भोवतालच्या प्रदेशही त्याच नावाखाली आला. या प्रदेशाचे स्वामित्व ड्यूक ऑफ यॉर्ककडे आल्यावर त्याने त्यातील कांही भाग स्वतंत्र करून कार्टरेट व बर्क्ले या आपल्या दोन मित्रास वाटून दिला. त्या सरदारानी त्याचें एक स्वतंत्र संस्थान बनविले व त्यास 'न्यूजर्सी' असे नाव दिलें. कार्टरेटची पत्नी इलिझाबेथ नामेंकरून होती. तिच्या नांवाचें एक गाव वसवून तेथे न्यूजर्सीची राजधानी स्थापण्यात आली!

न्यू स्वीडनचा ताबाही ड्यूक ऑफ यॉर्कलाच मिळाला होता. इ. स. १६८१ पर्यंत त्याने त्याचा उपभोग घेतला व पुढे तो प्रदेश विल्यम पेन नामक एका धनाढ्य मनुष्यास विकला. यातूनच पुढे 'डेलावेअर' हें संस्थान निर्माण झालें. असो.

अशा प्रकारें हॉलंड व स्वीडन या दोन इंग्लिशेतर लोकांच्या वसाहतींची वासलात लागली व तो सारा भूभाग इंग्लंडच्या स्वामित्वा खाली आला. आता त्यास दोनच प्रतिस्पर्धी राहिले. वरच्या बाजूस नव्यानेच येऊन बसलेले फ्रेंच व खालच्या बाजूस त्याच्याहीपूर्वी येऊन कायम झालेले स्पॅनिअर्डस्. पैकी स्पॅनिश लोकाविषयीं त्यांस आज तरी कसलेंच भय राहिलें नव्हते. आर्माडाच्या जंगी पराभवाने स्पेन चांगलेंच गारठलें होतें. तें तूर्तास इंग्लिशाच्या वाटेला जाण्यास धजत नव्हते. राहिले फ्रेंच लोक. त्यांचा शह मात्र जोमदार होता. आणि तो फक्त अमेरिकेतील वसाहतीपुरताच नव्हता. युरोपच्या राजकारणात व तिकडे फार दूर असलेल्या हिंदुस्थानातही होता. त्या काळीं त्या दोन्ही सत्ता सर्वत्रच अटीतटीच्या सामन्याने झगडत होत्या. परतु शेवटी इंग्लडनेच मात केली. त्याचें बुद्धिबल, दैवानुकूलता, राजकारणपटुता किंवा दूरदृष्टि. काही गुण म्हणा किंवा सगळ्याच गोष्टी त्यास अनुकूल झाल्या म्हणून म्हणा, इंग्लंडने युरोपांतील सारी राष्ट्रें मागें टाकली व जगाचीं भाग्यसूत्रें आपल्याकडे खेचून घेतलीं!



---

## प्रकरण दहावें

# इंग्लिश वसाहतींचा पुढील विस्तार

इंग्लंडने व्यापारी धोरण राखून स्थापन केलेली व्हार्जिनिया प्रांताची वसाहत आता चांगली नावारूपास आली. तिच्यामुळें सर्वसामान्य इंग्लिश लोकांचे लक्ष तिकडे वेधले व ज्यास कोणत्याही कारणानें इंग्लंडचा त्याग करण्याची पाळी आली, त्याचे पाय या नव्या आश्रय-स्थानाकडे वळूं लागले. अशातच आणखी एक प्रबळ कारण घडले. मार्टिन ल्यूथरने चालू केलेल्या धर्मसुधारणेच्या चळवळीने युरोपाप्रमाणे इंग्लंडातही मोठे स्थित्यंतर घडवून आणिले होते. यामुळें धर्मसुधारणा होण्याऐवजी धार्मिक जुलूम मात्र वाढला होता. राजा सांगेल व धर्माधिकारी बोलतील तोच धर्म सर्वांनी अनुसरला पाहिजे आणि त्याच्या अभिवृद्धीकरिता कर दिला पाहिजे, अशी सक्ती होती.

या वेळीं इंग्लंडात प्रॉटेस्टंट पथांतील एपिस्कोपल चर्चची पूर्ण-तया स्थापना झाली होती व या धर्मपीठालाच सर्वांनी मानलें पाहिजे, असा कायदा होता. ह्या एपिस्कोपल पंथाने पोपचें धर्मगुरुत्व झुगारून दिलें होतें इतकेंच काय तें. बाकी धर्मसुधारणेचीं तत्त्वें त्यात फारशीं समाविष्ट झालेलीं नव्हतीं. चर्च व त्याचे अधिकारी बिशप याचा अधि-कार या पंथाने पूर्णपणें मान्य केला होता. अर्थात् केवळ बायबलला प्रमाण मानणारे व आचारप्रणालींचें अवडंबर त्याज्य समजणारे असे जे तीव्र सुधारणावादी धर्मपंथ त्या वेळीं होते त्याना हा राजमान्य एपिस्कोपल पंथ मुळीच पसंत नव्हता. आणि धर्मसहिष्णुतेच्या तत्त्वाची त्यावेळेस कोणाला फारशी ओळख नसल्यामुळें इंग्लंडमध्यें अशा सुधारणावादी पंथांचा कायदेशीर रीतीने छळ होत होता. अशा पंथांपैकी (१) 'प्यूरिटन' व (२) 'सेपरेटिस्ट' किंवा 'इंडिपेंडंट' हे दोन पंथ त्या वेळीं इंग्लंडात प्रमुख होते. हे दोघेही इंग्लंडच्या प्रस्थापित धर्मपीठाचे कट्टे विरोधक होते आणि त्यासंबंधींचा कर देण्यासही ते सर्वस्वीं प्रतिकूल होते. पण त्याच्या त्या अनिच्छेला राजा जेम्स किंवा बिशप यानी मुळींच मान दिला नाही. इतर अनेक दृष्टींनी आपण उत्कृष्ट नागरिक व पूर्ण राज-

निष्ठ असतां आपणास सर्वस्वीं निरुपद्रवी असें धार्मिक स्वातंत्र्य असूं नये, उलट जो धर्म अमान्य त्याच्या संगोपनार्थ कर देण्याचा प्रसंग यावा, ही गोष्ट त्या लोकांना अत्यंत जाचक झाली. आणि हे लोक आपल्यास वचकत नाहीत असें पाहून राजानेही त्यांचा भरपूर पाठपुरावा केला. कोणाला तुरुंगांत टाकलें, कोणाला हद्दपार केलें, कोणाची घरेंदारें लुटलीं व कोणाला समाजातून उठविलें. त्यातल्या त्यात सेपरेटिस्ट लोकांचा विशेष छळ झाला. कारण त्यांच्यात विद्वान् व सुबुद्ध माणसांचा भरणा असून इतरांपेक्षा ते जास्त स्वातंत्र्यवादी होते. या लोकांनी इंग्लंड सोडून जाण्याचें ठरविले तर ती गोष्ट सुद्धा राजा जेम्सने कबूल केली नाही व त्याकरिताही कित्येकांना कारावास घडला.

शेवटीं काही लोक पळून हॉलंडमध्ये गेलेच. हा देश नुक्ताच पारतंत्र्यमुक्त झाला होता व तेथील लोकांना पूर्ण धर्मस्वातंत्र्य होतें. सेपरेटिस्ट लोकांचीं जीं कुटुंबें हॉलंडमध्यें गेली त्यांना तेथे आश्रय चांगला मिळाला व त्यांना हवें होते ते स्वास्थ्य व धर्मस्वातंत्र्यही तेथं लाभलें.

इकडे सेपरेटिस्ट कुटुंबे हॉलंडमध्ये येऊन एकाप्रकारें सुखी झालीं असलीं तरी त्यांना त्या निवासात दुसरें एक संकट भेडसावूं लागले. इंग्लंड, इंग्लिश भाषा व इंग्रजी रीतिरिवाज यांच्यावर त्यांचे आत्यंतिक प्रेम होतें. त्या सर्वांना कायमचें मुकण्याचें संकट त्यांच्या डोक्यावर लोंबूं लागलें. एक पिढी या देशांत घालविल्यास आपण आपल्या सारसर्वस्वास मुकूं ही गोष्ट त्यांना फार दुःखद झाली. आपल्या मुलाबाळांनी हॉलंडातील कुटुंबांशीं स्नेहसंबंध जोडल्यावर व त्यांतून विवाहादि संबंध घडून आल्यावर त्यांना व त्यांच्या पुढच्या वंशजांना इंग्लंडचे प्रेम राहणार नाही, इंग्लिश भाषा त्यांना नकोशी वाटेल किंवा तिचा विसर पडेल आणि इंग्रजी रीतिरिवाजांना ते टाकून देतील ! मग आपलें स्वत्व ते काय राहिलें ! असे विचार त्यांच्या मनात आले व त्यामुळें हॉलंडचे आश्रयस्थानही त्यांना प्रिय वाटेना. अशा स्थितींत त्यांनी सुमारें अकरां वर्षें काढलीं. पण तेवढ्या अल्पकालांतही त्यांना आपलें स्वत्व त्या परक्या देशांत टिकणें अशक्य आहे असें आढळून आलें व त्यांचीं हृदयें अत्यंत व्याकुल झालीं. इंग्लंडशीं सगेसोयरेपणाचा संबंध न सोडतां, इंग्लिश भाषेला किंवा रीतिरिवाजांना पारखे न होतां व धार्मिक स्वातंत्र्य

राखून आपणास सुखाने नांदतां येईल असें एखादें स्थल पृथ्वीतलावर सापडणार नाही काय; अशा आशेने त्यांनी भूगोलाकडे पाहिलें व त्यांना अमेरिकेच्या स्वतंत्र भूमीचें दर्शन झालें! त्यांनी तिकडे जाण्याचें निश्चित केलें. मात्र त्याना व्हर्जिनियाच्या वसाहतींत जाणें शक्य नव्हतें. कारण तेथे इंग्लंडमधील धर्मपीठच स्थापित झालेलें होतें. बरें, हॉलंडचे प्रजाजन म्हणून न्यू नेदर्लंडच्या वसाहतींत जावें तर तें त्यांना अभीष्ट नव्हतें. अमेरिकेंत जावयाचें तर स्वतंत्र प्रदेश घेऊन आपली स्वतंत्र वसाहत करणेंच त्यांना श्रेयस्कर होतें.

हॉलंडमध्यें आल्यापासून या पोरक्या कुटुंबांनी स्वतःला 'पिलग्रिम्स' (Pilgrims) म्हणजे 'यात्रेकरू' या नावाने संबोधून घेण्यास प्रारंभ केला असल्यामुळें तेथून निघून अमेरिकेंत जाण्यास त्याना तें नाव समर्पकच पडलें. असो. पिलग्रिम्सनी अमेरिकेंत जाऊन वसाहत करण्याचें ठरविलें; पण हें शेवटास कसे न्यावयाचें हा प्रश्न होताच. त्यांनी निरुत्साह न होतां आटोकाट प्रयत्न केला. लंडन कंपनीची सहोदर प्लायमाऊथ कंपनी हिच्याकडे त्यानी वशीला लाविला. राजा जेम्सकडे विनवण्या करून त्याची परवानगी मिळविली आणि नंतर ते लोक पुन्हा इंग्लंडात आले.

प्लायमौथ कंपनीच्या चालकानी पिलग्रिम्सना दोन अटींवर वसाहत करण्याची परवानगी दिली. पहिली अट, पिलग्रिम्सनी सात वर्षें कंपनीकरितां गुलामाप्रमाणें राबावें व दुसरी अट अशी की, या मुदतीच्या अखेरीस जो द्रव्यसंचय होईल, त्यातील निम्मा भाग कंपनीस द्यावा. वास्तविक या दोनी अटी जाचक व निराशाजनक होत्या. पण इतर कोणतेंही बंधन नसल्यामुळें व स्वत्व न सोडतां पूर्ण धर्मस्वातंत्र्य मिळणार असल्यामुळें त्यानी त्या मान्य केल्या व जाण्याची तयारी आरंभली. त्यांच्या पंथांतील माणसें अदमासें ९० होतीं व इतर बारा सख्यत्वाने किंवा सेवक रूपाने जोडलेलीं होतीं. माइल्स स्टँडिश हा एकंदर टोळीचा प्रमुख होता. व्हर्जिनिया प्रांताकडे प्रथमतः निघालेल्या टोळीचा नायक जसा जॉन स्मिथ, तसा पिलग्रिम लोकांचा नायक हा स्टँडिश होता. यास वीराचा हात, सेनानीचें मस्तक व मातेचें हृदय असल्यामुळें त्याचा त्या लोकाना अत्यंत उपयोग झाला.

पिलग्रिम्सनी या लांबच्या प्रवासाकरितां 'मे फ्लावर' (वसंतपुष्प) व 'स्पीड वेल' अशी दोन जहाजे भाड्याने ठरविलीं आणि नंतर इंग्लंड-च्या दक्षिणेस असलेल्या प्लायमाऊथ बंदरातून इ. स. १६२० च्या सप्टेंबर महिन्यात प्रयाण केले! या लोकाना इंग्लंडमध्ये काडीचें स्वास्थ्य किंवा स्वातंत्र्य मिळाले नसताही व धार्मिक जुलूम टाळण्याकरिताच त्यानी देशातर करण्याचें ठरविलें असतांही इंग्लंडचा किनारा सोडताना त्याचे ऊर दुःखाने व नेत्र अश्रूंनी भरून आले! "नमस्ते! मातृभूमि नमस्ते!!" असे कंपित स्वरात म्हणत त्यांनी त्या देशाचा शेवटचा निरोप घेतला.

हॉलंडने न्यू नेदर्लेंड नांवाखालीं अमेरिकेचा जो भूभाग व्यापला होता; त्याच्या वरच्या बाजूस 'कॉड' नावाचें एक भूशिर आहे. पिलग्रिम्सचीं जहाजें प्रथमतः या टोकास लागली. पण डिसेंबर महिन्याची कडक थंडी व तुफान वादळे सुरू असल्यामुळें त्याना तेथूनही वर सरकावें लागले. ते एक वळण मारून आतल्या आखातात गेले आणि नंतर जहाजे नांगरून किनाऱ्यावर उतरले. राजाश्रय नसल्यामुळें त्यांची अवस्था पोरक्या मुलाप्रमाणेच होती. तरीपण त्यानी स्टॅंडिशच्या अधिकाराखाली आपल्या वसाहतीच्या कारभाराचा एक मसुदा तयार केला आणि त्यास अनुसरून प्रत्येकाने वागलें पाहिजे अशा आणाभाका झाल्या. अंतःकरणातून ते लोक राजनिष्ठ असल्यामुळें त्यांनी स्वतःला इंग्लंडच्या राजाचे प्रजाजन असेंच म्हणवून घेतलें, किनाऱ्यावर चांगलें स्थल पाहून प्लायमाऊथ नांवाचें गांव वसवलें आणि नंतर आपल्या नव्या जीवनास प्रारंभ केला.

पिलग्रिम्सनी ज्या भागांत प्रवेश केला होता, त्या भागास 'मासाच्यूसेट्स' म्हणजे मोठ्या टेकड्या असे इंडियन लोकांचें नाव होतें. वसाहतवाल्यांनी 'प्लायमाऊथ' असें प्रथमतः नांव दिले; पण तें फार काल टिकलें नाही. इंडियन नांवच रूढ झालें.

इ. स. १६२६ पर्यंत पिलग्रिम्स लोक प्लायमाऊथ कंपनीचे बांधलेले राहिले. पुढे त्यांनी इंग्लंडमधील मित्राच्या साह्याने कर्ज उभारलें आणि कंपनीकडून तो भूभाग कायमचा विकत घेतला. कंपनीला सनदेवरून तो प्रदेश मिळाला असल्यामुळें आता ती सनद पिलग्रिम

लोकाच्या नावें झाली. इकडे या वेळीं इंग्लंडांत जेम्स राजा मरण पावून त्याचे जागी पहिला चार्लस आलेला असल्यामुळे त्याकडून दूरस्थ पिलग्रिम्सना कसलाच उपसर्ग पोचला नाही.

अशा प्रकारें दूर देशांतरीं येऊन मनासारख्या साऱ्या गोष्टी झाल्या असताही पिलग्रिम्सनीं स्थापन केलेली वसाहत उत्कर्षास येण्यास कालावधि लागला. पण त्यांचें खरें यश भौतिक नव्हते तर आध्यात्मिक होतें. अमेरिकेच्या भूमीवर जीवनार्थ कलह झगडताना त्या सर्व लोकाना अत्यंत कष्ट पडले. पण त्यानी त्याची केव्हाही क्षिति न बाळगता आपलें धर्मस्वातंत्र्य कायम राखलें. आणि हे त्याचे उदाहरण इतरांना मार्गदर्शक झालें !

धार्मिक स्वातंत्र्य पाहिजे असल्यास इंग्लंड सोडले पाहिजे व तसा देशत्याग केल्यावर स्वत्वाची हानि न होतां मनाला समाधान लाभतें ही गोष्ट पिलग्रिम लोकानी सिद्ध करून दाखविलेली पाहताच प्युरिटन पंथातील मुख्यांनाही त्याचें अनुकरण करण्याची इच्छा झाली. जॉन एंडिकॉट नावाचा एक धनाढ्य प्युरिटन होता, त्याने आपल्या पंथातील लोकाकरिता अमेरिकेच्या स्वतंत्र भूमीवर एक नवें आश्रयस्थान निर्माण करण्याचा निश्चय केला व इ. स. १६३० सालीं त्याने तशी एक सनदही मिळविली. धार्मिक जुलुमाला त्रासलेली प्युरिटन कुटुंबें एकत्र झालीं व त्यांनी अमेरिकेत येऊन प्लायमाऊथ वसाहतीच्या वरच्या अंगास स्थान घेतलें. तेथे त्यानी शांतिस्थान (Salem) नावांचे गाव वसविलें. अशा रीतीने प्युरिटन लोकाच्या वसाहतीस प्रारंभ झाला.

एंडीकाट हा पक्का प्युरिटन असल्यामुळे व त्यानेच ती वसाहत स्थापिल्यामुळे इंग्लंडच्या वतीने तोच तेथे गव्हर्नर झाला. स्वत:च्या पंथाव्यतिरिक्त इतर कोणताही पंथ एंडिकॉटला मान्य नव्हता. यामुळें या वसाहतींत अन्यपंथीय लोकाना वसाहतीस येण्याची सक्त मनाई होती. असे असतांही या वसाहतीचा उत्कर्ष झपाट्याने होऊं लागला. एंडिकाटच्या मागून बुइन्थ्राप नांवाचा एक नवा गव्हर्नर आला. हा प्युरिटन असून शिवाय धनाढ्यही होता. याने आपल्यासंगें आपल्या पंथाचीं सातशे माणसें आणिलीं.

पण वुइन्थ्रॉपला सालेम गांव फारसें आवडलें नाही. म्हणून त्याने आपल्या मनासारखें एक नवें स्थान पाहून तेथे बोस्टन या प्रसिद्ध नगराची स्थापना केली. प्युरिटन लोकांनी स्थापलेल्या वसाहतींत अन्य-पंथीयांना वसाहतीस येण्याची मनाई असली तरी त्यांच्यामध्यें व 'पिलग्रिम्स' लोकांच्या धर्ममतामध्यें फारच थोडें अंतर असल्यामुळें त्या दोनही वसाहती एक झाल्या व त्यामुळे त्यांचें सामर्थ्य वाढलें.

या एकत्रित झालेल्या वसाहतींचा राज्यकारभार बहुतेक लोक-मतानुवर्ती होता. प्रथम कांही काल वसाहतवाल्यानी एक मंडळ नेमून त्याच्यातर्फे सर्व कारभार चालविला. पण जसजसें वसाहतीचें क्षेत्र वाढले, नवी नवीं गावें नगरें वसूं लागलीं तसतशी राज्यकारभाराची पद्धत त्याना सुधारावी लागली. पुढे त्यानी एक जनरल कोर्ट स्थापन केलें. तेथे निरानिराळ्या गावचे प्रतिनिधि जमूं लागले व त्या सर्वांच्या एकमताने कायदेकानू बनूं लागले. मत देण्याचा अधिकार मात्र सर्वांनाच नव्हता. राज्यकारभाराची सूत्रेंही कांही ठरावीक व्यक्तीच्याच तंत्राने चालली पाहिजेत असे एंडिकॉटप्रमाणें वुइन्थ्रापचेंही मत असल्यामुळें सत्ता चालविण्यास सामान्य लोकाना संधि मिळत नव्हती. व्हर्जिनियामध्ये लोकप्रतिनिधींचें मंडळ असतांही तेथील मुख्य सत्ता जशी धनिकांच्या हातात होती, तशीच मासाच्यूसेट्सची वसाहत सामान्य प्युरिटन लोकां-करितां असताही ती कांही ज्वलज्जहाल प्युरिटनाच्या हातांत होती. परपंथीयास तीत सामील होणें तर अशक्यच होतें.

पण असा एकागीपणाचा राज्यकारभार तेथे चालला असताही इतर कोणत्याही स्थानीं—युरोपांतसुद्धा—न आढळणाऱ्या लोककल्याणाच्या कांही सुधारणा तेथे फार लौकर सुरू झाल्या. इ. स. १६३५ सालीं बोस्टनमध्यें मुलाना शिक्षण देणारी सार्वजनिक शाळा स्थापन झाली व त्यानंतर लागलीच प्राथमिक शिक्षण देणारीं विद्यालयें सर्वत्र स्थापण्यांत आलीं. पण एवढ्यावरच राज्यकारभार चालविणारें जनरल कोर्ट समाधान पावलें नाही. इ. स. १६३६ सालीं त्याने एक वर्षाचा सबंध कर न्यूटन या गावीं एक महाविद्यालय स्थापण्यास दिला. यानंतर दोनच वर्षांनी या कॉलेजास रे. जॉन हार्वर्ड या विद्वान व परोपकारी सज्जनाने आपलें खाजगी ग्रंथालय व अर्धी संपत्ति देणगी म्हणून दिली. तेव्हा

त्या कॉलेजास त्याचे नाव देण्यांत आलें व पुढे यातूनच आजच्या विश्वविख्यात हार्वर्ड विद्यापीठाचा जन्म झाला. पुढे इ. स. १६४७ सालीं प्राथमिक शिक्षण सक्तीचें करण्यांत आले. या सुमारास रानटी रेड इंडियनांची सुधारणा करण्याकडेही कांहीं पाद्री लोकाचें लक्ष वेधलें. असो.

इ. स. १६३५ साली आणखी एक सांगण्यासारखी गोष्ट घडली. इंग्लंडहून सालेम गांवीं रॉजर विल्यम्स या नांवाचा एक धर्माधिकारी बोलावण्यात आला होता. हा स्वतः प्युरिटन असला तरी हेकेखोर नव्हता. वाचनाने व विचाराने त्याची मतें प्रगल्भ बनलीं होतीं. धर्माच्या बाबतींत कोणी कोणावर जुलूम करूं नये, ज्यास जो पंथ विवेकपूर्वक बरा वाटेल तो त्याने स्वीकारावा व राजसत्तेने त्याच्या त्या मार्गांत उगीच ढवळाढवळ करूं नये अशी रॉजर विल्यम्सची मतें होतीं. मासाच्यूसेट्सचे सरकार प्युरिटन पंथीयांनाच जवळ करतें व इतरांना तुच्छ लेखते ही गोष्ट त्यास हास्यास्पद वाटत होती. आपलीं हीं मतें तो उघड बोलून दाखवूं लागला! अर्थात् हेकेखोर प्युरिटन सत्ताधाऱ्याच्या मनाला धक्का बसला. त्याना असल्या मताचा धर्माधिकारी भयंकर मनुष्य वाटूं लागला. बरें रॉजर विल्यम्सने एवढ्यावर गप्प बसावें की नाही, त्याने आणखी एक कुलंगडें उपस्थित केलें. आतापर्यंत सार्वत्रिक समज असा होता की, अमेरिकेची भूमि इंग्लंडच्या मालकीची. रॉजर विलियम्स प्रतिपादूं लागला, "राजाच्या बापाचें येथे काय लागतें! ही भूमि मुळांत रानटी इंडियन लोकांची आहे. ती त्यांच्याकडून विकत घ्यावी आणि मग तेथे नांदावें. राजाने तीन हजार मैलावर राहून तेथून आपला हक्क सांगावा व वसाहतवाल्यानी तो मानावा हा शुद्ध नादानपणा आहे." राजसत्ता व धर्मसत्ता या दोन्ही सत्तांना हरताळ फासूं पाहणारें हें तत्त्वज्ञान मासाच्युसेट्सच्या जनरल कोर्टाला रुचलें नाही. त्याने लागलीच रॉजरला हद्दपारीची किंवा पकडून इंग्लंडात परत पाठविण्याची शिक्षा सुनावली. ती ऐकून तो पळून नाहीसा झाला.

रॉजर विल्यम्स नाहीसा झाला पण त्याने पेरलेली विचारबीजे मात्र मागे राहिलीं. लोकाना असें वाटूं लागलें, "आपण इंग्लंड का

सोडलें ! धार्मिक जुलुमाला कंटाळून. मग तोच प्रकार आपणही अन्य-प्रकारें या स्वतंत्र वसाहतींत का आचरावा !"

राज्यकारभारांत धर्माचा हात सुतराम् असूं नये हें जें आजच्या अमेरिकेचें मुख्य सूत्र तें असें जन्मास आलें. त्याचा प्रभाव जरी त्या वेळीं दिसला नाही, तरी तें लोकांच्या मनांत वाढीला लागलें यात शंका नाही. असो.

पिलग्रिम्स व प्युरिटन्स या दोन पंथानी आपआपल्या वसाहती स्थापून जर धार्मिक स्वातंत्र्य मिळविलें तर त्याच मार्गाचा अवलंब आपणही का न करावा ? असा विचार इंग्लंडमधील त्रस्त कॅथॉलिक लोकांच्या मनात उभा राहिला. कारण या पथातील लोकांचाही राजाकडून व धर्मपीठाकडून पुष्कळच छळ होत होता. कराच्या किंवा दडाच्या रूपाने त्याच्याकडून द्रव्यही सारखें शोषिले जात होतें, यामुळें त्या लोकांना इंग्लंडात राहाणें नको असें झाले असल्यास नवल नाही. म्हणून त्यांचेंही लक्ष अमेरिकेकडे वेधलें व त्यातील मुख्यानी कॅथॉलिक वसाहत स्थापण्याचें ठरविलें. वास्तविक या वेळीं–इ. स. १६३४ च्या सुमारास–इंग्लडच्या गादीवर पहिला चार्लस आला होता व त्याने फ्रान्समधील कॅथॉलिक पंथाची एक राजकन्या राणी करून घेतली होती म्हणजे चार्लसचा कल कॅथॉलिक लोकाकडे झुकला होता म्हणण्यास हरकत नाही. परंतु राजाने आचरलेली ही गोष्ट पार्लमेंटला व धर्मपीठाला मुळीच पसत नव्हती. यामुळें राजानुकूलता असताही अद्यापि इंग्लंडचें धार्मिक वातावरण कॅथॉलिक पंथीयांना फारसे कल्याणप्रद नव्हतें. त्यांत राजा चार्लस अत्यन्त स्वार्थी, दुराग्रही, चंचलचित्त व अनियंत्रित सत्तेचा भोक्ता असल्यामुळे तो सर्वत्र अप्रियच होता. यामुळें त्याचे बारा केव्हा वाजतील याचा नेम नव्हता. आणि पुढे तसेच झालें. इ. स. १६४९ मध्यें पार्लमेंटने राजावर देशद्रोहाचा आरोप ठेऊन त्यास देहात प्रायश्चित्त दिलें.

यावरून कॅथॉलिक लोकानी आपली स्वतंत्र वसाहत करण्याची कल्पना काढली ती योग्यच होती म्हणण्यास हरकत नाही. जॉर्ज कॅलव्हर्ट उर्फ लार्ड बाल्टिमोर नांवाचा एक कॅथॉलिक पथाचा सरदार होता. त्याने हें कार्य हाती घेतले. चार्लसचा व त्याचा स्नेह असल्यामुळे त्याने राजाकडे नव्या वसाहतीची सनद मागितली. राजाने ती देण्याचें कबूल

केलें. पण इतक्यांत लार्ड बाल्टिमोर वारला व त्याचे जागीं त्याचा मुलगा सेसिल कॅलव्हर्ट आला. असा घोटाळा झाला तरी सेसिल हाही आपल्या पित्याप्रमाणें उमद्या मनाचा, प्रयत्नवादी व स्वातंत्र्याचा भोक्ता असल्यामुळें त्याने पित्याचें कार्य अर्धवटच टाकलें नाही. राजाने कबूल केलेली सनद त्याने मिळविली व इ. स. १६३४ सालीं वसाहतीस जाऊं इच्छिणाऱ्या कॅथॉलिक यात्रेकरूंचा मेळा घेऊन अमेरिकेकडे कूच केलें. 'न्यू स्वीडन' नांवाची जी स्वीडिश वसाहत झाली होती, तिच्या पश्चिम अंगास बाल्टिमोरने आपल्या लोकांची वसाहत वसवली आणि तिला 'मेरीलॅंड' असें नाव दिलें! या स्थानीं त्यांनी सेंट मेरी हें गाव वसविलें.

या वसाहतीची मालकी लार्ड बाल्टिमोरकडे असतांही त्याने मोठ्या औदार्याने प्रथमपासूनच तेथील राज्यकारभार लोकनियुक्त मंडळातर्फे चालविला. याशिवाय त्याने आणखी एक महत्वाची गोष्ट केली. ती म्हणजे लोकांना पूर्ण धार्मिक स्वातंत्र्य दिलें. वसाहत कॅथॉलिक लोकाकरिता असताही प्रत्येक वसाहतवाल्याने कॅथॉलिक असलेंच पाहिजे किंवा त्या पंथाप्रमाणें चाललें पाहिजे असा दुराग्रह त्याने काढून टाकला. कोणाही खिस्तधर्मीयाने—मात्र खिस्तधर्मीयानेच— मेरीलॅंडमध्यें यावें व सुखाने राहावें असें स्वातंत्र्य लोकाना मिळालें. यामुळें ही वसाहत अनेकानेक त्रस्त जीवांना आश्रयरूप झाली व तिचा लौकिकही वाढला.

अशाप्रकारें या वसाहतीने धार्मिक स्वातंत्र्याचा एक नवा उपक्रम सुरू केला असतां व तो सर्वांनाच कल्याणप्रद असतां, आजूबाजूच्या धर्मवेड्या प्युरिटन, व्हर्जिनियांतील प्रॉटेस्टट, इत्यादि लोकांना तो मानवेना. त्यांनीं मिळालेल्या सवलतींचा भलताच फायदा घेण्याचें ठरविलें. मेरीलॅंड मध्यें आपलें संख्याधिक्य होईल असा प्रयत्न त्यांनी आरंभिला व इतरही अनेक खेंकटीं निर्माण केलीं. इकडे इंग्लंडमध्यें त्यावेळीं राजा चार्लस व पार्लमेंट यांचें भांडण चांगलेंच विकोपाला गेलें होतें व जिकडे तिकडे अंदाधुंदी माजली होती. त्याचाही फायदा मेरीलॅंड मध्यें घुसलेल्या त्रयस्थांना मिळाला. इ. स. १६४९ मध्यें तर या लोकांनी अशी स्थिति आणिली की, मेरीलॅंडच्या राज्यकारभाराचीं सूत्रे आपल्या हातीं घेतलीं आणि धार्मिक विषयांतील पूर्वीचें सारें वाता-

चरण बदलून कॅथॉलिकपंथ आचरणें हाच गुन्हा ठरविला ! बाल्टिमोरच्या वारसा उडवून टाकला !

पुढे इंग्लिश पार्लमेंटने हा अन्याय दूर केला ही गोष्ट निराळी. पण त्या काळीं धार्मिक बाबतींत त्या लोकाची एकंदर मनःस्थिति व आचारविचार कसे होते, हें यावरून सहज कळण्यासारखें आहे. असो.

मेरीलँडची वसाहत होत असतानाच त्याच वर्षी वरच्या अंगास—मासाच्युसेट्सच्या पश्चिम दक्षिण बाजूस—एक नवी वसाहत तयार होत होती. आतापर्यंतच्या वसाहती अमेरिकेबाहेरून आलेल्या लोकांनी वसविलेल्या होत्या. पण ही नवी वसाहत मात्र मासाच्युसेट्समध्यें येऊन वसलेल्या लोकांनी आरंभिली. याला दोन कारणे घडलीं. पहिले कारण असें की, मासाच्युसेट्सचा समुद्रालगतचा बराच मोठा प्रदेश अगदी नापीक व रुक्ष होता. समुद्रांत कॉड मारण्याची गर्दी असल्यामुळें मच्छीमारीचा धंदा लोकांनी जोराने चालू केला होता हें खरें; पण सर्वांचा समावेश तिकडे होणें कठिण होत चाललें. तेव्हा साहजिकच प्रयत्नवादी वसाहतवाल्यांचें लक्ष भोवतालच्या व आंत असलेल्या सुपीक प्रदेशाकडे वळलें. या भागांतून कनेक्टिकट या नांवाची एक लांब नदी वाहात होती आणि तिच्या दोनही तीरांला अत्यंत सुपीक जमीन पसरलेली होती. म्हणून बोस्टन नगराच्या लोकांनी तिकडे आक्रमण करण्याचें योजिलें. दुसरें कारण थोडेसें धार्मिक स्वरूपाचें होतें. रॉजर विल्यम्सने जे विचार प्रसृत करून ठेविले होते, त्यांनी कांही कांही लोकांच्या मनांत मुळें धरलीं होतीं. अशा लोकांना धर्मस्वातंत्र्य व मतस्वातंत्र्य इष्ट वाटत होतें.

तेव्हा दोन्ही प्रकारच्या लोकांनी कनेक्टिकट भागात शिरून वेदरफील्ड, वुइंडसर व हार्टफोर्ड अशीं तीन नवीं गावें वसविलीं व आपल्या या वसाहतीस 'कनेक्टिकट' असें नांव दिलें. इ.स.१६३९मध्ये ही वसाहत चांगली नावारूपास आली व तिला आपलें स्वतंत्र सरकार स्थापणें अगत्याचें झालें. म्हणून त्यांनी सभा बोलावली व एक मसुदा तयार केला. या मसुद्यांत कळत वा न कळत एक महत्त्वाचा मुद्दा गोवला गेला. तो म्हणजे—'सरकार लोकांचें, लोकांकरिता व लोकांकडून' ( Government by the people, of the people, for the

people ) हें लोकशाहीचें प्रसिद्ध वाक्य होय. आतापर्यंतचा शिरस्ता असा की, कोणत्याही वसाहतीची राज्यघटना बनविण्याचें ठरलें की, अगोदर ' इंग्लंडच्या राजाशीं राजनिष्ठ राहूं,' या वाक्याने सुरुवात व्हावयाची. पण कनेक्टिकटच्या सूत्रचालकानी आपली घटना ठरविताना हा मुद्दा अजीबात गाळून टाकला !— मग रॉजर विल्यम्सने पेरून ठेविलेल्या विचाराचा हा अप्रत्यक्ष परिणाम होता की काय न कळे !

कनेक्टिकटचें स्वतंत्र सरकार स्थापन झाले त्याच सुमारास इंग्लंडमधून रे० जॉन डेव्हनपोर्ट नांवाचा एक धर्माधिकारी बोस्टनला आला होता. त्याने एक न्यू हेवन नावाची वसाहत स्थापली. ही प्युरिटन पंथीयांची होती व तेथील एकंदर कायदेकानू मासाच्युसेट्स-प्रमाणें होते. मात्र येथील वसाहतवाल्यात इंग्लंडच्या राजाविषयीं—चार्लस पहिला व दुसरा—मोठा तिटकारा वसत होता. आणि तो त्यानी प्रसंग येतांच उघड उघड दर्शविला. इ. स. १६४९ सालीं पहिल्या चार्लसला ज्या न्यायाधीशानी अपराधी ठरवून देहात शासन आज्ञापिलें, त्यांना दुसऱ्या चार्लसने ठार मारण्याचा निश्चय केला. त्यापैकी दोन निसटून अमेरिकेंत पळून आले. त्यांना आश्रय देण्याचें धाडस न्यू हेवन कॉलनीने केलें. यावरून वसाहतवाल्यांचीं मनें लोकशाहीकडे कशीं झुकत चालली होतीं हें कळेल. न्यू हेवनच्या या कृतीने चार्लसने संतापून काय काय केलें तें पुढे कळेल. असो.

मासाच्युसेट्सच्या खालच्या अंगास कनेक्टिकट वसाहत वाढत असतांच, वरच्या अंगास 'न्यू हॅम्पशायर' नांवाची वसाहत वाढूं लागली होती. या वसाहतीचें महत्त्व हें होतें की, स्कॉटलंडमधील तागाची शेती करणारे शेतकरी आणि त्यापासून कापड काढणारे विणकरी यांनी येऊन तेथे वसाहती केल्या होत्या. यामुळें अल्पावकाशांत सर्व वसाहतींतील बायकांना ताग कातून देण्याचा धंदा मिळाला व घरोघरीं रहाटाचें गुंजन ऐकूं येऊं लागलें.

यानंतरची सांगण्यासारखी वसाहत 'ऱ्होड आयलंड' होय. आपल्या मतस्वातंत्र्यामुळें मासाच्युसेट्स संस्थानांतून काढून लाविलेला रॉजर विल्यम्स हा या वसाहतीचा जनक होय. प्राणभयाने पळून गेल्या-वर कांही काळ तो इंडियन लोकांच्या आश्रयास जाऊन राहिला.

स्वबांधवापेक्षा ते रानटी लोकच त्यास बरे वाटले. त्याने त्यांच्यामध्यें मिसळून कार्य चालविलें व त्या लोकाकडून गोऱ्या वसाहतींना होणारा ताप कमी प्रमाणांत आणिला. प्रथमत: त्याच्या मनांत वसाहत स्थापण्याचें नव्हतें. परंतु तो जेथे जाई तेथे त्याला त्रास होई. तेव्हा त्याने स्वतःचें एक स्वतंत्र स्थान निर्माण करण्याचें निश्चित केलें. मासाच्युसेट्स व कनेक्टिकट यांच्या बगलेंत नारंगनसेट नावाचें एक चिमुकलें आखात आहे. तेथील प्रदेश निर्जन पाहून राजर विल्यम्सने 'प्राव्हिडेन्स' (ईश्वरी कृपा) नांवाचें नगर वसवलें. पुढे त्याच्याच मताचीं ॲन हच्चिनसन, कार्डिंगटन, मेरी डायर, इत्यादि माणसें त्यास येऊन मिळालीं व नंतर त्यांनी जवळचे ऱ्होड बेट व इतर थोडासा प्रदेश विकत घेऊन एका नव्या वसाहतीची स्थापना केली. मेरी लँड वसाहतीने फक्त ख्रिस्ती धर्मीयानाच धर्मस्वातंत्र्य दिलें होतें. रॉजर विल्यम्स त्याच्यापुढे गेला. काळा, गोरा, ज्यू, ख्रिस्ती असा कोणताही भेद न पाळता सर्वांना त्याने स्वधर्माने चालण्याची मोकळीक दिली. एवढेंच नव्हे तर राज्यकारभारातून धर्माचा संबंध अजीबात काढून टाकिला! त्यावेळच्या उदारमतवादी प्युरिटन किंवा पिलग्रिम्स यानाही हें मत झपण्यासारखें नव्हते. सर्वांची अशी कल्पना होती की, रॉजर विल्यम्सचें हें बेफाम स्वातंत्र्य अल्पकालच टिकेल. परंतु तसें न होता तेंच अजिंक्य व दीर्घजीवी झालें !

---

## प्रकरण अकरावें

# सृष्टीचा न्याय—बळी तो कान पिळी !

वसाहतीच्या रूपाने गोऱ्या लोकाचा पाय आता अमेरिकेच्या भूमीवर कायमचा रोवला गेला. पूर्व किनाऱ्यावरील चेसॅपीकच्या छोट्या उपसागरापासून तों सेंट लॉरेन्सच्या वड्या आखातापर्यंत सुमारें हजार बाराशें मैलांचा टापू त्यानी आपलासा केला व नाक्याच्या जागा शोधून तेथे बंदरें उभारलीं. मग त्या त्या स्थानीं त्याचीं जहाजें येऊं जाऊं लागलीं.

आज दहा पांच तर उद्या पांच पन्नास अशा वाढत्या संख्येने त्यांच्या झुंडी इंग्लड युरोपांतून येऊं लागल्या व बंदरावाटे आंत शिरपून क्षेत्र आक्रमू लागल्या. समुद्राचे किनारे, नदीचे दोन्ही तीर, डोंगर व टेकड्या आणि चांगलीं पाणस्थळें, यांच्या आश्रयाने गावें वसूं लागलीं. त्याबरोबर अरण्यें तुटत चाललीं, शेतजमिनी निघूं लागल्या व नंतर कृषि व तिच्या अनुषंगाने चालणारे इतर अठरापगड धंदे याना सुरवात झाली. अर्थात् या सर्व गोष्टी एकामागून एक सुगमपणे होत गेल्या असे मुळीच नाही. वसाहतवाल्याना या संबंधात प्राणांतिक कष्ट सोसावे लागले व निसर्गाने प्राप्त केलेल्या आपत्तीशीं झगडावे लागलें. तेव्हा कोठे त्याचें पद या अपरिचित भूमीवर स्थिर झालें. त्यानीही ही तपस्या अदम्य उत्साहाने केली यात शंका नाही. अस्तु.

गौरकायाची ही प्रगति चालू असता त्या भूमीचा मूळ स्वामी जो ताम्रवर्णी रानटी इंडियन तो काय ती मजा पाहात स्वस्थ बसला होता ! –नाही. आपलें स्वामित्व अढळ राहावें, आपलें वतन हिरावलें जाऊं नये आणि आपली जाति व वंश याच्यावर नामशेष होण्याची पाळी येऊं नये म्हणून त्यानेही आपल्याकडून आतापर्यंत झगडा केला. परंतु अरेरे ! सृष्टीचा कठोर न्याय ! सशक्त, बुद्धिमान व कपटपटु याच्याशीं अशक्त, निर्बुद्ध व भोळा याची गाठ पडली तर पहिला जगतो व दुसरा मरतो ! दोन तुल्यबल पक्षांत जातीय अस्तित्व टिकविण्याविषयींचा कलह सुरू झाला, तर ‘ यश कोणाचें ! ’ हा संदेह निर्माण होतो. परंतु जेथे ही तुल्यबलता नाही, तेथे सृष्टीच्या न्यायाचा काटा सबलाकडे झुकतो आणि दुर्बल टाकाऊ ठरतो. गौरकाय युरोपिअन व ताम्रवर्णी इंडियन यांच्यामध्यें केवळ शरीराकाराचें साम्य होतें. बाकी आकाश–पाताळा-इतकें अंतर ! अर्थात् पहिल्यापुढे दुसऱ्याचा अंत निश्चित होता !

पशुपक्षी व कृमिकीटक याच्या ठायींसुद्धा राहत्या स्थलाविषयीं प्रेम आढळून येतें, मग मनुष्यास आपल्या वतनाविषयीं प्रेमादरभाव असल्यास त्यांत आश्चर्य कसलें ? रानटी इंडियन पशुतुल्य राहात वागत असला तरी घरदार व शेतवाडी करणें एवढें ज्ञान त्यास होतें. यामुळें ज्या भूमीवर तो नांदत होता, तिजविषयीं त्यास प्रेम होतें. स्वदेश, स्वदेशप्रीति, स्वदेशाभिमान या सुसंस्कृत जातीच्या कल्पना त्यास स्फुरल्या

नसल्या तरी स्वतःच्या जन्मभूमीविषयींची त्याची आत्मीयता काही कमी प्रबल नव्हती. यामुळें गौरकायांचें अस्तित्व त्यास भयप्रद वाटूं लागलें. चालून आलेल्या प्राणसंकटाची त्यास ओळख झाली व त्याचें भोळें परंतु विकारवश मन अत्यंत अस्वस्थ झालें. गौरकायांनी त्यास प्रेमाने राहोच पण साध्या माणुसकीनेसुद्धा वागविलें नव्हतें; त्यात त्याने ज्या वेळीं आपणास लाथा मारणारा पाय आपल्या वतनातही घुसतो आहे असें पाहिलें, त्यावेळीं त्याच्या मनाला किती क्लेश झाले असतील याची कल्पनाच केली पाहिजे !

अमेरिकेविषयीं ग्रंथ लिहिणारे इंग्रजी लेखक असें आग्रहानें प्रतिपादन करितात की, इंग्लिश वसाहतवाल्यानी वसाहतीकरिता जमिनी आक्रमण करितांना, त्याचेवरील रेडइंडियन लोकाचा मालकी हक्क कधीच डोळयाआड केला नाही. बहुतेक साऱ्या जमिनी इंडियन लोकांना योग्य मोबदला देऊन रीतसर खरेदी करण्यात आल्या. क्वचित् कोठे बलात्कार किंवा अन्याय झाला असल्यास न कळे ! पण बाकीचा बहुतेक व्यवहार सचोटीनेच करण्यात आला.

इतिहासकाराचें हें म्हणणें विवादात्मक असले तरी आपण घटकाभर तें खरें मानूं. पण तें तसें मानूनही गोऱ्या वसाहतीमुळें रानटी इंडियन लोकाना जें संकट प्राप्त झालें त्याची तीव्रता कमी मानतां येत नाहीं. कोणत्याही देवघेवीच्या व्यवहारात देणारा व घेणारा दोघेही समंजस व व्यवहारचतुर लागतात. तसें नसेल तर जो धूर्त त्याचें फावतें. अमेरिकेच्या जमिनीची खरेदी विक्री होतांना हीच तऱ्हा झाली. उत्कृष्ट सुपीक जमिनीला ताम्रवर्णीयाना मुकावें लागलें. आणि नंतर 'सर्प व साळू' या नीतिकथेनुरूप गोरा सुखावत चालला व इंडियनांचा संकोच झाला. त्या लोकांना हळूहळू नापीक व रोगट भागात सरकावें लागले, त्यांचीं शिकार मिळविण्याचीं जंगलें कमी होत चाललीं व त्यांचा असा कोंडमारा होत चालला की, गौरकायांच्या बंदुकीच्या टप्प्यांतच राहणें त्यांना भाग पडावें. या विपरीत परिस्थितीमुळें जरी त्यांच्या जमिनी गोऱ्या लोकानी पृथ्वीमोलाने खरेदी केल्या असल्या तरी त्याचा लाभ इंडियन लोकांना मिळालाच नाही. त्यांची कुचंबणा पद्धतशीर सुरू झाली. हा मुका छळ पाहून ते लोक हिंस्र पशूप्रमाणें खवळून उठले व

मग त्यांनी गोऱ्या वसाहतवाल्याना सळो की पळो करून सोडिले ! या कृतीने त्याने आपली आपत्ति शतगुणित केली, यात शंका नाही. पण करतो काय बिचारा ! सापळ्यात सापडला खरा !

खरोखरच त्यावेळची त्या लोकाची मन:स्थिति किती क्रोधसंतप्त व दु:खव्यास असेल याची कल्पनाही करवत नाही. सहृदय वाचकानी पुढील चित्र आपल्या मनापुढे आणावे. 'एका उंचवट्याचे जागी एका गर्द जाळीच्या आड एक इंडियन उभा आहे आणि तो खालच्या भागात पाहतो आहे. गौरकायाची एक छोटीशी वसाहत त्याच्या दृष्टिक्षेपात आली. ते छोटेसे गाव, त्याची ती सुबक माडणी, त्यात हारीने लागलेल्या लाकडी ओंडक्याच्या (Log cabins) झोपड्या, त्याच्या भोवतालची छोटी उपवनें, त्यात बागडणारी गोरी बाळे, पलीकडची ती नव्यानेच कसलेली शेतें, त्याच्या भोवतालची हिरवीगार गखीव कुरणें, त्यात चरणारी गुरेढोरे व सगळीकडे आपआपल्या व्यवसायात व्यग्र असलेलीं गौरकाय स्त्रीपुरुषें पाहून त्यास काय वाटेल बरें? त्याच्या मनात कोणते विचार येतील? त्यास अगदीच अपरिचित असलेला–नव्या सुधारणेचा–तो देखावा पाहून त्यास कौतुक वाटेल? त्याची दृष्टि आश्चर्याने चकित होईल? त्याच्या मनाचें रंजन होईल? गौरकायांच्या या जीवनापुढे आपली रानटी राहाणी किती रद्द आहे, अशी खंत तरी त्यास वाटेल? नाही! नाही! नाही! उलट त्याचा अंतरात्मा तळमळू लागेल. आतून उसळलेला क्रोधाचा कढ ओठावरच्या ओंठावर दातांनी दाबून धरून तो स्वगत म्हणेल, "अरेरे! हे मी काय पाहतो? या इंद्रजालात माझ्या अस्तित्वाची वाट काय होणार? – आता या ठिकाणीं माझें असे काय आहे? ही जमीन, हे जंगल, या टेकड्या, हे नदीनाले आता माझे नव्हेत ना! जेथे माझे पूर्वज नांदले, जेथे मी पारधीकरिता भटकलों, जेथे मी आपलें खोपट उभा रलें व थोडी शेतीभाती केली, जेथे मी मेंढरें पाळली व मजेचीं गाणीं गात त्यांची लोकर कातरली, जेथे मी आगटी पेटवून मित्रमंडळीचा मेळा जमविला व थंडीने कडकडणाऱ्या रात्री गप्पागोष्टींत घालविल्या, जेथे आम्ही आपसांत गमतीची मल्लयुद्धे खेळलों किंवा युद्धास निघण्यापूर्वीचे बेहोष नाच केले, तें हें माझें लाडकें स्थान, ती आमची वडिलो-

पार्जित वतनवाडी, आज कोणाची आहे ?–आता यापुढे या सर्वांचा स्वामी कोण ?–माझी पारध करूं इच्छिणारा तो गोरा !–आणि मी काय करावयाचें ?–असेंच लपत छपत हिंडावयाचें न् स्वतःचा जीव वाचतो का पहावयाचें !–या धावपळींत जीवरक्षण झालें तर ठीक नाहीतर क्षुधा किंवा बंदुकीची गोळी याना बळी पडावयाचें ! यांत माझ्या समोर माझी बायको, मुलेंबाळें, आप्तइष्ट, किंवा जातभाई मृत झालेले मला पाहावे लागतील किंवा त्यांच्यासमोर मला मृत व्हावें लागेल !–मग ही बिटंबना अनुभवीत बसण्यापेक्षा एकदाच काय सोक्षमोक्ष होईल तो पाहाणें बरे नाही का ?"–इत्यादि विचारानी तो द्वेष, त्वेष व क्रोध यांहींकरून आंधळा होत असल्यास त्यांत कांही नवल आहे का ?

इंडियन सुधारलेला नव्हता, त्याचे विचार प्रगल्भ झाले नव्हते व त्याचा मेंदूही अगदी छोटा होता. पण असें असतांही आपले वतन घालवून बसतांना त्यास वरीलप्रमाणें कढ येऊन मरणप्राय दुःख होणे अगदी स्वाभाविक होते. मग त्या उद्वेगांत त्यास स्वतःच्या बलाबलाचा विचार राहिला नांही. गोऱ्या लोकांवर तो तुटून पडला व त्याने आपल्या हाताने आपल्या मृत्यूस जवळ ओढिलें !

गौरकायांचे संबंधांत रानटी इंडियनाची ही कृतिवृत्ति जशी मनुष्यस्वभावाला धरून होती, तशीच त्याच्या बाबतींत गौरकायांनी जें वर्तन केलें, तेंही मनुष्यस्वभावाला फारसें सोडून नव्हतें, असें म्हणणें भाग आहे. अमेरिकेंत गोरे लोक वसाहत करण्याकरितां म्हणूनच आले. त्यांनी तें आपलें कायमचे वतन बनविल्यानंतर आपल्या सुखसोयी बघणे त्यांना भागच होतें. त्यांचा समाज व त्याचे वंशवेल यांना स्वच्छंदाने विस्तरण्यास त्याना मिळेल तेवढें स्थान हवेंच होतें. अर्थात् इंडियन लोकांचा उपसर्ग ते कसा सहन करणार ? शेतांतील पीक चांगलें यावे अशी इच्छा असल्यास त्यांत तण माजूं देतां कामा नये. त्याचीं पाळेंमुळेंच खणावीं लागतात. तोच न्याय येथे लागू झाला.

आता निःपक्षपाताने सांगावयाचें झाल्यास हें मान्य केलें पाहिजे की स्पॅनिअर्ड लोकांनी इंडियन लोकांशीं जितकें व ज्याप्रकारचें अमानुष व अत्यंत निर्घृण वर्तन केलें, तितकें किंवा त्या धर्तीचें वर्तन इंग्लिश वसाहतवाल्यांनी पहिल्यांदा तरी त्या लोकांशीं मुळींच केलें नाही.

पहिले पहिले व्यवहार त्या दोन जातींत सामोपचाराचेच घडले. त्या वेळचा इंग्लिश लोकांचा व्यवहार धूर्ततेचा असेल, पण वर्तन माणसाचें होतें हें निःसंशय. त्याचप्रमाणें त्यांनी त्या लोकांचें वन्य जीवन सुधारण्याचा–स्वार्थाने म्हणा किंवा शुद्ध बुद्धीने म्हणा–पुष्कळ प्रयत्न केला. परोपकारी व दयाळू अंतःकरणाच्या मिशनरी लोकांनी त्यांच्यामध्यें मिसळून त्याची भाषा शिकणें, त्याच्या चालीरीति समजून घेणें, त्याना ख्रिस्ती धर्माचा उपदेश करणें, त्याना शिक्षण देणे, इत्यादि गोष्टी परिश्रम घेऊन केल्या. पण त्याचा परिणाम विशेष दिसून आला नाही. काही इंडियन इंग्रजी शिकले व एक तर हारवर्ड विश्वविद्यालयाचा पदवीधरही झाला. परंतु सर्वसामान्य इंडियन फारसा जवळ येऊं शकला नाही. त्याचा धर्म, त्याची सस्कृति व त्याचें वन्यजविनच त्यास पसंत होतें व तें सारें कायम टिकावें म्हणून त्याची धडपड होती.

अशा प्रकारें त्या दोन अगदी भिन्न जातींचे हितसंबंध परस्पर प्रतिकूल असल्यामुळें त्यांच्यामध्यें दृढतर स्नेहबंध कधीच निर्माण झाला नाही आणि परस्परांचा उपसर्ग मात्र परस्परांस जाचक होत गेला. घनदाट अरण्याच्या आश्रयाने इंडियन व बंदुकीच्या बलाने युरोपियन एकमेकांस घातक होत चालले. उघड्या रणांगणावर दोघांची गांठ कधीच पडली नाही. इंडियन लोकानी हिंस्र पशूप्रमाणें दबा धरून युरोपियनावर चोरटे हल्ले चढविले. उलटपक्षी युरोपियनाने त्या रानटी लोकांची वन्य पशूप्रमाणें पारध आरंभली.

उभयपक्षीं असे अनर्थ किती काल तरी चालू राहिले. त्यांत नुकसान दोघाचेंही झालें; पण नेहमी यशाचा वाटा युरोपियनाकडे व नाशाचा वाटा इंडियनाकडे असा प्रकार होऊन पहिल्यापुढे दुसरा हरत गेला. घरभेदेपणा व मद्यासक्ति यामुळेंही इंडियन लोकांचें अत्यंत नुकसान झालें.

अमेरिकन लोकांच्या वसाहतींच्या इतिहासामध्यें इंडियन व युरोपियन यांचे जे झगडे झाले, त्यांत लढाई या नांवाखाली येणारे दोन प्रसंग घडले. पहिला प्रसंग म्हणजे पिकॉट जातीशीं झालेलें युद्ध होय. इ. स. १६३७ सालीं हा समरप्रसंग घडला. गेल्या प्रकरणांत वर्णन केलेली कनेक्टिकट ही वसाहत अवध्या तीन गांवांची असल्यामुळें तिच्या भोवतालच्या या पिकॉट लोकांनी चोरट्या हल्ल्यांचा अगदी कहर मांडला.

एकट्या दुकट्या गोरकायाचें जीवित मोठें धोक्यांत आलें. तेव्हा त्या तीन गांवच्या लोकांनी एकत्र होऊन कॅपटन जॉन मेसन नांवाच्या एका शूर अधिकाऱ्यास थोडेसें सैन्य देऊन या मोहिमेवर पाठविलें. या सैन्याने लढाई करण्याची तसदी न घेतां इंडियन लोकांचीं खेडीं शोधून काढून त्यास आगी लावून दिल्या आणि नंतर त्यांच्या भोवतालीं वेढा देऊन त्यांतून बाहेर पडणाऱ्या लोकाची यथेच्छ शिकार केली! या सत्रांत बायकामुलांसह हजारो इंडियन दहन झाले! पुढे पिक्कॉट जातीच्या लोकांना, ढेकूण हुडकून काढतात, त्याप्रमाणें काढून त्याचा नाश केला! अल्पकालांत ती सबंध जात नामशेष झाली!

यानंतर इंडियन लोकाचा दुसरा मेघ इ. स. १६७५ सालीं ऱ्होड आयलंडच्या वसाहतींत झाला. 'वापानोग' नावाच्या एका कडव्या जातीचा फिलिप नावाचा एक मोठा धूर्त नायक होता. गोऱ्या लोकांचा हा मनापासून द्वेष करी. आपण सारे लोक एक झाल्यास या लोकांचें उच्चाटण आपण करूं शकूं अशी त्यास मोठी आशा होती. म्हणून त्याने गुप्तरूपाने एका मोठ्या युद्धाची तयारी केली. त्याने आपल्या भिन्नभिन्न जातींचा एक मोठा संघ तयार केला. फ्रेंच, डच आदि लोकाकडून हत्यारें व दारूगोळा जमविला. आणि युद्धास प्रारंभ केला. फिलिपने ही लढाई दोन वर्षे चालविली व वरच्या बाजूच्या साऱ्या वसाहतींना सतावून सोडलें! दोही पक्षी प्राणहानि, जाळपोळ व लुटालूट भयंकर प्रमाणांत झाली! परंतु शेवटीं घरभेदेपणानेच फिलिपचा पराभव झाला. त्याची बायको व मुलगा कैद झाला व तो स्वत: एका इंडियनाच्याच गोळीला बळी पडला! पण एवढ्याने गोऱ्या लोकांचें समाधान झालें नाही. त्यानी त्याच्या प्रेताचे हातपाय व मुंडकें तोडले! नंतर मुंडकें प्लायमाऊथ येथे व हातपाय बोस्टन येथे पाठविण्यात आले. त्या त्या गांवाच्या वेशीवर हीं विजयचिन्हें एका मोठ्या शेकाट्याला टांगण्यांत आलीं. तेथे तीं वीस वर्षे लटकत राहिलीं होतीं असें म्हणतात.

राजा फिलिपच्या पराभवानंतर बहुतेक साऱ्या इंडियन जातीचा धीर सुटला. चोरून मारून त्यांचे हल्ले होत राहिले; पण कालाबरोबर त्यांचें प्रमाण घटत गेलें. संघशक्तीने लढाई देण्याचा उपक्रम त्याच्याकडून पुन्हा केव्हाही झाला नाही. युरोपियनानी मात्र त्यांची पारध बंद

ठेविली नाही. उरल्या सुरल्यांना खिस्ती करण्याचा मिशनरी लोकांचा प्रयत्न चालूच होता. बहुतेक साऱ्या वसाहतींतून इंडियन लोकांविषयीं एकच प्रकार सुरू होता. या नियमास एकच वसाहत अपवादात्मक होती. ती पेनसिलव्हानिया होय. तिचा व तिच्या जोडीने वसलेल्या आणखी दोन वसाहतींचा त्रोटक वृत्तांत पुढील प्रकरणात देण्याचा मानस आहे.

---

## प्रकरण बारावें

# दोन नव्या वसाहती

इ. स. १६३८ सालीं रॉजर विल्यम्सने स्थापन केलेली 'ऱ्होड आयलंड' वसाहत दृढस्वरूप पावून वाढीला लागली. यानंतर अमेरिकेच्या भूमीवर नवीन वसाहती होण्याचें कार्य सुमारे पाव शतक अगदी बंद पडलें म्हणण्यास हरकत नाही. असा खंड पडण्याचीं अवांतर कांही कारणें असतीलच. परंतु प्रमुख कारण म्हणजे इंग्लंडमधील राजकीय घडामोडी होत. त्यावेळचा इंग्लंडचा राजा पहिला चार्लस याचें व पार्लमेंटचें कधीच न पटल्यामुळें, शेवटीं त्यास प्राणास मुकावें लागलें. आणि त्याच्या पश्चात् त्याचा पुत्र किंवा इतर कोणी राजकुलोत्पन्न गादीवर न बसतां पुढे कांही काल इंग्लंडमध्यें लोकसत्ताच प्रस्थापित झाली. ही योजना आयर्लंड व स्कॉटलंड याना मान्य न झाल्यामुळें त्यांनी वध केल्या गेलेल्या चार्लसचा पुत्र दुसरा चार्लस यास गादीवर बसविण्याचा खटाटोप आरंभिला. पण तो तात्काल यशस्वी झाला नाही. कारण, या वेळीं राज्यकारभाराचीं सारीं सूत्रें प्युरिटनपंथाचा कट्टा अनुयायी ऑलिव्हर क्रॉमवेल याच्या हातीं गेलीं होतीं. त्याने इतर कोणाची मात्रा चालूं दिली नाही. पुढे इ.स. १६५३ सालीं पार्लमेंटच्या संमतीने क्रॉमवेलने 'लॉर्ड प्रोटेक्टर ऑफ इंग्लंड' असा किताब धारण करून पांच वर्षे राज्यकारभार चालविला. त्याची ही छोटी कारकीर्द मोठ्या धामधुमीची झाली व त्यास अनेक युद्धें करावीं लागली. पण असें असलें तरी क्रॉमवेलने आपल्या

कर्तबगारीने इंग्लंडचें वैभव व दरारा पुष्कळच वाढविला, यांत शंका नाही. अमेरिकन वसाहतींच्या बाबतींत क्रॉमवेलने विशेष लक्ष घातलें नसलें तरी त्याने एक गोष्ट फारच महत्त्वाची केली. ती म्हणजे 'नॅव्हिगेशन लॉ' नावाचा कायदा होय. या कायद्याने इंग्लंडच्या व्यापारी लोकांचा लाभ झाला असला तरी वसाहतींच्या स्वातंत्र्यास पुष्कळच बाध आला व त्याचा परिणाम पुढे मोठा वाईट झाला. तो कोणता हे पुढे कळेल.

क्रॉमवेल वारल्यानंतर त्याच्या पुत्राकडे राज्यसूत्रें आलीं. परंतु त्याच्या अंगी पित्याचे गुण नसल्यामुळें, त्यास मागे पडावें लागलें. शिवाय प्युरिटनपंथीय लोकांच्या कारभारामुळे इंग्लंडच्या राज्यवैभवांत रुक्ष फकिरीपणा शिरला होता. तो सर्वसामान्य जनतेला व मंत्रिमंडळाला रुचेनासा झाला होता. म्हणून सर्वानुमतें पुन्हा राजसत्तेचे उद्घाटन करण्याचें ठरलें आणि इ. स. १६६० साली दुसऱ्या चार्लसला सिंहासनावर बसविण्यात आले. इंग्लंडचा हा नवा राजाही आपल्या पित्याइतकाच अनियंत्रित राजसत्तेचा भोक्ता, विलासी व कर्तृत्वशून्य होता. याच्या राजवटींत इंग्लिश जनतेचें लक्ष पुन्हा अमेरिकेकडे वेधलें नव्या वसाहती होण्याचें घाटूं लागलें.

इंग्लंडच्या सरदारसभेंत त्या काली लॉर्ड क्लॅरंडन नावाचा एक प्रतिष्ठित मुत्सद्दी होता. त्याने हे कार्य हातीं घेतलें. आपल्या पांच सात धनाढ्य मित्रांची एक समिति त्याने स्थापिली व तिच्या करवीं एक मोठी नवी वसाहत अस्तित्वांत आणण्याचें निश्चित झालें. याकरितां व्हर्जिनिया संस्थानच्या खालचा मोठा प्रदेश संशोधण्यांत आला. राजा दुसरा चार्लस व लॉर्ड क्लॅरंडन याचा स्नेह असल्यामुळें या नव्या प्रांताची सनद मिळण्यास फारशी अडचण पडली नाही. इ. स. १६६३ सालीं या नव्या भूमीला 'कॅरोलिना' असें नांव देऊन तेथे वसाहतीस प्रारंभ करण्यांत आला. प्रथमतः व्हार्जीनिया प्रांतांतील कांही शेतकरी कुटुंबेंच बोलावण्यांत आलीं. थोरामोठ्यांनी हें कार्य हातीं धरल्यामुळेंच की काय कोणजाणे, पांचसात वर्षें तरी कॅरोलिनाच्या वसाहतीचें कार्य अगदी रेंगाळत चाललें होतें! पुढे इ. स. १६७० त इंग्लंडमधूनच पुष्कळ कुटुंबें पाठविण्यांत आलीं व त्या नंतर हें नवें रोपडे झपाट्याने वाढूं लागलें. या वसाहतीकडे सर्व प्रकारच्या लोकांचें लक्ष जावें

ह्मणून तेथे धार्मिक स्वातंत्र्याची सवलत मात्र मुळापासून ठेवण्यांत आली होती. व्यक्तिमात्राने आपआपल्या रुचीनुरूप धर्म आचरावा असें स्वातंत्र्य ठेवल्यामुळें कॅरोलिना प्रांतास एक फार मोठा लाभ झाला. तो ह्मणजे फ्रान्स देशांतील ह्यूजेनॉट उर्फ प्रोटेस्टंट लोकांचें आगमन होय. त्या कालीं फ्रान्समध्यें कॅथॉलिक पंथाचें प्रस्थ दांडगें होतें. तेथील राजा, सरदार व बहुतेक प्रजा याच पंथाची असल्यामुळें इतर पथांचा सारखा दुस्वास सुरू होता. यामुळे तेथील ह्यूजेनॉट लोक अगदी त्रस्त होऊन गेले होते. वास्तविक नागरिक या नात्याने हे लोक मोठे शूर, प्रामाणिक, उद्योगी व कर्तव्यतत्पर असे होते. परंतु धर्मवेडामुळें खुद्द स्वदेशांत त्यांची रया कोणीच ठेवीना. त्यांना कॅरोलिना वसाहतीतील धर्मस्वातंत्र्याची वार्ता कळताच, त्यांच्या झुंडी तिकडे लोटल्या व त्यामुळें या नव्या वसाहतीस स्थैर्य येत चाललें.

वसाहत वाढूं लागतांच तिच्या राज्यकारभाराचा प्रश्न उपस्थित झाला. तेव्हा क्लारेंडन, लॉक, शॅफ्टसबरी इत्यादि शहाण्या लोकानी एक फार चांगली योजना तयार केली! हिचा त्या लोकाना एवढा अभिमान होता की प्रारभींच त्यानी तिचें नामकरण *Grand Model* ‘भव्य नमुना’ असें मोठें झोकदार केलें. राज्यकारभाराची यापेक्षा सर्वांगसुंदर योजना करणें मानवी बुद्धीच्या आटोक्यांत नाही, असा त्यांना पुरा विश्वास होता. हा भव्य नमुना कागदावर उठवितांना त्यांनी कोण-कोणत्या गोष्टीकडे म्हणून लक्ष दिलें नव्हतें! बायकानी आपले झगे कसे शिवावे व पुरुषानी तंबाकू ओढण्यापूर्वी चिलीम कशी पेटवावी, असल्या महत्त्वाच्या गोष्टींकडे लक्ष पुरवून लोककल्याणाच्या अनेक चिजा त्यांनी त्या भव्य नमुन्यांत कोंबल्या होत्या! आणि त्याविषयींचे अनेक छोटे मोठे कायदे बनविले होते! हेतु इतकाच की, कॅरोलिना प्रांतांत वसाहती-करितां आलेल्या व येणाऱ्या लोकांनी तदनुरूप चालून आपलें कल्याण साधावें. परंतु वसाहतवाले असे मूढ की, त्याना त्या भव्य नमुन्याची भव्यता व आद्वितीयता अनुमानतांच आली नाही. कारण, त्यांना प्रिय व इष्ट असलेलें राजकीय स्वातंत्र्य व प्रातिनिधिक सत्ता यांचाच नेमका त्या योजनेंत पूर्ण अभाव होता! अलंकृत प्रेताला कोण वानील? तद्वत् ज्या योजनेंत स्वातंत्र्य नाही, ती कोणत्या स्वाभिमानी व समंजस

प्रजेला रुचेल ! कॅरोलिनाच्या प्रजेने या भव्य नमुन्याचा प्रथमपासून शेवटपर्यंत धिक्कार केला व शेवटी ती तिच्या योजकांना सोडून द्यावी लागली ! यानंतर व्हर्जीनियाप्रमाणें तेथील व्यवस्था आखण्यांत आली.

इ. स. १६८० साली चार्लसटन नांवाचें एक मोठे नगर राजधानीकरितां म्हणून वसवण्यांत आलें. ही वसाहत पहिल्यांदा अगदी सामान्य भासली, पण पुढे जेव्हा तिच्या भूमींत तादूळ व तीळ यांचीं पिकें अति उत्कृष्ट निघतील असें आढळून आलें, तेव्हा तिचा उत्कर्ष फार झपाट्याने होऊं लागला. पुढच्या पाव शतकांत कॅरोलिनाचें स्वरूप इतकें काही प्रशस्त झालें की, राज्यव्यवस्थेकरितां तिचे दोन भाग पाडावे लागले. अस्तु.

याच वसाहतीच्या बरोबर अस्तित्वांत आलेली दुसरी मोठी वसाहत म्हणजे पेनसिल्व्हानियाची होय. हिचाही इतिहास बराच मनोरंजक व उद्बोधक असल्यामुळें थोडक्यांत त्याचा परामर्ष घेणें इष्ट आहे.

'पेनसिल्व्हानिया' या वसाहतीचा जनक विल्यम पेन. इ. स. १६३४ सालीं इंग्लंडमधील एका थोर व धनाढ्य कुलात याचा जन्म झाला. याचा पिता ब्रिटिश आरमारी खात्यांत सेनापतीच्या अधिकारावर असून मोठा शूरवीर व लोकप्रसिद्ध पुरुष होता. अनेक आरमारी युद्धांत याने मोठमोठे विजय मिळवून श्री व कीर्ति संपादन केली होती. अशा कीर्तिमान व संपत्तिमान पुरुषाचा विल्यम पेन हा एकुलता एक पुत्र असल्यामुळें त्याचें सारें आयुष्य सुखांत व विलासोपभोगात व्यतीत होण्यास काहीच प्रत्यवाय नव्हता. परंतु असलें ठरीव ठश्याचें श्रीमंती आयुष्य घालविण्याकरिता विल्यम पेनचें जीवन खर्ची पडणार नव्हतें. त्याची प्रकृति भिन्न होती. प्रत्येक समाजात व देशांत मधून मधून कांही थोर विभूति निर्माण होत असतात. परोपकार व दीनजनोद्धार हेंच त्यांचें जीवनध्येय असते. आपलें सर्वस्व कृष्णार्पण करून त्यागशीलतेने जनसेवा करणें, यांतच त्याचा आनंद साठविलेला असतो. अशा सन्मणिमालेंत शोभण्यायोग्य विल्यम पेन असल्यामुळें त्याने आपल्या आयुष्याचा सदुपयोग केला व आपली गर्भश्रीमंती आपल्या देश-धर्म-बाधवांच्या हितार्थ खर्चून टाकली !

बालपण व त्यास अनुसरून मिळणारें प्राथमिक शिक्षण आटो-पल्यानंतर विल्यम पेन यास उच्च-शिक्षण-संपादनार्थ ऑक्सफर्ड विश्व-विद्यालयांत पाठविण्यांत आलें. लहानपणापासूनच त्याची वृत्ति धर्मप्रवण असल्यामुळें धार्मिक ग्रंथ आस्थेने वाचून त्याचेवर मनन करण्याची आता त्यास आवड उत्पन्न झाली. सत्यधर्म कोणता? मनुष्याचें खरें कर्तव्य काय? तें त्याने कसें पार पाडलें पाहिजे? इत्यादि प्रश्नांचें उत्तर समर्पक मिळावें म्हणून त्याने ख्रिस्ती धर्माचा मनापासून अभ्यास केला. तेव्हा त्यास इंग्लंडमध्यें नुकताच उदयमान होत असलेला मित्रसंघाचा पंथ अथवा 'क्केकर' पंथ बुद्धिग्राह्य व अनुकरणीय वाटूं लागला. पण हा पथ राजमान्य किंवा लोकमान्य नव्हता. उलट तो पाखंडी व तिरस्कृत मानला जात होता. पण विल्यम पेनने त्याची पर्वा केली नाही. त्याने तात्काळ क्केकर पंथाची दीक्षा घेतली. या वेळीं त्याचे वय बावीस एक वर्षांचें होतें.

विल्यम पेनच्या या धर्मांतराने समाजांत मोठीच खळबळ उडाली. एका थोर कुटुंबांतल्या तरुणाने असा भलताच मार्ग पत्करावा, हें कोणालाच रुचलें नाही. त्याच्या पित्यालाही त्या गोष्टीचा भारी राग आला व त्याने विल्यम एकुलता एक मुलगा असताही त्यास गृहबहिष्कृत केलें. असली काही आपत्ति उद्भवेल याची विल्यमला जाणीव असल्यामुळें, त्याने तीबद्दल काडीइतकाही विषाद बाळगला नाही. तो उघडपणें स्वतःस 'क्केकर' म्हणवूं लागला आणि त्या पंथाच्या प्रसारार्थ झटूं लागला. तेव्हा त्याच्या पित्याने राजाला सांगून विल्यमला तुरुंगांत टाकून पाहिलें. एवढ्या कडक शिक्षेने त्याचें भडकलेले डोकें ताळयावर येईल अशी त्याच्या पित्याची व इतर आप्तेष्टांची समजूत होती. परंतु ती सपशेल चुकली. कारावासाचा एकांत विल्यमच्या मुमुक्षु मनाला उप-कारकच झाला. चिंतनाने त्यास क्केकरपंथ अधिकच प्रिय झाला.

तसें पाहिलें तर विल्यमपेनने स्वीकारलेल्या या नव्या पंथात आक्षेपार्ह किंवा निंद्य असें खरोखरच कांही नव्हतें. रोमन कॅथॉलिक, प्रॉटेस्टंट, प्युरिटन्स इत्यादि भेदांप्रमाणें क्केकर हाही ख्रिस्ती धर्माचा एक पोटभेद आहे. त्याचें मुख्य दैवत येशू ख्रिस्त व प्रमाण धर्मग्रंथ बायबलच. भिन्नत्व आहे तें चिकित्सेंत व तत्त्वप्रतिपादनांत. त्या काळीं

धर्मचर्चा करितांना इंग्लंडमध्यें प्रस्थापित झालेलें धर्मपीठ आपल्या अनुयायांना म्हणे, "बापहो तुम्हांला ऐहिक सौख्य व पारलौकिक कल्याण हवें ना? मग तुम्ही चर्चमध्यें वेळचेवेळीं येत जा. त्याच्यावर श्रद्धा ठेवा, त्यास पूज्य माना व बिशप सागतील तो आचार पाळा. चर्च व बिशप हीं तुमचीं दैवतें."

चर्च व बिशप याच्या फाजील वर्चस्वाला कंटाळून फुटून निघालेले प्युरिटन ह्मणत, "छे! हा खरा धर्म नव्हे. आम्ही सागतों तोच खरा धर्म आणि तो बायबलात वर्णिलेला आहे. म्हणून लोकहो, बायबल वाचणें, त्याच्यावर श्रद्धा ठेवणें, त्यास पूज्य मानणें आणि त्याचाच अभिमान बाळगणें हा खरा धर्म." म्हणजे एकाच्या मतें चर्च श्रेष्ठ तर एकाच्या मतें बायबल श्रेष्ठ.

क्केकरपंथाचा संस्थापक जॉन फॉक्स याने या दोन्ही मार्गांना त्याज्य ठरविलें होतें. त्याने प्रतिपादन केलें:—"धर्माचें खरें स्वरूप पाहावयाचें असेल तर तें आपल्या अंतःकरणात दिसेल. तें आधी शुद्ध व पवित्र पाहिजे. आपल्या सदसद्विवेकबुद्धीला जें पटेल तीच खरी धर्मनिष्ठा. येशू खिस्ताने जसें आचरण केलें, जो उपदेश केला आणि ज्या आज्ञा देऊन ठेविल्या त्या अक्षरशः पाळणें हाच खरा धर्माचार. इतर बाह्याबडम्बरात काहीच अर्थ नाही."

क्केकरपंथाचें हें मतप्रतिपादन वर वर पाहिलें तर त्यात अयोग्य असें काय आहे बरें? — परंतु गतानुगतिक व रूढिप्रिय धर्माधिकारी व अंधश्रद्धेने त्याना अनुसरणारा समाज या दोघानाही वरील विचारांचा झटका बसला. चर्च व बायबल याच्या मुळावर घाव घालण्याकरिताच क्केकरपंथाची स्थापना आहे असें त्याच्या मनाने घेतलें व ह्मणून त्यांनी त्याच्या नाशार्थ जोराचे प्रयत्न तात्काळ अवलंबिले!

केवळ धार्मिक विषयांतच क्केकरपंथ भिन्न असता तर त्याचा बाऊ लोकांना इतकासा वाटला नसता. पण राजकीय व सामाजिक बाबतींतही त्याचीं मतें भिन्न व मोठी क्रांतिकारक होतीं.

क्केकरपंथ म्हणे, "ज्या अर्थी परमेश्वराने सारीं माणसें निर्माण केलीं आहेत, त्या अर्थी त्याच्यामध्यें श्रेष्ठ-कनिष्ठपणा मानणें चूक आहे. अमूक लॉर्ड, अमूक बिशप, अमूक सामान्य, हे भेद मनुष्यकृत

आहेत. ते पाळणें हा गुन्हा आहे. याकरितां पदव्या देणें घेणें व त्यांचा मानमरातब ठेवणें गैर. अमूक व्यक्ति श्रेष्ठ म्हणून त्याच्यापुढे टोपीं काढणें ( पूज्यभाव दर्शविणें, नमन करणें ) गैर. राजाला सुद्धा नमन करणें गैर."

या प्रतिपादनानें, क्केकर लोकांना कोणतीही सत्ता किंवा अधिकार नको आहेत, ते निरर्गल वर्तू पाहत आहेत असा सामान्य लोकाचा समज झाला. त्याचप्रमाणें क्केकरांनी तीन प्रचलित गोष्टी करण्याचें साफ नाकारलें.—१ शपथविधि करून साक्ष देणें किंवा राजनिष्ठा दर्शविणें; २ सार्वजनिक धर्ममंदिरें व तेथील धार्मिक उत्सव चालविण्यास कर देणें आणि ३ कोणत्याही रूपानें दुसऱ्याचा नाश करण्याकरिता शस्त्रग्रहण करणें, शिपाईपेशा पत्करणें किंवा युद्धास साह्य करणें.

अर्थात् त्यांच्या या साऱ्याच कल्पना कितीही सयुक्तिक व बायबलला किंवा येशू ख्रिस्ताच्या शिकवणीला धरून असल्या तरी प्रचलित समजुतींच्या विरुद्ध असल्यामुळें क्केकरपंथ हा एक भयंकर पाखंडी मार्ग असून तो राज्यव्यवस्थेला, धर्माला व समाजाला धोका देणारा आहे असेंच सर्वांना वाटलें व त्याचा जिकडे तिकडे तिरस्कार होऊं लागला ! इंग्लंड व युरोप या दोन्ही स्थानीं त्याचा प्रसार वाढत चालला व छळही होऊं लागला. पण त्या पंथानुयायांचा जों जो छळ होऊं लागला तों तों त्या लोकांना स्फुरण चढलें. त्यांनी अनेक प्रकारें आपल्या मतांचा प्रसार चालविला.

क्केकर लोकांचा इतरांवर किंवा इतरांचा त्या लोकांवर मोठा कटाक्ष असला तरी त्यांचें व प्युरिटन लोकांचें विशेष बिनसूं लागलें. कारण उघड होतें. स्वतः प्युरिटनांनी ख्रिस्ती धर्माचें शुद्धीकरण करण्याकरितांच आपला पंथ स्थापन केला होता. अर्थात् धर्मशुद्धीची आपण परिसीमा गाठली आहे, अशी त्यांची समजूत होती. परंतु क्केकरपंथानें त्याच्याही पुढे आघाडी मारून खऱ्या धर्मतत्त्वालाच हात घातला होता. यामुळें हा पंथ आपल्या मुळावर आला आहे, असें प्युरिटनांना वाटूं लागलें व त्याच्या पाडावाकरिता त्यांनी इतरांपेक्षा विशेष जोर धरला. यामुळें जेथे जेथे प्युरिटन तेथे तेथे क्केकर लोक जाऊन आपल्या मतांचा प्रसार करूं लागले. दोनही पक्षांत चुरस वाढत चालली.

ती विशेष वाढण्याचें आणखी एक कारण घडलें. क्केकरांनी बायबलांतील दशाज्ञा व अहिंसाव्रत अक्षरशः पाळण्याचें ठरविलें होतें. त्यामुळें त्यांना कितीही क्लेश दिले किंवा त्यांचा छळ केला तरी त्याचा ते यत्किंचितही प्रतिकार करीत नसत. येशूप्रमाणें आत्मक्लेश सोसण्यांतच खरा पुरुषार्थ आहे व त्यामुळें चित्तशुद्धीस साह्य होतें, असा त्यांचा विश्वास होता. आणि ज्याअर्थी असा आपला छळ होतो आहे, त्याअर्थी ईश्वराचे एक अत्यंत प्रिय कार्य करण्यासच त्याने या भूतलावर आपणास धाडिलें आहे असें त्यांस वाटत होतें. त्यांनी कोठे कोठे प्रतिकार केला पण तो सत्याग्रह स्वरूपाचा. अंगावर चिंध्या धारण करून कित्येक क्केकर हिंडत आणि म्हणत, " पहा या प्युरिटनांनी धर्माच्या कशा चिंध्या केल्या आहेत. हे स्वतःस ख्रिस्तानुयायी म्हणवतात; पण त्यांचें आमच्या पंथाविषयींचें वर्तन पहा." कित्येक स्वतःच्या तोंडाला काळें फाशीत आणि रस्त्यातून आक्रोश करीत जात, " धर्माचें तोंड काळें झालें! शांतिसागर ख्रिस्ताचा उपदेश पहा व त्याच्या अनुयायांचें परस्परांशीं व आमच्याशीं घडणारें वर्तन पारखून घ्या. "

क्केकर लोकांच्या या चमत्कारिक वर्तनामुळें त्यांचा होणारा छळ कमी झाला नाहीच. पण त्यांचा बुद्धिवाद व सहिष्णुता पाहून त्याचा प्रतिपक्षी वर्ग लाजूं लागला यांत शंका नाही. असो.

कालानुरूप क्केकरपंथाचे अनुयायी युरोपांत पसरले व त्यांची दृष्टि अमेरिकेकडेही वेधली. त्या भूमीवर मासाच्युसेट्स ही खास प्युरिटन लोकांची वसाहत होती. तेव्हा तेथे जाऊन आपला शह द्यावा असें त्यांच्या मनाने घेतलें. ही वार्ता त्या वसाहतीला कळतांच तेथील लोकांचें धाबें दणाणलें! त्यांना असें कळलें की त्या पंथाच्या दोन स्त्रिया उपदेशिका म्हणून मासाच्युसेट्सला येत आहेत ( इ. स. १६५६ ). त्याबरोबर तेथील सारा समाज कावरा बावरा झाला. आता आपली धडगत नाही, आता प्रलयकालच होणार, अशी धास्ती सर्वांना पडली. मग त्यांनी या महत्संकटाच्या निवारणार्थ एक दिवस कडकडीत उपोषण केलें! यच्चयावत् माणसांनी हा राष्ट्रीय उपास केला व तो सबंध दिवस प्रार्थनेंत घालविला. पण ही राष्ट्रीय पुण्याई फळास आली नाही. येणाऱ्या क्केकरपंथीय बाया आल्याच. त्यांना तुरुंगांत टाकण्यांत आलें.

व इतरांविषयीं कडक कायदे केले. परंतु या बंधनाचाही फारसा उपयोग झाला नाही. निंदा, उपवास, कारागृहवास, फटके मारणें, फाशी देणें व जिवंत जाळणें इत्यादि सर्व शिक्षा अंमलांत आणिल्या गेल्या. परंतु क्वेकरपंथाचा लागलेला भुंगा हटण्याचें चिह्न दिसेना. शेवटीं हा झगडा इतक्या विकोपाला गेला की, राजा चार्लसला त्यात लक्ष घालणें भाग पडलें. मासाच्यूसेटस्‌मध्ये क्वेकर लोकांचा कोणीही छळ करूं नये असें त्याने फर्मान काढलें. पुढे वसाहतवाल्यांनाही आपल्या कृतीचा वीट आला. असो.

अशा धर्तीचा हा क्वेकरपंथ त्या कालच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक समजुतीप्रमाणें त्याज्य व निंद्य ठरला असतां विल्यम पेनसारख्या उच्चकुलजाने त्याचें अनुयायित्व पत्करावें ही गोष्ट त्याच्या पित्यास व आप्तेष्टांस कशी सहन होणार? म्हणून विल्यमला बंदिगृह पाहावें लागलें. ही शिक्षा त्यास किती काळ भोगावी लागली असती, कोण जाणे. पण पुढे लौकरच त्याचा पिता वारला व त्यास बंधमुक्त करण्यांत आलें.

कारावास भोगीत असतां विल्यम पेनने आपल्या भावी आयुष्याविषयीं सुंदर मनोराज्य केलें होतें. केव्हा तरी बिनशर्त सुटका होईल, असा त्यास विश्वास होता व तसें झाल्यावर काय करावयाचें हेंही त्याने ठरवून टाकलें होतें. बंदिगृहांतून बाहेर पडताच तो आपल्या पित्याच्या अवाढव्य संपत्तीचा मालक झाला. पुढे तिकडील सर्व व्यवस्था लागल्यावर त्याने आपलें प्रिय धर्मकार्य पुन्हा मोठ्या उत्साहाने हातीं घेतलें. आपल्या धर्मबांधवांचा व इतर हीनदीन जनांचा युरोपांतील देशांत अकारण छळ होतो, तेव्हा त्यांच्याकरितां त्याने एक स्वतंत्र वसाहत अमेरिकेमध्यें करण्याचे योजिलें. त्याच्या पित्याने राजा दुसरा चार्लस यास सोळा हजार पौंड कर्ज दिलेलें होतें. त्याची फेड त्या उधळ्या राजाकडून होणे कठीणच होतें. तेव्हा त्या ऋणाचे बदल्यात आपणास अमेरिकेंतील कांही भाग मिळावा, असा अर्ज विल्यमने राजाकडे केला. त्याला हें कर्ज डोईजड झालेंच होतें. तेव्हा त्याने 'हलवायाच्या घरावर तुळशीपत्र' ठेवण्यास बिलकूल अनमान केला नाही. इंग्लंडएवढ्या क्षेत्रफळाचा एक प्रदेश त्याने पेनला बहाल केला व तशी एक सनदही लिहून दिली!

पेनला दिलेला हा प्रदेश व्हर्जिनिया वसाहतीच्या उत्तरेस व न्यूयॉर्क व मेरीलंड याच्या पश्चिमेस पसरलेला आहे. याचें नांव राजानेच Pennsylvania 'पेनसिल्व्हानिया' (पेनचें अरण्य) असें ठेविलें व या स्थानी इ. स. १६८१ सालीं वसाहत करण्यास प्रारंभ झाला.

कारावासात असतां विल्यम पेनने एका सुंदर जगाची कल्पना केली होती. या जगांत कोणी कोणाचा कोणत्याही कारणास्तव द्वेष करूं नये. सर्वांनी भ्रातृभावाने वागून आपआपलें ऐहिक पारलौकिक कल्याण साधावें. अत्यत अडाणी लोकांनासुद्धा या जगात ठाव मिळावा. कायदेकानू लोकांच्या इच्छेनुरूप असावे. राज्यकारभार समंजस व उदारधी लोकानी केवळ लोककल्याण डोळ्यांपुढे ठेवून चालवावा. असें त्याचें मनोराज्य होतें. तेंच त्याने पेनसिल्व्हानिया प्रातांत अमलांत आणण्याचें ठरविलें. इ. स. १६८२ सालीं तो शेंकडो क्वेकर कुटुंबें घेऊन अमेरिकेंत आला. नंतर त्याने Philadelphia 'फिलाडेल्फिया' (भ्रातृप्रेम) नांवाच्या सुंदर नगराची स्थापना केली. साधारणपणें दोन महिने या प्राथमिक व्यवस्थेत गेल्यावर पेनने चेस्टर नामक स्थानीं आपल्या वसाहतीची पहिली लोकसभा बोलावली. या सभेत त्याने आपली एक योजना लोकांपुढे ठेविली. तीत खालील चार कलमे महत्त्वाचीं होतीं.

१. राजसत्तेने सर्व वसाहवाल्यांच्या चित्ताचें व वित्ताचें संरक्षण करावें; परंतु त्याने आपला धर्म अमूकच पद्धतीने पाळला पाहिजे किंवा अमक्या धार्मिक उत्सवाला त्याने उपस्थित असलें पाहिजे असें बंधन त्याजवर नसावें.

२. प्रत्येक कर देणाऱ्या व्यक्तीला मत देण्याचा अधिकार असावा. आणि सर्वांना कारभार चालविण्यांत गुणानुरूप संधि मिळावी. कोणताही धार्मिक पक्षभेद या निवडणुकीआड येऊं नये.

३. बारा वर्षें वयास झालेल्या प्रत्येक मुलाला शिक्षण देण्याची व एखादा उपयुक्त धंदा शिकविण्याची व्यवस्था असावी.

४ खून व देशद्रोह एवढ्या थोर अपराधाबद्दलच फाशीची शिक्षा असावी. इतर अपराधांस तारतम्याने शिक्षा व्हावी. पण तुरुंग यमाचा दरबार किंवा नरकलोक नसावा. बंदिवानांना सहृदयतेने वागवावें व त्यांची मानसिक उन्नति करण्याचा प्रयत्न दक्षतेने करण्यांत यावा.

यावरून पेनचे विचार किती उदात्त होते, हें सहज कळण्या-सारखे आहे.

पुढे पेनच्या इच्छेनुरूप व लोकांच्या पूर्ण संमतीने राज्यव्यवस्था आखण्यांत आली. पेनने तुरुंगांत केलेलें मनोराज्य प्रत्यक्षांत उतरलें!

या गोष्टी चालल्या असता पेनचें रानटी इंडियन लोकांकडेही लक्ष होतें. त्याने आपल्या प्रांतांतील ताम्रवर्णीयांना एकत्र केलें, त्यांच्याशीं प्रेमाचें वर्तन करून त्याना आप्त बनविलें आणि त्यांच्याशीं चिरकाल टिकणारें सख्य जोडलें. इतर वसाहतींमध्यें सुधारलेले गौरकाय व रानटी ताम्रवर्णीय यांच्यामध्यें सारख्या कटकटी सुरू होत्या आणि दोन्ही पक्ष एकमेकाच्या रक्ताने आपले हात रंगवीत होते. पण या अमानुष कलहापासून पेनसिल्व्हानियाची वसाहत सदैव आलिप्त राहिली. पेनने स्थापिलेल्या या प्रेममय राज्यांत कोणी कोणाशीं भांडलें नाहीं किंवा वैरभावाने कोणी कोणाचा प्राण घेतला नाही. या बाबतींत ती भूमि शेवटपर्यंत निष्कलंक राहिली!

पेन व इंडियन याचा ज्या स्थानीं संधि झाला, तेथे संगमरवरी प्रस्तराचा एक स्मारकस्तंभ आज उभा आहे. तो प्रवाश्यांना पेनचें उज्ज्वल चरित्र सागतो व प्रेम आणि विश्वास यांची देवघेव रानटी इंडियनही करूं शकतात हें दर्शवितो.

पेनने स्थापन केलेलें फिलाडेल्फिया हें नगर पुढे पुढे फार प्रसिद्धीस आले. अमेरिकेच्या स्वातंत्र्येतिहासांतील काही महत्त्वाचे प्रसंग या स्थानीं घडल्यामुळें जवळ जवळ सव्वाशें वर्षें त्यास अमेरिकेची मुख्य राजधानी होण्याचा बहुमान मिळाला होता.

आपल्या वसाहतीची सर्व व्यवस्था नीट लागल्यानंतर पेन इंग्लंडांत परत आला. त्याच्या मनोराज्याप्रमाणें त्याने स्थापन केलेली वसाहत चांगली नांवारूपास आल्याचें त्याने पाहिलें आणि नंतर इ. स. १७१८ साली पूर्ण शांति व समाधानयुक्त चित्ताने हें जग सोडिलें!

———

## प्रकरण तेरावें

# सिंहावलोकन

'पेन्नसिल्व्हानिया' अस्तित्वांत आल्यानंतर पुन्हा सुमारें पन्नास वर्षें नव्या वसाहती वसविण्याचें कार्य इंग्लंडने केलेंच नाही. घडून आलेल्या बारा वसाहतीच निरनिराळ्या अंगांनी वाढत चालल्या होत्या. पुढे कांही नवीन कारणें उपस्थित झालीं व त्यांतून आणखी एक वसाहत जन्मास आली. हिचा अल्प परिचय या स्थानीं करून घेऊं आणि नंतर आतापर्यंत झालेल्या प्रपंचाचें सिंहावलोकन करून पुढच्या मार्गाला लागूं.

इंग्लंडच्या सिंहासनावर दुसरा जॉर्ज अधिष्ठित (इ. स. १७२७) झाल्यानंतरची गोष्ट. या वेळीं पार्लमेंटमध्यें ओगलथॉर्प या नावाचा एक मोठा सज्जन गृहस्थ होता. थोर अंत:करण व निरपेक्ष स्वदेशाभिमान या या दोन गुणांमुळें तो सर्वत्र लोकप्रिय झाला असून राजकारणांतही त्याच्या मतास मोठा मान होता. नवीन वसाहत स्थापण्याचें कार्य यानेच हातीं घेतलें. यांत त्याचे दोन उद्देश प्रमुख होते. पहिला असा की, अमेरिकेंतील दक्षिण कॅरोलिना ही इंग्लिश वसाहत धोक्यांत होती; तिच्या संरक्षणाची कांही विशेष व्यवस्था लावणें भाग होतें. इतर कोणत्याही वसाहतीपेक्षा या प्रांताची साधनसंपन्नता अधिक असल्यामुळें त्याची भरभराट झपाट्याने झाली. त्याची राजधानी चार्लसटन हें तर सर्व नगरांत श्रेष्ठ व सुंदर होऊन बसलें. ही स्थिति पाहून खालच्या अंगास बसलेल्या फ्लोरिडावासी स्पॅनिअर्ड लोकांच्या तोंडास पाणी सुटलें. कांहीतरी निमित्ताने अतिक्रमण करावें व शक्य झाल्यास कॅरोलिनाचा सुपीक व सधन भाग आपल्या माडीखाली घालावा असे प्रयत्न त्याचेकडून सुरू झाले. यामुळें कॅरोलिनांतील वसाहतवाल्यांना पुष्कळच उपसर्ग पोचूं लागला. तेव्हा या उपद्व्यापाचा कांही कडक बंदोबस्त करणें इंग्लंडला अगत्याचें वाटूं लागलें. पार्लमेंटमध्यें या विषयाची चर्चा चालू असता

ओगलथॉर्पने तिकडे विशेष लक्ष दिलें. विचारांतीं त्याने स्पेनला काटशह देण्याचे निश्चित केले. फ्लोरिडा व कॅरोलिना या दोन्ही वसाहतींच्या दरम्यान मोकळ्या पडलेल्या मोठ्या भूभागावर एक नवी वसाहत निर्माण करावयाची व तेथे सैन्य व दारूगोळा ठेऊन त्रास देणाऱ्या स्पॅनिअर्ड लोकांचा चागला समाचार घ्यावयाचा असे ओगलथॉर्पने ठरविलें. त्याच्या या बेतास राजा व पार्लमेंट या दोघांकडून समति मिळाली.

या नव्या वसाहतीच्या बाबतीत ओगलथॉर्पचा दुसरा उद्देशही असाच स्वदेशोपकारक होता. त्या काळीं इग्लंडमध्ये कर्जाच्या देवघेवी-संबंधींचा कायदा विलक्षण अन्यायमूलक होता. धनकाने ऋणकोला शायलॉक पद्धतीने लुबाडावें आणि पुन्हा स्वतःच्या लहरीखातर त्या बिचाऱ्यास तुरुंगांत कोंबावें असा प्रकार सुरू होता. अशा कैद्यांना कोणी वाली नसल्यामुळें त्यांची स्थिति अत्यंत शोचनीय व अनुकम्पनीय होती. अगदी क्षुल्लक कर्जापायीं अनेक चागले लोक कारागृहात खितपत पडले होते. यापैकी कितीतरी लोक नागरिक या नात्याने उद्योगी, साहसी, कष्टसहिष्णु, बुद्धिमान व प्रामाणिक असे होते. पण अन्यायी सावकार व आंधळा कायदा या दोन लाटींच्या चरकांत त्याचा चुराडा उडत होता ! असला हा दुःखद व अपमानकारक प्रसंग एकदा ओगलथॉर्प-च्या एका प्रतिष्ठित मित्रावरच कोसळला. तेव्हा त्याचें लक्ष तिकडे वेधले. उच्च प्रतीच्या नागरिकाना ऋणको बनण्याचा व त्यापायीं त्यांचे-वर कारावासाचा प्रसंग येऊन त्याच्या सबंध आयुष्याचा नाश व्हावा, ही गोष्ट ओगलथॉर्पच्या कनवाळू अंतःकरणास अत्यंत लागली. त्याने त्या दुःस्थितीचा सांगोपांग विचार केला आणि इंग्लंडच्या इभ्रतीला कमीपणा देणारी ही वस्तुस्थिति पार्लमेंटपुढे मांडली. नंतर त्याने सुच-विलें की, अशा ऋणग्रस्त लोकांना बंधमुक्त करून अमेरिकेंत होऊं घातलेल्या नव्या वसाहतीमध्यें पाठवावें आणि त्यांच्या बुद्धीचा व गुणां-चा उपयोग देशहितवर्धनार्थ करून घ्यावा.

ओगलथॉर्पची ही विचारसरणी सर्वांना पटली. लागलीच एक मंडळ स्थापण्यांत आलें व त्याच्या तर्फे एक मोठा निधि जमविण्यांत आला. जॉर्ज राजाने कोणतेही आढेवेढे न घेतां वसाहतीस सनद करून दिली. कॅरोलिना वसाहतीच्या दक्षिणेस व स्पॅनिश फ्लोरिडा वसाहतीच्या

डोक्यावर या नव्या वस्तीचें स्थान निवडण्यांत आलें. राजा जॉर्जच्या सन्मानार्थ या देशास 'जॉर्जिया' असें नाव दिलें आणि इ. स. १७३२ साली तिकडे जाऊ इच्छिणाऱ्या ऋणमुक्त लोकाची पहिली टोळी रवाना करण्यांत आली.

'जॉर्जिया' प्रांत कोळसा व लोखंड या पदार्थांनी समृद्ध होता व तेथील भूमि कपाशीच्या लागवडीस पूर्ण अनुकूल होती. यामुळें तेथील लोकवस्तीचा पाया लौकरच बळकट झाला. मग ओगलथॉर्पने पूर्व संकल्पानुरूप फ्लोरिडावासी स्पॅनिअर्ड लोकाकडे लक्ष दिलें. युरोपात इंग्लंड व स्पेन यांच्या कटकटी सुरूच होत्या. अर्थात् त्या निमित्ताने ओगलथॉर्पला फ्लोरिडावासी स्पॅनिश लोकावर हल्ले चढविण्यास कांहींच दिक्कत वाटली नाही. त्याने एकामागून एक जोराचे धावे करून त्या लोकाना जेरीस आणिलें आणि त्याच्या त्रासदायक उपसर्गास कायमचा आळा घातला. असो.

या वसाहतीस धर्माधर्मांच्या गलबल्याचा उपसर्ग मुळापासूनच पोचला नाही. कारण या संबंधात इंग्लंडमधील वातावरण अगदी स्वच्छ निवळलें होतें. त्यामुळें जॉर्जियामध्यें तेच धर्मस्वातंत्र्य लोकाना आपो-आपच लाभले. युरोपात मात्र पूर्वापारचे धार्मिक अन्याय अद्यापीही रूढ होते. त्यास त्रासलेले लोक सर्वत्र होतेच. त्याना जॉर्जिया प्राताच्या वसाहतीचा सुगावा लागताच त्यानी आपलीं तोंडें तिकडे वळविली. फ्रान्स, ऑस्ट्रिआ, जर्मनी, स्विट्झर्लंड व पोलंड इत्यादि देशांतील चागलीं चागलीं कुटुंबे जॉर्जियामध्यें येऊन स्थाईक होऊं लागलीं आणि इग्लडनेंही पण अशा सर्व लोकाना थोर मनाने आश्रय दिला.

आता थोडें मागे वळून पाहिलें व वसाहतींच्या उपक्रमावर दृष्टि टाकली तर असे दिसून येतें की, इ. स. १६०७ मध्यें इंग्लंडने अमेरिकेच्या भूमीवर व्हर्जीनिया(१) नावाची पहिली वसाहत स्थापून आपला पाय तेथे कायमचा रोविला. यानंतर इ. स. १६१४ मध्यें न्यू यॉर्क (२), इ. स. १६१७ मध्ये न्यू जर्सी (३), इ. स. १३२० मध्यें मासाच्युसेटस् (४), इ. स. १६२३ मध्यें न्यू हामशायर (५), इ. स. १६३४ मध्यें कनेक्टिकट् (६), त्याच वर्षी मेरीलँड (७), पुढे इ.स.१६३६ मध्यें ऱ्होड आयलंड (८), इ.स.१६३८ मध्यें न्यू स्वेडन उर्फ डेलावेअर(९),

यानंतर पाव शतकाने—इ. स. १६६३ मध्यें—उत्तर कॅरोलिना (१०), पुढे तिच्याच पोटीं इ. स. १७१२ मध्यें दक्षिण कॅरोलिना (११), नंतर इ. स. १६८१ मध्यें पेनसिल्व्हानिया (१२), आणि शेवटीं इ.स. १७३२ मध्यें जॉर्जिया (१३), अशा एकूण तेरा वसाहती एका मागून एक निर्माण झाल्या! या घडामोडीस सुमारें १५० वर्षांचा कालावधि लागला आणि अमेरिकेची सुवर्णभूमि अंशा अंशाने रेड इंडियन लोकांच्या हातांतून निसटून जाऊन गौरकायाच्या स्वामित्वाखाली कायमची गेली ! दैवदुर्विलासाने मूळ धनी निराधार—निराश्रित—झाला व सहजीं आलेला उपरा पाहुणा उजळ माथ्याने स्वामी होऊन बसला !

या स्थित्यंतरामध्यें इंग्लंड बरोबर युरोपातील प्रमुख राष्ट्रें समभागी होतींच. इंग्लिशाबरोबर स्पॅनिअर्डस्, फ्रेंच, डच, स्वेडिश, जर्मन, आस्ट्रियन, इटालियन, स्विस इत्यादि सर्वांनी आपआपले डाव टाकले! अमेरिकेची भूमि आपली करून घेताना बहुतेक सर्वांचे हात तांबड्या इंडियनांच्या रक्ताने रंगले. मधून मधून गौरकायाच्या रक्ताची रंगपंचमीहि कमी झाली नाही. रानटी इंडियनांनी झालेल्या अन्यायाचा यथाशक्ति सूड घेतला! पण या सर्व उपक्रमांत मात केली इंग्लंडने! वरच्या बाजूस फ्रेंच व खालच्या बाजूस स्पॅनिअर्ड तलवारी परजून बसले असता व हिंस्र पशूप्रमाणें रानटी इंडियन झाडींत दबा धरून बसले असता त्याने कोणाचीच क्षिति बाळगिली नाही. आणि कासवाच्या गतीने अमेरिकेचा दीड हजार मैलांचा पूर्व किनारा व्यापून टाकिला! इकडे हिंदुस्थान पादाक्रांत करिताना जें बुद्धिबल त्याने लढविलें किंवा जी चिकाटी त्याने दर्शविली, त्याचा पूर्वाभ्यास त्याने अमेरिकेच्या भूमीवर केला असावा. एखादा दीर्घजीवी व प्रशस्त स्वरूपाचा वृक्ष ज्याप्रमाणें मंदगतीने पण निश्चितपणाने दिन प्रतिदिन वृद्धि पावत असतो, त्याप्रमाणेच इंग्लिश वसाहतींचा वृक्ष आपल्या अनेक शाखाप्रशाखांनी अमेरिकेच्या कोऱ्या भूमीवर विस्तार पावत गेला !

धन्य कोलंबस! खरोखर त्याच्याच भगीरथ प्रयत्नाचें हें सुंदर फल होतें. परंतु दुर्दैवी बिचारा! त्यास म्हणावें तसें यश मिळालें नाही. बरें, त्याने शोधिलेला व स्पेनला लाभलेला हा स्पर्शमणि त्या राष्ट्रास तरी पचायचा होता? पण त्यास त्याचें मूल्यच करता आलें नाही. हॉलंड व स्वेडन

या उदयोन्मुख राष्ट्रानी थोडेसे हातपाय हलविले; पण स्वपरिस्थित्यनुरूप त्यांना ते आवडावे लागले! इंग्रज लोक सहजीं मध्यें घुसले आणि बेट्याचें भाग्य असें जोराचें की, अमेरिकेच्या सुवर्णभूमीला त्यांचे पाय लागले मात्र. ती त्यांची होत गेली! फ्रेंचानी त्याच्या मागोमाग पाऊल टाकलें. त्यानींही त्या भूमीच्या फार मोठ्या भागावर आपला राष्ट्रध्वज फडकवीत नेला. अल्पावधींत त्या दोन प्रचंड सत्ता—स्वामित्व कोणाचें? या प्रश्नाच्या उत्तरार्थ परस्पराच्या सन्मुख ठाकल्या!

---

## प्रकरण चौदावें

## अमेरिकेंतील फ्रेंचांची करामत

मागे नवव्या प्रकरणांत इंग्रजेतर लोकांच्या वसाहतींसंबंधीं माहिती देताना फ्रेंच लोकाच्या एतद्विषयक प्रयत्नाचा थोडक्यांत उल्लेख करून त्यात असें सुचविलें होतें की, इंग्रजांच्या वसाहतींना तो एक बलिष्ठ शह बसला होता. तो कसा व त्याचें पर्यवसान पुढे काय घडून आलें, तें आता या प्रकरणात पाहूं.

आरमाडाच्या पराभवानंतर स्पेनच्या वैभवास व राजकीय प्रतिष्ठेस ओहोटी लागली. अशा संधीला फ्रान्स देश पुढे सरसावला. त्या कालीं इतर देशाप्रमाणेंच फ्रान्समध्ये राजसत्ता प्रचलित होती व फ्रेंच लोक रोमन कॅथॉलिक पंथाचे अनुयायी होते. राजकीय अंदाधुंदी व 'मतामतांचा गलबला' येथेही होता; परंतु फ्रान्सच्या सुदैवाने १३ व्या लुई-सारखा समंजस राजा व रिशल्यूसारखा जगाद्विख्यात मुत्सद्दी त्यास लाभल्यामुळें तेजोभंग न होतां त्याचा डाव रंगत गेला. रिशल्यू हा खरो खरच मोठा स्वदेशाभिमानी, स्वामिभक्त व राजकारणधुरंधर पुरुष होता. फ्रान्सचा राज्यकारभार त्याने मोठ्या हिकमतीने चालवून त्याच्या भावी उत्कर्षाचा पाया दृढतर करून ठेविला. यामुळें फ्रान्सची अंतःस्थिति तर सुधरत चाललीच पण त्याबरोबर युरोपच्या राजकारणात त्याचें महत्त्वही वाढत गेलें. इ. स. १६४२ सालीं मागे दिगंत कीर्ति ठेऊन रिशल्यू वारला. वर्षाभराने १३ वा लुईही दिवंगत झाला.

यानंतर फ्रान्सच्या सिंहासनावर १४ वा लुई अधिष्ठित झाला. पण हा अगदी बाल असल्यामुळें त्याच्या मातेने आपल्या विश्वासांतील मॅझरिन नामक एका प्रतिष्ठित मनुष्यास मुख्य मंत्रिपद दिले व त्याच्या साह्याने राज्यकारभार चालविला. मॅझरिन हाही दूरदर्शी व कर्तृत्ववान मुत्सद्दी होता. त्याने रिशल्यूचेंच धोरण पुढे चालवून अर्धवट राहिलेली अनेक कार्यें पूर्णतेस नेली व आपल्या राष्ट्राचें वर्चस्व निःसंदिग्धपणे प्रस्थापित केलें.

पुढे इ. स. १६६१ मध्ये मॅझरिन मृत्यु पावला. त्यावेळीं १४ वा लुई अगदी कोवळा तरुण होता. परतु तो स्वभावतःच तेजस्वी व बुद्धिमान असल्यामुळे त्याने न डगमगतां राज्यधुरा आपल्या स्कंधावर घेतली. सुदैवाने त्यालाही कोलबर्ट नामक एक सुयोग्य मंत्री लाभला. त्याच्या साह्याने तरुण लुईने आपल्या राज्यांत अनेक सुधारणा केल्या व आपल्या लोकाचें वैभव अनंतपटीने वाढविलें. सुज्ञ व महत्त्वाकांक्षी नृपति व कुशल स्वामिभक्त मंत्री असा मणिकाचन योग सतत तीन पिढ्या जुळत गेल्यामुळें १७ व्या शतकात फ्रान्सची अत्यंत भरभराट झाली व युरोपियन राष्ट्रांत त्यास अग्रपूजेचा मान मिळूं लागला. या अभूतपूर्व यशाने राजा व प्रजा या दोघाच्या महत्त्वाकांक्षा अमर्याद वाढल्या व त्यांना जगद्विजयाची मनोहर स्वप्नें पडूं लागलीं. पोर्तुगीज, इंग्रज, डच इत्यादि लोकांप्रमाणे फ्रेंचानीही ‘ ईस्ट इंडिया कंपनी ’ स्थापून आपले स्फुरणारे बाहु हिंदुस्थानापर्यंत पोचविले. ज्याची अशी तयारी, त्यांच्या दृष्टिक्षेपांतून अमेरिकेचा स्पर्शमणि सुटणे कसें शक्य होतें ? तिकडचें अवधानही त्यानी पूर्वीपासूनच राखिलें होतें. अस्तु.

पहिल्या इंग्लिश वसाहतीच्या मागोमागच फ्रेंचांनीही आपली पहिली वसाहत स्थापून अमेरिकेच्या भूमीवर स्वामित्व सागण्यास प्रारंभ केल्याचें मागे सांगितलेंच आहे. पण यांविषयींची त्याची दृष्टि मात्र केवळ व्यवहारी नव्हती. इंग्रज लोकाहून ती अगदी भिन्न व फार विशाल ! अमेरिकेच्या भूमीवर नवें फ्रान्स वसवून तेथे परागंदा होऊं पाहणारीं फ्रेंच कुटुंबें आणून सोडावयाचीं व त्याच्या वशवेलींना फैलावण्यास संधि देऊन तेथे आपलें एक नवें साम्राज्य स्थापावयाचें, ही गोष्ट तर ते करणार होतेच; पण या स्वार्थाबरोबर किंवा जुळल्यास त्या-

आधीही, एक मोठा परमार्थ साध्य करण्याचा त्याचा थोर मानस होता! अमेरिकेंतील मूळच्या रानटी लोकाना ख्रिस्ती धर्माची—रोमन कॅथलिक पंथाची— दीक्षा देऊन त्याना मनुष्यत्व द्यावयाचें व नंतर त्यांना फ्रेंच संस्कृतीचे धडे पढवून त्याच्यावरील रानटीपणाचा कलंक साफ धुवून टाकावयाचा, असें त्याचें बहारीचें उद्दिष्ट होतें. पहिल्या फ्रेंच वसाहतीचा संस्थापक चॅम्पलेन हाच पुढे तेथील पहिला गव्हर्नर झाला. त्याने असें प्रतिपादन केलें की, " एक मोठें साम्राज्य स्थापन करण्यापेक्षा एका रानटी मनुष्याला ख्रिस्तानुयायी बनविणें विशेष महत्त्वाचे—विशेष पुण्यकर—आहे. " फ्रान्सचे राजेराण्या, सरदारलोक, मंत्री व सामान्य लोक या सर्वांचें मनोगत याच थाटाचें असल्यामुळें अमेरिकेंतील फ्रेंच वसाहतींचा पाया या तत्त्वावर रचला गेला होता म्हणण्यास हरकत नाही.

कोणत्याही नव्या प्रदेशात नवी वसाहत स्थापन करावयाची असल्यास प्रथमतः समाजाचा मूळ संजीवक कृषीवल, त्याचे साहाय्यक बारा बलुते, वाणी उदमी व व्यापारी याच्या टोळया प्रथमत: पाठवावयाच्या असतात. इंग्लंडने तेच केलें. पण फ्रेंच लोक पडले उदात्त विचाराचे भोक्ते! त्यानी फ्रेंच वसाहतींमध्यें शेतकऱ्याऐवजी धर्मप्रसारक, नागराऐवजी क्रूस आणि नागडीऐवजी बायबल पाठविले! या संबधात त्यांना 'जीजस्ट' पंथी लोकाचें अत्यंत साह्य झालें. हे लोक कट्टे रोमन कॅथलिकच. ल्यूथरच्या चळवळीमुळें पोपच्या मुळावर आलेला जो प्रॉटेस्टंट पंथ त्याचा अगदी नायनाट करावा या हेतूने 'जीजस्ट पंथ'(Company of Jesus ) स्थापन झाला होता. येशूख्रिस्ताने उपदेशिल्याप्रमाणे स्वेच्छेने दारिद्र्य पत्करून, कोणताही संग न ठेवतां पवित्राचरणाने राहावयाचें व स्वधर्मसंवर्धनार्थ वाटेल त्या हालअपेष्टा सोसून प्राणांतापर्यंत झगडावयाचें असा या जीजस्ट पंथी लोकांचा संप्रदाय होता. अर्थात् फ्रान्सने अमेरिकन वसाहतींच्या संबंधात स्वीकारलेलें धोरण त्या लोकांना अत्यंत प्रिय झालें व तें यशस्वी करण्याकरितां ते अहमहमिकेने पुढे सरसावले, यांत नवल ते काय?

ज्या वेळीं इकडे स्वार्थात गुरफटलेले इंग्रज अमेरिकेच्या पूर्वकिनाऱ्यावर बसून शेतीभाती करण्यांत व आपल्या व्यापाराचा जम बसविण्यांत दंग झाले होते, त्याच काळांत तिकडे परार्थाकरितां बद्ध झालेले जीजस्ट-

पंथी धर्मप्रचारक कानडांतील सेंट लारेन्स नदीच्या काठीं वसलेल्या केबेक बंदरात उतरून आंतल्या प्रदेशांत पसरत चालले होते. एका हातांत क्रूस, दुसऱ्या हातांत बायबल, मुखात शांतिपाठ, ओठांत हास्य, नेत्रांत कारुण्यभाव व अंतःकरणांत दीनोद्धाराचें दिव्य ध्येय, असा त्याचा सरंजाम होता. आपल्या हेतुसिध्द्यर्थ त्यांनी आपलें शरीर कस्पटाप्रमाणें मानून प्राण तळहातावर घेतले होते. मनुष्याभावी कार्याचा विघात होऊन धर्मप्रसाराला खड पडूं नये म्हणून त्यांनी सैन्यासारखी शिस्त ठेविली होती. एक मनुष्य पडला की त्याची जागा दुसऱ्याने भरून काढली पाहिजे, एक तुकडी गारद झाली तर तिच्या जागीं दुसरी येऊन तिने पूर्वीचें कार्य चालू ठेविलें पाहिजे, असे धोरण त्यानी बांधून ठेविलें होतें. यामुळें किनाऱ्यावर उतरताच त्यानी नियोजित कार्यासच हात घातला.

रानटी इंडियन आपणास केव्हा दिसतात, त्याना आपण कड-कडून केव्हा भेटतों आणि त्याना सत्यधर्माचा दिव्य मंत्र सांगून केव्हा पावन करतों; असें त्या धर्मप्रसारकाना झालें होतें. यामुळे ती गोष्ट प्रत्यक्ष घडूं लागतांच त्याना ब्रह्मानंद झाला! आज दोन इंडियन ख्रिश्चन करून घेतले, उद्या त्यांचें सबंध गावच ख्रिस्ताच्या कळपांत येण्याचा संभव आहे, अशा वार्ता ते मायदेशाला पाठवूं लागले. त्याबरोबर फ्रान्समध्यें रावापासून रंकापर्यंत आनंदी आनंद उडाला. अमेरिकेंतील या धर्मप्रसारार्थ देणग्यांचा वर्षाव होऊं लागला व एक कायम निधीही स्थापन करण्यात आला.

परंतु रानटी लोकांतील धर्मप्रसाराचें कार्य कल्पनेमध्यें जितकें सुंदर व सुलभ वाटलें, तितकें तें प्रत्यक्षांत मात्र अनुभवास येईना. कारण त्यांच्यामध्यें सर्वच जाति दुर्बल, भोळया किंवा सौम्य स्वभावाच्या नव्हत्या. इराका, मोहॉक इत्यादि जाति क्रूर, आडदांड, धूर्त, जीर्णमत-वादी व स्वच्छंदी होत्या. त्या लोकाना या धर्मप्रसारकाचा कधीच विश्वास वाटला नाही. उलट हे पांढरे पाय आपल्या स्वातंत्र्यावर घाला घालण्या-करितांच आले आहेत व ती ब्याद आपल्या देशांतून नाहीशी होईल तरच स्वास्थ्य लाभेल असें त्याच्या मनाने घेतलें. यामुळें त्यांनी स्वतः फ्रेंच लोकाना यथाशक्ति त्रास दिलाच; शिवाय इतर जातींना त्याच्या विरुद्ध उठवून त्यांच्याकडूनही देवविला! ख्रिश्चन झालेले रानटी इंडियन स्वजनद्रोही

ठरले व फ्रेंचांबरोबर त्याचेंही काडात निघालें ! उभय पक्षांत वरचेवर चकमकी झडूं लागल्या, प्राणहानि होऊं लागली व रक्ताचे पाट वाहिले. पण अशा प्राणसंकटातही फ्रेंच लोक पुढे सरकत राहिले.

खरें म्हणजे सुधारलेलीं शस्त्रास्त्रें बाळगणाऱ्या फेंचांना तिरकमटाधारी इंडियन लोक भारी होण्याचें कांहीच कारण नव्हतें व तसा त्यांनी त्या लोकांचा पुष्कळ निःपात केलाही होता. पण पुढे त्या निर्भय व क्रूर वृत्तीच्या इंडियनानाही एकीकडून शस्त्रास्त्रे व दारूगोळा याचा पुरवठा होऊं लागला. हा कपटप्रयोग डच वसाहतवाल्यानी केला. त्यांची 'न्यू हॉलंड' वसाहत आता चागली नावारूपाला येत चालली होती. स्टीव्हिमेंट हा तेथील मुख्याधिकारी होता. त्याने न्यू स्वेडन वसाहत नुक्तीच गिळंकृत करून आपल्या पायातील एक काटा काढून टाकला होता ! त्यात त्यास वरच्या बाजूचा फ्रेंचाचा काटा तरी कसा खपेल ? म्हणून त्याने आपल्या आसपासच्या रेड इंडियनाना फ्रेंचाविरुद्ध उठवले आणि त्याच्या तर्फे दूरदूरच्या जातींना हत्यारें पुरविली. फ्रेंचाना हें कपट कळलें नाही असे नाही. युरोपात त्याचे व डचाचे पटत नव्हतेंच. तेव्हा संधि सापडताच 'न्यू हॉलंड' मटकविण्याचा त्याचा अंतःस्थ हेतु होताच. पण त्यापूर्वी त्याच्या डोक्यात धर्मप्रसाराचे वेड होतें. याविषयी त्याचा आत्मविश्वास अमर्याद असल्यामुळें त्यानी न्यू हॉलडने निर्माण केलेला धोका मुकाट्याने सहन केला आणि सर्व संकटाना मोठ्या धैर्याने व चिकाटीने तोंड दिले.

वरील भानगडीमुळे जीजस्टपंथी फ्रेंच धर्मप्रसारकांचें मुख्य कार्य अत्यंत कठीण होऊन बसलें व त्यांचें जीवित धोक्यांत आलें. पण असें असतांही धन्य त्यांची की, त्यांनी आपलें अंगीकृत कार्य यत्किंचितही ढिलें सोडलें नाही. इंडियन लोकांच्या क्रूरतेला जसें त्यानी जुमानिलें नाही, तसेंच ऊन्ह, वारा, पाऊस, थंडी, रोगराई, क्षुधातृष्णा, प्रवासाचे कष्ट किंवा नैसर्गिक संकटें यांनाही जुमानलें नाही. अंतिम यशाविषयी त्यांना पूर्ण निश्चिति असल्यामुळें त्यांचे प्रयत्न अखंड चालू राहिले. तेव्ह्याकारितां त्यांनी गहन अरण्यें तुडविलीं, मोठमोठे पर्वत ओलांडले, नदनद्या पार केल्या, सरोवरें तुच्छ मानिलीं आणि हिंस्र श्वापदाशीं सामने दिले. एक पडला की दुसरा तेथे यावयाचाच, असा त्यांचा परिपाट असल्यामुळें फ्रेंचांचा ध्वज ख्रिस्ताच्या क्रुसासह सतत पुढे सरत राहिला.

क्वेबेक वरून मॉंट्रील, तेथून आंटारिओ सरोवर, मग नायगाराचा प्रचंड जलप्रपात मागे टाकून एरी सरोवर, तेथून डेट्रॉइट भाग, नंतर ह्यूरॉन सरोवर असा प्रदेश आक्रमीत फ्रेंच लोक सुमारें साठ वर्षांच्या अवधींत मिचिगान सरोवराच्या पश्चिम तीरापर्यंत जाऊन पोंचले होते. म्हणजे अटलांटिकच्या किनाऱ्यापासून ते दीड हजार मैल आत घुसले होते. एवढा प्रदेश धुंडाळून पुढे जात असतां त्यानी ठिकठिकाणी आपल्या छोट्या वसाहती वसविल्या, त्यांच्या रक्षणाकरिता दोन तीन बलाढ्य लढाऊ किल्ले बांधिले, ख्रिश्चन झालेल्या व होऊं घातलेल्या लोकांकरिता चर्चेस उभारलीं, त्याच्या मुलांच्या शिक्षणार्थ शाळा उघडल्या आणि रोगग्रस्तांकरिता रुग्णालयें स्थापन केलीं. तोंपर्यंत इकडे पूर्व किनाऱ्यावर इंग्रजानी काय केले होतें ? फ्रेंचाच्या भरारीच्या मानाने काहीच नाही. त्याच्या आता निरनिराळ्या दहा एक वसाहती झाल्या होत्या. न्यू हॉलंड व न्यू स्वेडन या दोन्ही वसाहती त्यानी आत्मसात् केल्या होत्या हें खरें; पण हा त्याचा सारा पराक्रम पूर्व किनाऱ्यावर दोनशे मैल रुंद व सात आठशें मैल लांब एवढ्या प्रदेशापुरताच मर्यादित होता. आपल्या पश्चिम दिशेस अमेरिकेची भूमि कोठवर पसरली आहे, याचा त्यानी विचार केला नाही किंवा ती धुंडाळण्याचा प्रयत्न केला नाही. पश्चिम अमेरिकेचे मुख्य व महत्त्वाचें संशोधन इंग्रज वसाहतवाल्याकडून मुळींच झाले नाही. बरें, इंग्लंडने त्याबद्दल काही पूसतपास ठेवावा, तर त्यानेही ती गोष्ट मनावर घेतली नाही. त्यामुळें हें महत्त्वाचे कार्य खरें ह्मणजे फ्रेंच लोकानी—विशेषत: जीजस्टपंथी धर्मप्रसारकानी—स्वतःचे प्राण धोक्यात घालून केले व म्हणूनच विस्तृतपणाच्या दृष्टीने तुलना केल्यास व कालावधि मापल्यास इ. स. १६७० पर्यंत अमेरिकेच्या भूमीपैकी फार मोठा प्रदेश इंग्रजापेक्षा फ्रेंचांच्या स्वामित्वाखाली आला होता. असो.

रानटी इंडियनांना ख्रिश्चन बनवून सुसंस्कृत करण्याकरितां फ्रेंच लोकांनी पन्नास साठ वर्षे जी जिवापाड धडपड केली, तिच्या प्रचंड स्वरूपाकडे पाहतां त्यांना त्यांच्या हेतुसिद्धीमध्यें फारच थोडें यश आलें होतें. असें असताही त्या लोकांना तें ध्येय बाजूला ठेऊन, स्वामित्वाखाली आणिलेला प्रदेश फ्रेंच कुटुंबें आणवून आबादीआबाद करण्याचें सुचलें नाही. त्यांनी पूर्वीचाच उपक्रम चालू ठेविला. मिचिगान सरोवराच्या

पश्चिम तीरावर आल्यावर फ्रेंचांना तेथील इंडियन लोकांकडून माहिती लागली की, तेथून आणखी पश्चिमेकडे गेल्यास एक प्रचंड नदी लागते व ती पार दूर कोठेतरी एका समुद्रापर्यंत गेली आहे. ही वार्ता ऐकतांच जालीट व मार्केट नांवाच्या दोघा फ्रेंच गृहस्थांना त्या नदीचें संशोधन करण्याची उत्कंठा लागली. जालीट हा एक धाडसी व्यापारी असून मार्केट हा जीजस्टपंथी धर्माधिकारी होता. दोघांचाही अकृत्रिम स्नेह असल्यामुळें त्यांनी हा अत्यंत साहसाचा प्रवास करण्याचें निश्चित केलें. त्या काळीं अशा प्रवासाचें मोठ्यात मोठें व सहजलब्ध साधन ह्मणजे बर्च वृक्षाच्या सालीपासून तयार केलेली नाव (Birch-bark Canoe). अशा दोन नावा तयार करून एके दिवशीं त्यांनी विसकान्सीन नामक नदींत प्रवेश केला. आणि दक्षिणेचा मार्ग धरिला. या नदींतून वाहात वाहात ते जून मासातील ( इ. स. १६७३ ) एका सुंदर दिवशीं दुसऱ्या एका प्रचंड नदींत येऊन लागले ! ही नदी ह्मणजे 'मिसिसिपी' होय. ज्या ठिकाणीं हे दोन प्रवासी त्या प्रचंड नदींत आले, तेथे तिचे पात्र या तीरापासून त्या तीरापर्यंत दोन पक्के मैल रुंद होतें ! यावरून तिच्या विशाल स्वरूपाची अटकळ बांधता येईल. अशा नदांतून त्या दोन प्रवाश्यानी आपल्या नावा प्रवाह नेईल तिकडे चालविल्या ! दिन प्रतिदिन मिसीसिपी नदीचें व तिच्या काठाचें स्वरूप गंभीर, उदात्त व भयप्रद होत चाललें ! कधी मैल मैल प्रचंड व गगनचुंबित खडकांच्या छायेंतून तर कधी त्याच प्रकारच्या गहन अरण्यातून, कधी उंच उंच गवताच्या मैदानांवरून तर कधी सपाट रुक्ष भागातून त्यांना जावें लागलें ! प्रसंगोपात्त ते मधून मधून किनाऱ्यावर उतरत. आणि रानटी इंडियन आढळल्यास त्यांच्याशीं स्नेह करून व त्यांना आपला उद्देश सांगून त्यांच्याकडून खाद्य वस्तु घेत आणि पुन्हा प्रवाहांत पडून पुढच्या मार्गाला लागत. असा प्रवास करीत करीत ते हजार बाराशें मैल खाली दक्षिणेकडे गेले. या ठिकाणीं आरकन्सा नांवाची एक नदी मिसिसिपीला मिळते. तेथपर्यंत गेल्यावर दीर्घ प्रवासामुळें व त्यातील असह्य कष्टांमुळें त्यांना अत्यंत शीण आला. वास्तविक त्यांच्या मनात मिसिसिपीच्या मुखापर्यंत जावयाचें होतें. परंतु या पुढचा प्रवास त्यांना स्वसामर्थ्याच्या पलीकडचा वाटूं लागला. ह्मणून ते किनाऱ्यावर उतरले. येथील रानटी

जाति सौम्य स्वभावाच्या व मित्रत्वास योग्य होत्या. त्या लोकांनी या दोघा प्रवाश्यांचें यथोचित स्वागत केलें व विश्रांतीस्तव त्यांस आपल्याकडे ठेवून घेतलें. कांही कालानंतर जालीट व मार्केट आपल्या नव मित्राचा प्रेमळ निरोप घेऊन परत निघाले. हा त्याचा प्रवास वल्हविण्याच्या दृष्टीने पूर्वीपेक्षा कष्टाचा होता. नदीप्रवाहाबरोबर खाली वाहात जाणें सोपें असतें. पण तेंच तिच्या पात्रांत वर चढत जावयाचें ह्मणजे एकंदरींत कठीणच. पण जालीट व मार्केट यांना तसा प्रवास करूनच आपल्या मूलस्थानीं येणें भाग होतें. असो.

यानंतर सहा वर्षांनी ( इ. स. १६७९ मध्यें ) जालीट व मार्केट यांचेकडून अर्धवट राहिलेलें वरील कार्य 'ला साल' नामक एका निधड्या छातीच्या पराक्रमी पुरुषाने हातीं घेतलें. याने ' आलेघनी ' पर्वतांच्या रांगेपासून मिसिसिपीच्या प्रचंड खोऱ्यापर्यंत सारा प्रदेश धुंडाळून तो फ्रान्सच्या स्वामित्वाखालीं आणण्याचें ठरविलें आणि त्याप्रमाणें त्याने ' ओहिओ ' नदीच्या खोऱ्यात उतरून पहिला धडाका उडविला. नंतर त्याने पुन्हा दुसरी सफर काढली व त्यात भूमीवरून मार्ग काढून जालीट मार्केट गेले होते तेथपर्यंतचा प्रदेश धुंडाळला आणि नंतर तिसऱ्या सफरींत त्याने मिसिसिपीच्या मुखापर्यंत दौड मारली आणि आपली प्रतिज्ञा शेवटास नेली ! या बाबतींत विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ह्मणजे 'लासाल'ने केलेलें हें जंगी संशोधन केवळ नाममात्राचें नव्हतें. त्याने तो तो भाग केवळ फ्रान्सचा आहे हें दर्शविण्याकरिता मिसिसिपीच्या काठा काठावर लढाऊ किल्ले बांधिले आणि तेथें फौज व दारूगोळा ठेवण्याची व्यवस्था केली ! या साऱ्या कृत्यास त्यास तीन वर्षें लागलीं. पण त्या कालाकडे व साधनसामग्रीकडे लक्ष देता लासालचें हें कार्य अत्यंत आश्चर्यकारक व प्रशंसनीय झालें यांत शंकाच नाही ! त्याने आपल्या या प्रचंड कर्तृत्वाने फ्रान्सच्या सत्तेखाली स्पेन, जर्मनी व फ्रान्स या तीन्ही देशांच्या क्षेत्रफळाच्या दुप्पट क्षेत्रफळाचा प्रदेश आणिला आणि त्यास ' लुइझिआना ' उर्फ ' नवें फ्रान्स ' असें नाव १४ व्या लुईच्या सन्मानार्थ दिलें. तात्पर्य, इ. स. १६८२ मध्यें फ्रेंच वसाहतीच्या पूर्व व दक्षिण सीमा इंग्लिश व स्पॅनिश वसाहतींच्या सीमेला येऊन भिडल्या ! आणि तेव्हापासून फ्रेंच व इंग्रज यांच्यामध्यें अमेरिकेंतील

सत्तेबद्दलच्या भांडणास प्रारंभ झाला.

फ्रेंचांनी आपल्या सीमा वाढविण्याचें कार्य चालूच ठेविलें. इ. स. १७०१मध्यें 'इलरव्हील' नांवाच्या फ्रेंचानें मेक्सिकोच्या आखाताच्या किनाऱ्यावर 'मोबाइल' नांवाची वसाहत वसवून स्पॅनिश लोकांना शह देऊन ठेविला आणि पुढे इ. स. १७१८ मध्यें त्याच्याच भावानें—बीनव्हीलनें—प्रख्यात 'न्यू आर्लियान्स' या नगराचा पाया घातला! तोंपर्यंत मिसिसिपीच्या पश्चिमेकडे 'रॉकी' पर्वताच्या रांगापर्यंत फ्रेंच धर्मप्रसारक जाऊन पोंचले होते! अर्थात् तो सर्व प्रदेशही आपल्याच स्वामित्वाचा आहे, असें फ्रान्सला वाटूं लागलें.

चौदाव्या लुईच्या उत्कर्षप्रद कारकीर्दीमुळें युरोपांत फ्रान्सला जें अग्रेसरत्व प्राप्त झालें होतें, त्यातच या यशाची भर पडल्यामुळें फ्रेंचलोक आता जग जिंकल्यावाचून राहात नाहीत असें भय त्याच्या शत्रूंच्या पोटांत उभें राहिले. त्या काळीं फ्रान्सचा मोठा शत्रु किंवा प्रतिस्पर्धी म्हणजे इंग्लंड. त्यास फ्रेंचांचे वाढतें वर्चस्व असह्य होऊं लागलें. आणि इकडे फ्रेंचानाही आपल्या प्रगतिपथात इंग्लंडची अडचण आहे असें वाटूं लागलें. इंग्लिश वसाहतींनी व्यापलेला भाग व स्पेनची फ्लोरिडा वसाहत वगळतां उत्तर अमेरिकेची बहुतेक ज्ञात भूमि फ्रेंचानी आपल्या स्वामित्वाखाली घेतल्यामुळें, त्याना इंग्लिश वसाहतींवर आपला राष्ट्रध्वज केव्हा फडकतो आणि साऱ्या अमेरिकेचें एकमेवाद्वितीयम् असें स्वामित्व आपण केव्हा मिळवितों, असें होऊन गेलें. डचानी स्थापिलेलें पण पुढे इंग्लिशानी त्यांच्यापासून गिळलेलें 'न्यू आमस्टरडाम' उर्फ 'न्यू यॉर्क' हें बंदर युरोपांतून अमेरिकेंत येण्यास फार सोयीचें व म्हणूनच अत्यंत महत्त्वाचें होतें. त्याचेवर फ्रेंचांचा आज किती दिवसापासून तरी डोळा होता. डचांकडून तें हिसकावून घेण्याचा त्यांचा मानसही होता. तोंच इंग्लंडने आघाडी मारली! हें पाहतांच आता इंग्लंडकडे सौम्य दृष्टीने पाहण्यांत अर्थ नाही, त्यांची पूर्व किनाऱ्यावरील एवढीशी अडगळ काढून टाकलीच पाहिजे असें फ्रान्सने ठरविलें आणि तेव्हापासून अमेरिकेच्या भूमीवरील इंग्लिश-फ्रेंच कलहास तोंड लागलें!

———

## प्रकरण पंधरावें

# शह फ्रेंचांचा पण मात इंग्रजांची!

चक्रवर्ति पद मिळविण्याच्या उद्दाम लालसेने प्रेरित होऊन ज्या वेळीं दोन राष्ट्रें परस्परांच्या नाशास प्रवृत्त होतात, त्या वेळीं त्याच्यामध्ये धुमसत चाललेल्या वैराग्नीची किंवा तन्निमित्त निर्माण झालेल्या सानथोर युद्धांची कार्यकारणपरंपरा शोधून काढणें व मग त्याच्यामध्यें कोण दोषी वा कोण निर्दोषी याचा निर्णय करणें, म्हणजे बीजांकुर वादाचा न्याय तोडण्यासारखेंच प्रायः कठीण असतें. सतराव्या शतकापासून इंग्लंड व फ्रान्स याच्यामध्यें जगद्विजयाबद्दल जी प्रचंड स्पर्धा सुरू झाली तिचा इतिहास असाच मोठा गुंतागुंतीचा आहे. त्या दोन राष्ट्रांतील हा झगडा सुमारें एक शतकभर चालला. प्रथमतः युरोपच्या राजकारणांत कांही भानगडी होत, नंतर त्यातून कलहाच्या ज्वाला उठत आणि मग त्याच्या ठिणग्या हिंदुस्थान व अमेरिका येथपर्यंत पसरत. या स्थानीं आपणास केवळ अमेरिकेविषयींच विचार कर्तव्य आहे म्हणून तेवढ्या-पुरतेंच पाहूं.

अमेरिकेच्या स्वामित्वाबद्दल इंग्लंड व फ्रान्स यांच्यामध्यें चाल-लेल्या कलहास दृश्य स्वरूप इ. स. १६८८ नंतर प्राप्त झालें. त्या वेळचा राजा दुसरा जेम्स हा रोमन कॅथालिक पंथाचा पुरस्कर्ता झाल्यामुळें व लोकांना न रुचतील अशा अनेक भानगडी त्याने उपस्थित केल्यामुळें तो सर्वांना अप्रिय होत चालला. तेव्हा असला खट्याळ भूपति सिंहा-सनावर ठेवण्यापेक्षा त्यास पदच्युत करणें बरें असें लोकमत बनत चाललें. या जेम्सचीच मेरी नांवाची एक कन्या असून तिचा विवाह हॉलंडचा राजपुत्र विल्यम ऑरेंज याच्याशीं झाला होता. हें जोडपें प्रॉटेस्टंट पंथा-नुयायी होतें. यामुळें तें इंग्लंडच्या गादीवर आल्यास भलें होईल असें वाटल्यावरून प्रमुख सरदारांनी विल्यम व मेरी यांना इंग्लंडात येऊन राजदंड हातीं घेण्याविषयीं विनंती केली व त्यानी ती मान्य केली. जेम्सला कोणाचेंच साह्य लाभलें नाही व प्राणरक्षणार्थ त्यास इंग्लंडमधून पळ

काढावा लागला. नंतर लोकमतास अनुसरून मेरी व विल्यम हें जोडपें इंग्लंडच्या गादीवर आलें. मात्र ही गोष्ट पार्लमेंटच्या अनुमतीने झाली असल्यामुळें तेंव्हापासून इंग्लंडची राजसत्ता लोकनियंत्रित झाली !

इकडे जेम्स राजा फ्रान्समध्यें १४ व्या लुईच्या आश्रयास गेला व तेथून त्याने आपलें गेलेलें राज्यपद परत मिळविण्याची खटपट चालू केली. त्या काळीं लुईला फारच महत्त्व चढलें होतें. त्या उन्मादात त्याने युरोपांतील इतर राष्ट्रांच्या राज्यकारभारांत हात घालून उगाचच ढवळाढवळ चालविलेली होती. मग त्यास इंग्लंडचें राजकारण तरी वावडे का वाटेल ? जेम्स राजा आश्रयास येतांच त्याने त्याचा पक्ष उचलून धरला व इंग्लंडशीं कलह आरंभिला. मग इंग्लंडलाही शस्त्रग्रहण करणें भाग पडलें. यावेळीं युरोपात लुईच्या वर्चस्वाला व लुब्रेपणाला कंटाळून कांही राष्ट्रांनी एक संघ उभारिला होता व त्याच्या द्वारें लुईला शह देण्याचें त्यांचें घाटन होतें. इंग्लंड तात्काल या संघात सामील झालें व युरोपांत युद्धाचें कुंड पेटले. इकडे हे निमित्त घडताच तिकडे अमेरिकेंतही इंग्रज व फ्रेंच वसाहतवाले एकमेकाचे उघड शत्रु झाले.

न्यू यॉर्क बंदराचें स्वामित्व आपल्याकडे असावे, ही अमेरिकेंतील फ्रेंचाची फारा दिवसाची इच्छा. ती तडीस नेण्याचे कार्य कानडा प्रांताचा फ्रेंच गव्हर्नर फ्रॉटेनाक याने तात्काळ हाती घेतलें. गनिमी कावा लढवून इंग्रज वसाहतवाल्याना हैराण करून सोडण्याचा त्याचा विचार होता. म्हणून त्याने लढवय्ये फ्रेंच व कडवे इंडियन यांच्या संमिश्र तुकड्या तयार केल्या व त्यावर हुशार अधिकारी नेमून त्याच्याकडे चोरटे हल्ले चढविण्याचें काम दिले. त्याप्रमाणें एक तुकडी इ. स. १६८९ मध्यें मॉट्रील गावाहून निघाली. हडसन नदीच्या आसमंतात् न्यूयॉर्क संस्थानचीं काही शेवटचीं गावें वसलीं होतीं. यांपैकी स्केनेक्टडी नांवाच्या एका गावावर फ्रेंच तुकडीची धाड आली ! मध्यरात्रीची शांत गंभीर वेळा ! थंडी म्हणजे मी म्हणत होती. युद्धाची काही कल्पना नाही असे इंग्रज वसाहतवाले निद्रासुख अनुभवीत होते, तोंच त्यांच्यावर हा घातक प्रहार करण्यांत आला ! हिंस्र पशूप्रमाणें गुपचुप आलेल्या या फ्रेंच तुकडीने अकारण क्रौर्य दाखविलें. सापडेल त्या माणसाची त्यांनी कत्तल केली व मागून साऱ्या गावाला आग लावून दिली !

याच पद्धतीचा दुसरा हल्ला दुसऱ्या एका तुकडीने हॅवरहिल नांवाच्या खेड्यावर केला परंतु त्यांत सरतेशेवटीं बाजू फ्रेंचांवरच उलटली.

फ्रेंचांचे असे हल्ले सुरू होतांच इंग्रजानी शस्त्र उचललें आणि शत्रूच्या मुलखात घुसून अनर्थ आरंभिला. असलें हें झोंबा झोंबीचें व व चोरट्या हल्ल्यांचें युद्ध सुमारें आठ वर्षें चाललें. फलनिष्पत्ति कोणालाच झाली नाही. शेवटीं उभय पक्षांनी हैराण होऊन, पुन्हा केव्हा तरी याचें उट्टें काढूं अशी खूणगाठ मनांत बांधली व एकमेकाचे घेतलेले भाग परत देऊन तहावर सह्या केल्या! या वेळीं इंग्लंडात विल्यमची कारकीर्द सुरू असल्यामुळें अमेरिकेंतील इंग्रज-फ्रेंचाच्या या पहिल्या युद्धास 'राजा विल्यमचें युद्ध' असें नाव प्राप्त झालें. असो.

वर घडून आलेल्या तहाने इंग्रज-फ्रेंच वसाहतवाल्यांचा सलोखा कसा बसा इ.स. १७०२ पर्यंत टिकला. मधून मधून कुरबुरी होत होत्या. पण प्रत्यक्ष युद्ध नव्हतें तें या वर्षांत पुन:उपटलें. या वेळीं इंग्लंडच्या गादीवर राणी ॲन होती म्हणून या दुसऱ्या युद्धास तिचे नांव ( राणी ॲनचें-युद्ध) मिळालें. पहिल्या युद्धाप्रमाणें या वेळीं इंग्लिश लोक बेखबर नसल्यामुळें या नव्या लढ्यास तोंड लागताच त्यानी फ्रेंचांना फारसें यशस्वी होऊ दिलें नाही. या वेळी फ्रेंचानी आपला मोर्चा कनेक्टिकट संस्थानाकडे वळविला होता. तेथे त्यांनी डीअरफील्ड नावाचें महत्त्वाचें स्थान उध्वस्त केलें आणि त्याच्या भोंवतालचा प्रदेश काबीज केला. परंतु त्यांचेपेक्षा त्यानेवर इंग्लिशानी विशेष विजय मिळविला. इंग्लिशांनी आकेडिया प्रांत काबीज करून फ्रेंचाची मुख्य राजधानी क्वेबेक या स्थानाला शह दिला. वादळामुळें त्यांचा हा शह यशस्वी झाला नाही हें खरें; पण त्यांच्यामध्यें आत्मविश्वास निर्माण होण्यास व फ्रेंचांना दहशत बसण्यास क्वेबेकवरील या चढाईचा फारच उपयोग झाला ! विजयाचें पारडें इंग्लिशाकडे झुकत चाललेलें हें युद्ध इ. स. १७१३ पर्यंत चाललें व त्याच वर्षी युरोपांत युट्रेक्टचा प्रख्यात तह घडून आल्यामुळें अमेरिकेंतील इंग्लिश–फ्रेंच युद्धही संपुष्टांत आलें ! पण या तहान्वयें अमेरिकन इंग्लिशांना फ्रेंच स्वामित्वाखाली असलेलीं 'न्यू फाउंडलंड' बेटें,'आकेडिया'प्रांत, 'पोर्ट रायल' बंदर इत्यादि भाग कायमचा मिळाला ! म्हणजे एव्हापासून फ्रान्सच्या वैभवाला, वर्चस्वाला व महत्त्वाकांक्षेला चांगलाच धक्का बसला असें म्हणण्यास हरकत नाही. इंग्लिशांनी

पोर्ट रायलला अनापोलीस व आकेडियाला 'नोवा स्कॉशिया' अशीं नावें दिलीं आणि त्यावरील फ्रेंचाचें नाममात्राचें स्वामित्वसुद्धा उडवून दिलें.

यानंतर इंग्लिश-फ्रेंच वसाहतवाल्यांना पुन्हा युद्धाची खुमखुमी येण्यास जवळ जवळ तीस वर्षें लागलीं. इ. स. १७४४ मध्ये कांहीं खुसपट निघून पुन्हा नव्या युद्धास तोंड लागलें. या तिसऱ्या युद्धास तत्कालीन इंग्लडचा राजा जार्ज याचें नांव लाभलें. या युद्धात अमेरिकन इंग्लिशानी एकच मोठा पराक्रम केला. तो म्हणजे केप ब्रेटन बेटातील लुइजबर्ग किल्याचा वेढा होय. हें छोटें बेट न्यफाउंडलंड बेटाच्या दक्षिणेस असून ह्या वेळपर्यंत तें फ्रेंचाच्याच ताब्यांत होतें. येथे त्यानी लुईजबर्ग नांवाचा मोठा बळकट लढाऊ किल्ला बांधला होता. याची तटबंदी तीस फूट उंचीची असून एकंदर बांधकाम असे मजबूत होतें की, तो बाहेरून झुंझवून हस्तगत करणें अत्यंत कठीण होते. याच किल्यावर घावा करण्यास इंग्लिशाना एक सबळ कारण होतें. याच्या आश्रयास राहून फ्रेंच जातीचे चाचे लोक ब्रिटिशाच्या मच्छीमार बोटीं-ना व इतर व्यापारी जहाजाना मोठा त्रास देत. तेव्हा तो किल्ला पाडून आपल्या मागची एक कीड नाहीशी करण्याचा मासाच्यूसेट्स संस्थान-च्या लोकानी निश्चय केला. हें कार्य असें अवघड होतें की, चागल्या चांगल्या शूरवीराना व मुत्सद्यानाही तें यशस्वी होणार नाही असे वाटत होतें. त्यावेळचा प्रख्यात लोकपुढारी बेंजामिन फ्राकलीन याला सुद्धा तें कृत्य फारसें पसंत नव्हते. सर्पाने कानशीचा चावा घेऊन तिचा चट्टामट्टा करण्यासारखें तें हास्यास्पद व वेडेपणाचें आहे, असे त्याचें मत होतें. परंतु मेनचा रहिवासी कर्नल विल्यम पेपरेल नावाचा एक साहसी गडी होता. त्यास हें अवघड कार्य हातीं घेण्याची विलक्षण स्फूर्ति झाली. अनेकांचा मोडता असताही त्याने दोनचार हजार शेतकरी व शेंपाचशे मच्छीमारीचा धंदा करणारे लोक अशा शूर व धीट परंतु युद्ध-कलेंत अनभिज्ञ लोकाचें सैन्य जमविलें आणि सामान्य जहाजांत बसून ब्रेटन बेटाकडे कूच केलें ! खुद्द इंग्लिशांनाच जेथे ही तयारी वेडे-पणाची वाटत होती तेथे फ्रेंचलोकांना तो एक सामान्य कुचेष्टेचा विषय झाला यांत नवल तें काय ! सर्वांची अशी खात्री होती की पेपरेल अप-यश घेऊन परत येणार किंवा सर्व माणसांसह मृत्युमुखीं पडणार! परंतु

तसें कांहींच झालें नाही. उलट पेपरेलची दांडगी तयारी पाहून तेथे आसपास असलेल्या ब्रिटिशांच्या आरमारी काफिल्याने त्यास साह्य दिलें आणि अवघ्या दीड महिन्यांच्या अवधींत पेपरेलने लुईजबर्गचा प्रचंड किल्ला हस्तगत केला! ही विजयवार्ता इंग्लिश वसाहतीमध्यें पसरतांच जिकडे तिकडे आनंदाचा कल्लोळ उडाला! पेपरेलवर देणग्यांचा व स्तुतीचा वर्षाव झाला! खुद्द इंग्लंडच्या राजाने (२ रा जार्ज) या अमेरिकन इंग्लिशमनला 'सर' हा किताब देऊन गौरविलें! असो.

इ. स. १७४८ मध्यें ही तिसरी लढाई संपुष्टांत आली व तहाप्रमाणें ब्रेटनबेट व तेथचा किल्ला लुईजबर्ग फ्रान्सला परत देण्यात आला. परंतु या विजयाने जे दोन मोठे परिणाम घडून आले ते अमेरिकन इंग्लिशाना अत्यंत उपकारक झाले! पहिला परिणाम असा की, फ्रेंचचांचे लोकाचा त्रास अजीबात नाहीसा झाला आणि दुसरा इंग्लिश वसाहतवाल्याना स्वतःच्या कर्तबगारीचा पूर्ण विश्वास वाटूं लागला! वास्तविक त्याना हा जो विजय मिळाला होता, त्यास त्याच्या पराक्रमापेक्षा फ्रेंचांचा अहंकार, फाजील आत्मविश्वास आणि वेंधळेपणा कारणीभूत झाला. लुईजबर्गच्या दुर्गमतेविषयीं व तेथे बंदोबस्ताकरितां ठेविलेल्या सैन्याविषयीं फ्रेंचाना इतका विश्वास वाटत होता की, त्या तोऱ्यांत त्याना तेथील अपजयाविषयीं थोडीसुद्धा शंका आली नाही. आपल्यासारख्यानी इंग्रजाच्या आक्रमणाला भिणे ह्मणजे दीपपतगांची झुंड धावून येत आहे असें पाहून मशालीने लपून बसण्याच्या प्रयत्नास लागण्यासारखे आहे असें त्यांच्या मनाने घेतलें व ही त्यांची मूर्ख अहंताच त्याना बाधली! पण तह होऊन गेल्यानंतर मात्र त्याना वरील पराभव फार जाणवूं लागला. त्यांचा लुईजबर्ग किल्ला त्यांना परत मिळाला असताही त्याच्यापायीं झालेली त्यांची मानहानि आतां वज्रलेप झाली होती. तो कलंक साफ धुवून काढावयाचा म्हणजे त्यांच्याकडून अल्पावधींत इंग्लिश लोकांचा एखादा जंगी पराभव होणें आवश्यक होतें. म्हणून ते आता तशा संधीची वाट पाहूं लागले.

उलट पक्षीं इंग्लिश वसाहतवाल्यांना वरील विजयाने चांगलें स्फुरण चढलें व अमेरिकेच्या स्वामित्वाविषयीं त्यांना एक नवी दृष्टि प्राप्त झाली. फ्रेंच लोकांच्या सबळतेविषयीं त्यांना आता विशेष भीति वाटत नव्हती;

पण त्या लोकानी अमेरिकेचा गाभा हस्तगत करून ठेविला असून त्यांच्या मानाने आपल्या वसाहतींचें क्षेत्र अगदीच टाचकें आहे, ही गोष्ट नव्यानेच त्याच्या ध्यानीं आली व ते एकदम सावध झाले. आपल्याकडून यापुढें दिरगाई झाली तर आलेघानी पर्वताच्या भिंताडापलीकडे एक तसूभर जागा आपल्या वंशजाना लाभणार नाही आणि परसाच्या तोंडाशीं फ्रेंचांसारखा शत्रु धरणें धरून बसल्यास भविष्यकालात आपल्या जातीचा निभाव लागणार नाही, हें कटु सत्य त्याच्या दूरदृष्टीपुढे उभें राहिलें. या संकटनिवारणाचा रामबाण उपाय म्हणजे आलेघानी पर्वत ओलांडणें व त्याच्या पाठीमागच्या भागात घुसून नव्या वसाहती स्थापणें हाच होता. तात्काल या कामी व्हर्जिनिया वसाहतीने पुढाकार घेतला. या प्रांताच्या पाठीमागे व आलेघानी पर्वताच्या पलीकडे ओहिओ नांवाच्या नदीचें एक प्रचंड सुपीक खोरें आहे. या भागात नव्या वसाहती करण्याचें घाटूं लागलें. तेवढ्याकरितां ओहिओ नावाची एक नवीन कंपनी स्थापण्यांत आली व तिच्यातर्फे ओहिओ खोऱ्यात भूमिसंशोधनाचें व निरीक्षणाचें काम सुरू झालें.

व्हर्जिनिया प्रांतवासी लोकाचा हा नवा उपक्रम फ्रेंचांना कळतांच त्यानी त्याचा प्रतिकार करण्याचें ठरविलें. ते स्वतः त्या खोऱ्यांत उतरून तेथील लष्करी बंदोबस्त करूं लागले. एरी सरोवरापासून त्यांनी दक्षिणेस रोख धरला व नवे किल्ले उभारण्यास प्रारंभ केला. आज ज्या स्थानीं पिट्स्बर्ग हें प्रख्यात नगर वसलें आहे तेथे आलेघानी व मोनोंगेला नांवाच्या दोन नद्या मिळतात व त्यांच्या संगमांतून ओहिओ नदी तयार होते. हें स्थान पूर्व किनाऱ्यावरून पश्चिम अमेरिकेंत शिरण्याचें महाद्वारच होतें. हें ज्याच्या स्वाधीन तो ओहिओ खोऱ्याचा स्वामी अशी वस्तुस्थिति असल्यामुळे तें काबीज करून तेथे एक बळकट किल्ला उभारावा, असा विचार पूर्वेकडून पर्वत ओलांडून येणारे इंग्लिश व उत्तरेकडून खाली उतरणारे फ्रेंच या दोघानी केला व दोघेही त्या स्थानाकडे येऊं लागले.

त्या कालीं व्हर्जिनियाचा गव्हर्नर डिनूविडी नामेंकरून होता त्यास फ्रेंचांच्या या आक्रमणाची वार्ता लागताच त्याने हें प्रकरण सामोपचाराने मिटल्यास पाहावें, असा विचार करून त्यांचेकडे एक खलिता धाडण्याचें

ठरविलें. ओहिओ खोरें हें आमचें ( इंग्लिशांचें ) असून तें आम्ही इंडियन लोकांकडून रीतसर खरेदी करून घेतले आहे, तेव्हा त्या भागांत तुह्मी ( फ्रेंचांनी ) येऊन गडबड करणें बरें नाही. " असा या खलित्याचा मथितार्थ होता.

पण हा खलिता फ्रेंचांना नेऊन पोचविण्याचें कार्य मात्र अत्यंत जोखमीचें होतें. कारण, इंग्लिश वसाहतीपासून फ्रेंचाचें जवळचें निवासस्थान तीनशें मैल दूर होतें व एवढा पल्ला खलिता घेऊन जाणाऱ्या दूताने पायींच आक्रमणे भाग होते. मध्यंतरीं मोठमोठे पर्वत, दऱ्याखोरीं, नद नद्या, अरण्यें, हिंस्र पशु व क्रूर इंडियन इतकीं संकटे पसरलीं होतीं. अर्थात् त्यांपैकी एकालाही न डरतां प्रवास करावयाचा होता. शिवाय तो दूत अत्यंत चतुर, विश्वस्त, मधुरभाषी, स्वाभिमानी, समयसूचक व कर्तव्यनिष्ठ असा असणें अगत्याचे होतें. असा सर्वगुणसंपन्न मनुष्य चटकन् सापडणें कठिण असताही डिन्विडीला तो हातार्शाच लाधला. हा ओहिओ कंपनीच्या मुख्य चालकाचा धाकटा भाऊ असून त्याच कंपनींत भूमिनिरीक्षक होता. याचें वय अल्प, वीस बावीस वर्षांचें, पण हिंमत दाडगी होती. त्याने तात्काळ हें कठिण कार्य अंगीकारलें आणि इ. स. १७५३ मध्यें हिवाळ्यांत तो आपली छोटी तुकडी घेऊन मार्गाला लागला ! हा तरुण म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून पुढच्या कालांत अमेरिकेच्या स्वातंत्र्यार्थ प्रामुख्याने लढणारा व ह्या भूमीस ललामभूत झालेला वीरशिरोमणि **जॉर्ज वाशिंगटन** होय.

वाशिंगटनने आपले दूतकार्य चोख बजावलें. परंतु फ्रेंच लोकांनी त्यास धुडकावून लाविलें. तेव्हा त्याने परत येऊन आपल्या लोकाना सांगितलें की, ओहिओ प्रात तुम्हास हवा असेल तर तो तुम्हांस फ्रेंचांनां हाकलून देऊनच मिळविला पाहिजे. दुसरा उपाय नाही.

व्हर्जिनियाच्या लोकाना व ओहिओ कंपनीच्या सूत्रचालकांना हें भविष्य अगोदरच कळलें असल्यामुळें त्यांनी त्वरा करून ओहिओच्या उगमाचें प्रवेशद्वार गाठलें आणि तेथे एक दुर्ग उभारण्यास प्रारंभ केला. तें कार्य अर्धें अधिक झालें नाही तों फ्रेंच लोक धावून आले व त्यांनी तें स्थान काबीज करून इंग्लिशांना तेथून हाकलून दिलें. नंतर त्यांनी आरंभिलेला किल्ला पूर्ण करून त्यास 'डुकेन' असें तत्कालीन फ्रेंच गव्हर्न

राचें नांव दिलें. इ. स. १७५४ च्या प्रारंभालाच हा प्रकार घडला व तेव्हापासून अमेरिकेच्या भूमीवरील इंग्रज व फ्रेंच याचें चवथें व शेवटचें युद्ध चालू झालें. या युद्धात आता 'अमेरिकेचे स्वामी इंग्लिश की फ्रेंच ?' या प्रश्नाचा नक्की निर्णय करण्याचा निश्चय उभय पक्षानी आपल्या मनाशीं केला.

वाशिंगटनचे वय अल्प असताही त्यास त्याच्या दूतकार्यामुळें महत्त्व मिळूं लागलें होतें. त्या संधीचा त्याने फायदा घेऊन या नव्या युद्धात त्याने आत्मीयतेने लक्ष घातले. डुकेन किल्ल्यास शह देण्याकरिता त्याने त्याच्या दक्षिण दिशेस चाळीस मैलांवर 'नेसिसिटी' (आवश्यकता) या नावाचा एक नवा किल्ला झटपट बाधून काढला. परंतु तेथे त्याचेकडून योग्य लष्करी बंदोबस्त होण्याच्या आतच फ्रेंचानी त्याच्यावर हल्ला चढविला आणि वाशिंगटनचा पराभव करून त्यास तेथून हुसकून दिलें ! तात्पर्य, फ्रेंचानी ओहिओ खोऱ्यात तडाक्यासरशीं दोन विजय मिळवून ओहिओ कंपनीचें मनोराज्य धुळीला मिळविलें ! त्याबरोबर व्हर्जिनिया व तिच्या उत्तरेकडील इतर इंग्लिश वसाहती याच्यामध्यें विलक्षण खळबळ उडाली ! आतापर्यंत या वसाहतींमध्यें म्हणावा तसा सलोखा नव्हता पण या परक्या संकटाने त्यास सावध केलें. तात्काल त्यानी इ. स. १७५५ च्या सुमारास आलबनी गावीं आपली एक संमिश्र सभा बोलावली. बेंजामिन फ्रांकलनिसारखे धोरणी प्रतिनिधि जमल्यामुळें ती सभा यशस्वी झाली व संघशक्तीने फ्रेंचाचा प्रतिकार करण्याचें निश्चित झालें. असो.

इंग्लिश वसाहतींना फ्रेंचाचा हा उपसर्ग सुरू झाला असतां तिकडे इंग्लंडांत राजा व पार्लमेंट काहीशी सुस्तच होती. पण आता त्यानी इकडे लक्ष घातलें व जनरल ब्रॅडॉक नांवाच्या एका शूर सेनापतीस मोठ्या सैन्यासह अमेरिकेंत धाडिलें. वास्तविक ब्रॅडॉक सेनापति चांगला होता; पण मोठा घमंडनंदन ! उघड्या रणागणावरचा प्रसंग असता तर त्याने काही पराक्रम दाखवून फ्रेंचाचा फडशा पाडला असता; परंतु अमेरिकेंतील युद्धाची रीतच न्यारी होती. घनदाट जंगलांतील झाडीच्या आडून होणाऱ्या चोरट्या हल्ल्याचा प्रतिकार कसा करावयाचा, याचें ज्ञान ब्रॅडॉकला किंवा त्याच्या सैन्याला मुळींच नव्हतें. अशा स्थितींत त्याने आपलें

शहाणपण थोडें बाजूला ठेऊन जॉर्ज वाशिंगटन किंवा फ्राकलीन यांची मसलत ऐकावयास हवी होती. ती त्यास मोकळ्या मनाने व आनंदाने मिळाली असती व शिवाय इतर साह्य झालें असतें. परंतु ब्रॅडॉक साहेब पडले इंग्लंडहून आलेले राजमुद्रांकित सेनापति! त्याना वसाहतींतील वाशिंगटन सारख्या कच्च्या पोरांचें शहाणपण दिसावे कसें आणि दिसलें तरी रुचावें कसें ? त्यानी सल्लामसलत तर घेतली नाहीच उलट त्या स्वाभिमानी लोकांना तुच्छ लेखून त्याचा उपहास केला व नंतर कसलीही माहिती न घेतां एकदम ओहिओ खोऱ्यात प्रवेश केला. फ्रेंचांनी त्यास ड्युकेन किल्ल्यापर्यंत मजेंत येऊ दिले आणि नंतर त्यास अरण्ययुद्धाचा चमत्कार दाखविला! ब्रॅडॉकच्या सैन्यावर भोवतालच्या दाट झाडींतून पावसाच्या सरीप्रमाणें गोळ्यांचा वर्षाव होऊं लागला! हा अनर्थ पाहताच त्या प्रांताशीं अनभिज्ञ असलेला ब्रॅडॉक व त्याचें सैन्य गांगरून गेले. त्यांत ब्रॅडॉक एका गोळीला बळी पडला! इंग्रज सैन्याचा पुरता मोड झाला. यावेळीं पाठोपाठ वाशिंगटन आला म्हणून उरलेल्या सैन्याचा तरी निभाव लागला. नाहीतर त्या हत्याकांडांत एकही इंग्रज जिवंत राहता ना.

ब्रॅडॉकच्या पराभवामुळें इंग्रजाना ओहिओ खोऱ्याचा नाद कांही काल सोडून देणें भाग पडलें. मग त्यानी कॅनडा प्रांताकडे रोख धरला व नोव्हा स्कॉशिआच्या पश्चिमेकडील ब्रन्सविक प्रदेश काबीज करून ओहिओ खोऱ्यातील पराभवाचें उट्टें काढले! पुढे इ. स. १७५८ पर्यंत हें युद्ध रेंगाळतच चाललें. पण तोंपर्यंत इकडे युरोपांत इतिहासप्रसिद्ध सप्तवार्षिक युद्ध ( इ. स. १७५६ ते ६३ ) सुरू होऊन त्यास रंग चढत चालला होता व हिंदुस्थानांत इंग्रज–फ्रेंचांची चुरस हातघाईवर आली होती. अशा संधीला इंग्लंडमध्ये राज्यकारभाराचीं सूत्रें विल्यम पिट या तडफदार मुत्सद्याच्या हातीं आलीं होतीं. पिटला अमेरिकन वसाहतींविषयीं फार जिव्हाळा वाटत होता. अधिकारप्राप्ति होतांच त्याने तिकडे लक्ष दिलें आणि त्यांच्या साह्यार्थ कमालीचे प्रयत्न केले. त्याबरोबर कांहीशा निराश झालेल्या अमेरिकन इंग्रजाना नवें तेज चढलें. त्यांनी पुन्हा जोर धरला. लुईजबर्ग किल्यावर त्यांनी पुन्हा हल्ला चढविला व अल्पावकाशांत तो काबीज केला. या विजयाने प्रत्येक वसाहतवाल्याचें रक्त नव चैतन्याने सळसळूं लागलें. इकडे ओहिओ खोऱ्यांतील 'डुकेन'

व ' नेसिसिटी ' या दुर्गावर वाशिंगटन लक्ष लावून बसलाच होता. त्यास आर्मस्ट्रॉंगसारख्या मुरलेल्या इंग्लिश सेनापतीची जोड मिळतांच त्याने वरील किल्ल्यावर नवीन हल्ले चढविले. उभयपक्षीं तुंबळ युद्ध झालें. शेवटीं त्यांत फ्रेंचांचा पराभव झाला व त्यांना तेथून पळ काढावा लागला. ओहिओचें प्रचंड खोरें इंग्लडच्या मालकीचें झालें. डयुकेन किल्ल्याचें नांव पिटच्या सन्मानार्थ पिटस्बर्ग असें ठेवण्यात आलें. व्हर्जिनियावासी लोकाचा आनंद गगनास पोचला.

याच सुमारास न्यूयॉर्क, मासाच्युसेट्स, कनेक्टिकट इत्यादि वसाहतींनाही वीरश्री चढली. त्यांनीही आपले हजारो शूर नागरिक या युद्धाकरितां तयार केले आणि ज्या इंडियन जाती त्यांच्या स्नेहातल्या होत्या त्यांचीं पथकें उभारलीं. नंतर या बलावर फ्रेंचाचीं ठाणीं हस्तगत करण्याचा सपाटा सुरू झाला. फ्रेंचाच्या स्वामित्वाखालचे बहुतेक महत्त्वाचे किल्ले काबीज झाले. फ्रेंचाचें दुर्भाग्य आता पुरें ओढवल्याचें स्पष्ट दिसू लागलें. तरी पण त्यांना अद्यापिही एक प्रबल आशा होती. यावेळीं त्यांच्यामध्यें मॉटकाम नांवाचा अत्यंत शूर, धैर्यशील, कष्टसहिष्णु, उद्योगी व जबर आशावादी असा सेनापति होता. आतापर्यंत त्याने चालू युद्धांतच इंग्रज सेनेचा अनेकदा पराभव करून आपले युद्धनैपुण्य सर्वांच्या निदर्शनास आणिले होतें. तेव्हा त्याच्या प्रभावाने आपण अद्यापीही यशस्वी होऊं अशी फ्रेंचाना मोठी आशा होती. खुद्द मॉटकाम मात्र अंतिम यशाविषयीं साशंक होत चालला होता. परंतु ही व्यथा बाहेर न दर्शविता त्याने क्वेबेकचा प्रचंड व दुर्भेद्य किल्ला आमरणान्त लढविण्याचें ठरविलें. जगामध्यें जे नामांकित लढाऊ किल्ले आहेत, त्यांत क्वेबेक किल्ल्याची गणना होते. सेंटलॉरेन्स नदीच्या विशाल मुखाकडे पाहात हा एका भव्य व अभेद्य खडकावर उभा आहे. त्याच्या बलाढ्य स्वरूपामुळेच त्यास ' जिब्राल्टर ऑफ अमेरिका ' असे म्हणतात. अमेरिकन फ्रेंचाचें सारें बल व सारी आशा आता या किल्ल्यावर स्थिरावली होती. पण त्याच्या हातीं तो तसाच राहू देणें इंग्रजांना इष्ट नव्हतें. म्हणून त्यानी आपला मोर्चा तिकडे वळविला. मॉटकामच्या तोडीला तोड असा एक सेनापति इंग्रजांच्याकडेही होता. हा जनरल वूल्फ होय. याने चालू युद्धात अनेक ठिकाणीं चांगलें शौर्य गाजविलें होतें. त्याच्याकडे क्वेबेकचा गड काबीज करण्याची जबाबदारी

सोपविण्यांत आली. वास्तविक वूल्फ हा युद्धाच्या दगदगीने बराच आजारी होता. असें असतांही स्वदेशाने सांगितलेली ही कामगिरी त्याने आनदाने पत्करली आणि इ. स. १७५९च्या जूनमध्यें तो या स्वारीवर निघाला. वूल्फचा वेढा पडूं नये म्हणून मॉटकामने पुष्कळ धोरण राखलें. परंतु त्याचा फारसा उपयोग न होता वेढा पडला ! चार मास उभयपक्षीं झटापट चालली. मॉटकाम व वूल्फ आपआपली इभ्रत पणाला लावून झगडत राहिले. परिस्थिति बिकट होऊं लागली व दोन्ही पक्ष जिकिरीस येऊन फिकिरीत पडले ! अंतिम निर्णय काय हें कोणालाच उमजेना; पण मॉटकामने मात्र जाणलें की, आज ना उद्या विजयश्री इंग्रजाच्या गळ्यांत माळ घालणार ! त्याचें अवसान हळूहळू सुटत चाललें व अशा स्थितींतच एके दिवशीं तो रणक्षेत्रात हिंडत असतां एक गोळी येऊन त्याच्या मर्मी लागली ! तो मरणोन्मुख होऊन धरणीवर पडला व फ्रेंचांचा धीर सुटला. मरणापूर्वी मॉटकामने युद्ध पुढे कसें चालवावयाचे हें आपल्या सहकाऱ्याना समजाऊन सागितलें आणि "क्वेबेक पडण्यापूर्वी मला मरण येत आहे, ही परमेश्वराची त्यांतले त्यात कृपा !" असे शब्द उच्चारून त्याने आपला देह ठेवला !

इकडे याच सुमारास आजाराने व निराशेने खंगून गेलेला वूल्फ विजय मिळविण्याची शेवटची लगट करीत असता जखमी झाला व खाली कोसळूं लागला. त्याबरोबर त्याने आपल्या जवळच्या मनुष्यांस ओरडून म्हटले, " मला सावरा ! मला सावरा !! आणि मी पडलों ही वार्ता माझ्या सैन्यांत फोडूं नका. " इतक्यात " ते पळूं लागले ! पहा ! ते पळूं लागले !! " असा कल्लोळ उडाला ! डोळ्यात प्राण आलेल्या वूल्फची दृष्टि भयचकित झाली. त्याने ओढलेल्या स्वरांत विचारिलें, " कोण पळाले ? इंग्रज ?—" उत्तर आलें, " नाही फ्रेंच ! क्वेबेक पडलें ! " वूल्फच्या नेत्रात आनंदाश्रु आले. त्याने परमेश्वराचें स्मरण केलें आणि " आता मी सुखाने मरतों ! " असें म्हणून प्राण सोडले ! इंग्रजाना विजय मिळाला पण त्याचा शूर सेनापति गेला ! फ्रेंच लोकांवर तर काय ईश्वरच कोपला ! त्याचा हिरा हरपला व कंठमणि गळून पडला !

फ्रेंचाची धूळधाण उडून क्वेबेक पडल्याची वार्ता वसाहतीमध्ये व इंग्लडात पसरताच प्रत्येक इंग्रजास धन्यता वाटली व जिकडे तिकडे

आनंदी आनंद उडाला. यानंतर अमेरिकेतील इंग्रज-फ्रेंचाचें भांडण पुढे चार वर्षे रेंगाळले ! पराभूत फ्रेंचानी पोंट्याक नावाच्या इंडियन जातीला इंग्रजांविरुद्ध उठवून सूड घेण्याचा प्रयत्न केला; पण त्याचा विशेष उपयोग झाला नाही. इंग्रजानी त्या दोघांचें पुन्हा चागले काडात काढलें. इ. स. १७६३ मध्यें युरोपातील 'सप्तवार्षिक युद्ध' संपलें. त्याबरोबर सर्व राष्ट्रात तह घडून आले व सर्वांनी आपआपलीं शस्त्रास्त्रें खाली ठेवलीं ! या नव्या तहाप्रमाणें फ्रेंचांना कानडासुद्धा सारी अमेरिका इंग्लिशाच्या स्वाधीन करावी लागली ! स्पेनने फ्रेंचाचा पक्ष घेतला होता. त्यांनाही फ्लोरिडा वसाहत इंग्रजाना देऊन प्रायश्चित्त भोगावें लागले ! काय दैव आहे पहा ! ज्या फ्रेंचाचे स्वाधीन बहुतेक सारी उत्तर अमेरिका होती; त्यानाच आता त्या भूमीवर स्वतःची अशी तसूभर जागा राहिली नाही व एवढ्याशा जागेत येऊन बसलेले इंग्रज एकदम त्या भूमीचे एकमात्र स्वामी झाले ! फ्रेंचाच्या या महदपयशानें खरोखरच सकृद्दर्शनीं सखेदाश्चर्य वाटते. परंतु तत्कालीन इंग्रज-फ्रेंचाच्या गुणावगुणांची छाननी केल्यावर पहिल्यास यश व दुसऱ्यास अपयश का आलें याचा उलगडा पडतो. फ्रेंचानी पाण्यासारखे रक्त व धन साडून अमेरिका पादाक्रात केली; पण ती साभाळून ठेवण्याची दूरदृष्टि दाखविली नाही. आणि म्हणून प्रसग पडताच त्याना तिला मुकावे लागले. रानटी लोकांना ख्रिस्ती बनवून त्याना सुसंस्कृत करण्याचें अव्यवहार्य ध्येय त्यांनी डोळयापुढे ठेवल्यामुळें त्यांचें बल, धन, रक्त व वेळ अनाठायीं खर्ची पडला आणि त्यामुळें आक्रमण केलेला प्रदेश आपल्या लोकाकरवी आबाद करण्याचा महत्त्वाचा व्यवहार त्याना साधतां आला नाही. परिणाम असा झाला की, अमेरिकेच्या भूमीवर युद्धाचा प्रसंग येताच त्याचे संख्याबल तोकडें पडलें. ज्या वेळीं त्याचें व इंग्रज वसाहतवाल्याचे शेवटचे युद्ध सुरू झालें, त्या वेळीं अमेरिकेंतील इंग्लिश प्रजा ११ लक्ष ६० हजार होती तर फ्रेंचाची ८० हजाराच्या पुढे गेली नव्हती. इंग्रज एकमेकांच्या जवळ दाटीवाटीने वसत गेले होते तर फ्रेंच अफाट प्रदेशावर थोडे थोडे विखुरलेले होते. इंग्रजाच्या वसाहती स्वातंत्र्यप्रिय अशा सामान्य परंतु स्वाभिमानी लोकानी वसविल्या होत्या तर फ्रेंचाच्या राजदरबाराकडून दरबारी थाटाच्या लोकानी बनविल्या होत्या. इंग्रज वसाहत-

वाल्याना अमेरिका हें आपलें वंशपरंपरा चालणारें वतन आहे अशी आत्मीयता उत्पन्न झाली होती तर फ्रेन्च लोकांना तेथे कसलेंच स्वत्व वाटत नव्हतें. इंग्लिश वसाहतींमध्यें लोकसत्तेचीं व धर्मस्वातंत्र्याचीं बीजें प्रारंभापासून रुजत गेलीं होतीं तर फ्रेंच वसाहतींमध्यें त्याचा मागमूसही नव्हता. इंग्लंडहून इंग्रजांच्या मालकीची जहाजें अमेरिकेच्या किनाऱ्यास येण्यास अवघा सव्वा महिना पुरत होता तर फ्रान्सच्या किनाऱ्याहून निघालेलीं फ्रेंचांचीं जहाजें कानडा प्रांताच्या किनाऱ्यास लागण्यास सहा सहा महिन्यांचा अवधि लागत होता. अमेरिकन इंग्रजामध्यें शिस्त, संघटना, एकजूट, प्रामाणिकपणा, दूरदृष्टि, कर्तव्यनिष्ठा, स्वदेशाभिमान व परस्पर बंधुभाव इत्यादि राष्ट्रसंवर्धक गुण प्रामुख्याने दिसून येत होते तर अमेरिकन फ्रेंचांमध्यें त्यांचा पुष्कळच अभाव होता. या अशा फरकामुळेंच फ्रेंचांचें अरण्यस्वामित्व अरण्यरुदनाप्रमाणेंच फोल ठरलें ! साम्राज्य मिळविण्याची धडाडी व त्याकरिता लागणारा पराक्रम फ्रेंचांच्या अंगीं होता; पण ते सांभाळून ठेवण्यास लागणारें धिमेपण व संघटनाचातुर्य मात्र नव्हतें. यामुळें ध्येयवादी फ्रेंचांपेक्षा व्यवहारनिपुण इंग्रज श्रेष्ठ ठरला ! पहिल्याने शह दिला पण दुसऱ्याने मात केली ! हिंदुस्थानात मराठ्यांनी नाही का आपलें केवढें मोठें साम्राज्य स्थापलें ! पण बुद्धिबलाचा प्रश्न येताच त्यांना त्याचें उदक इंग्रजांच्या हातावर सोडावें लागलें ! अमेरिकेंतील फ्रेंचांच्या प्रयत्नांत जीं व्यंगें दिसून आलीं तशाच तऱ्हेचीं व्यंगें पुष्कळ अंशाने मराठी सत्तेच्या नाशास कारणीभूत झालीं. म्हणूनच दोन्ही ठिकाणीं अखेरचा डाव इंग्रजांनी जिंकला.

---

## प्रकरण सोळावें

# तत्कालीन लोकस्थिति व जीवनक्रम

अमेरिकेच्या भूमीवरून फ्रेंच सत्तेचें उच्चाटन व त्याबरोबरच तेथील रानटी लोकांचें पूर्ण दमन झाल्यामुळें वसाहतींच्या उत्कर्षमार्गांतील एक फार मोठें संकट दूर झालें म्हणण्यास हरकत नाही. कोणतेंही संकट

निवारण झालें म्हणजे, जाताना तें काही शहाणपण देऊन जातें किंवा काही कल्याणप्रद गोष्टी घडवून आणितें म्हणतात. अमेरिकन ( यापुढे वसाहतवाल्याना याच नावाने संबोधूं ) लोकांचे वरील राष्ट्रीय संकट असेंच मोठे हितपरिणामी झाले. पहिला परिणाम असा दिसून आला की, वसाहती-वसाहतीमध्यें परस्पराविषयींचे जे काही गैरसमज किंवा कलुषित भावना होत्या, त्यांची तीव्रता झपाट्याने कमी झाली व तितक्याच प्रमाणात त्यांचे स्नेहसंबंध वाढू लागले. दुसरी गोष्ट अशी घडून आली की, पहिल्यापासून रानटी लोकांशीं झगडा व नंतर फ्रेंचासारख्या शत्रूशीं सतत तीन पिढ्या युद्ध करावे लागल्यामुळें लष्करी शिक्षणाचें महत्त्व सक्ती न करता लोकाना समजले व त्यामुळें प्रत्येक अमेरिकन स्वभावत:च निर्भयवृत्तीचा सैनिक बनला. तिसरी एक महत्त्वाची गोष्ट अशी घडून आली की, अमेरिकेच्या भूमीवर पुन:पुन्हा त्रास देईल असा शत्रु न राहिल्यामुळें व दीर्घकालीन युद्धानुभवामुळें, आपण स्वसंरक्षण-क्षम आहों, आपणास इंग्लंडच्या किंवा दुसऱ्या कोणाच्या साह्याची किंवा रक्षणाची विशेष आवश्यकता नाही, असा आत्मविश्वास अमेरिकन लोकात निर्माण झाला आणि चवथी मोठ्या लाभाची गोष्ट अशी घडली की, आलेघानी पर्वताच्या पलीकडील विपुल सुपीक भूमि नवीन वसाहती स्थापण्याकरिता अमेरिकनांच्या स्वामित्वाखाली आली. तात्पर्य, नव-जात राष्ट्रास अत्यंत पोषक व प्रोत्साहक असेच हे परिणाम असल्यामुळें त्या लोकांच्या एकंदर जीवनक्रमात व एकदर परिस्थितींत मोठेंच अतर पडलें व त्याना एक नवीनच वळण लागले. असो.

खरें म्हणजे स्थापन झालेल्या तेरा संस्थानाना एकजीव होण्यास हा काळपर्यंत संधीच मिळाली नव्हती. प्रत्येकाची स्थापना व रचना भिन्न कालीं, भिन्न लोकांकडून व भिन्न उद्देशाने झाली असल्याने त्यांच्या-मध्यें एकसूत्रीपणा जमून येणें कठीणच होतें. भौगोलिक दृष्ट्या तीन गट मात्र प्रारंभालाच पडले. पहिला गट 'न्यू इंग्लंड'चा उर्फ उत्तरेक-डील संस्थानांचा. यांत मासाच्यूसेट्स, कनेक्टिकट, ऱ्होड आयलंड व न्यू हॅमशायर. दुसरा गट मध्यवर्ती संस्थानांचा. यांत व्हर्जिनिया, न्यूयॉर्क, न्यूजर्सी, पेनसिल्व्हानिया, डेलावेअर व मेरी लँड आणि तिसरा गट दाक्षिणेकडील संस्थानांचा. यांत उत्तर व दक्षिण कॅरोलिना व जॉर्जिया.

अशीं संस्थानें सामील झालीं. भिन्न प्रकृति व भिन्न वय यामुळें प्रत्येक संस्थान स्वतंत्रपणें वाढत गेलें. कोणामध्यें विचारस्वातंत्र्य व बुद्धिबल तर कोणांत कृषिचातुर्य व धनवत्ता, कोणात व्यापारी कौशल्य व हिशेबीपणा तर कोणांत धर्मनिष्ठा व साधुवृत्ति अशा भिन्नभिन्न गुणांचा उत्कर्ष होत गेला. परिणाम असा झाला की, एकजुटीचा काल प्राप्त होतांच प्रत्येकाचा विशेष गुण इतरांना पूरक होऊन सर्वांचेच बल वाढलें आणि इ. स. १७६३ नंतर सर्वांचें भाग्य एकसूत्रात येऊन सर्वांचा उन्नतिमार्गही एकच झाला. या कालीं अमेरिकनांची लोकसंख्या तेरा लक्षांपर्यंत व त्यांनी विकत घेऊन पाळलेल्या निग्रो गुलामांची संख्या अडीच लाखांपर्यंत असावी. गुलाम पाळण्याची प्रथा सर्व संस्थानांतून रूढ झाल्यामुळें व ते दुर्दैवी लोक अल्पमोली पण बहुगुणी असल्यामुळें, अमेरिकेच्या भूमींत त्यांची आय सारखी वाढत होती. दक्षिणेकडील संस्थानात त्यांची खरेदी विक्री मोठ्या प्रमाणात होत असे. शेतीचीं जनावरें व औतें यांमध्येंच गुलामांची जमा असल्यामुळें मनुष्य या नात्यानें त्यांना कसलेंच महत्त्व किंवा अस्तित्व नव्हतें. म्हणून अमेरिकनांच्या शिरगणतीत त्यांचा समावेश कधीच केला जात नसे. युरोपियन वंशाचा व गौरवर्णाचा तोच अमेरिकन नागरिक होऊं शके किंवा समजला जाई.

या वसाहती नांवारूपाला आणण्यास इंग्लिश लोकांबरोबर युरोपांतील इतर गोऱ्या जातींचे प्रयत्न कारणीभूत झाले असले व त्यांच्याच संकराने अमेरिकन लोकांचा उद्भव झाला असला तरी त्यांच्या रक्ताचा मुख्य व खरा संबंध इंग्लंडशीं होता. तीन चतुर्थांश वसाहतींचा सूत्रपात इंग्रज लोकाकडून झाला असल्यामुळें इतर गौरकायांपेक्षा ते प्रभावी ठरले यात नवल तें काय ? इंग्रजांच्या आधिक्यामुळेंच वसाहतींतील राज्यकारभार, लोकांच्या चालीरीति, खाणें पिणें, शिष्टाचार, पोषाखाची तऱ्हा, इत्यादि सर्व गोष्टी इंग्लिश वळणावर गेल्या. अनेक भाषांचे लोक एकत्र आले असतांही व्यवहारांत व राज्यकारभारात इंग्रजी भाषा प्रमुख ठरली. अशा प्रकारें तें उगवतें तेरा संस्थानी राष्ट्र इंग्लंडच्या छायेखाली गेलें असलें तरी तेथील रहिवासी स्वतःला अमेरिकन म्हणवून घेण्यांत अभिमान बाळगूं लागला. तेथे कायमची वस्ती करण्यास आलेलें मनुष्य किंवा कुटुंब कोणत्याही पंथाचें किंवा जातीचें असो, तें त्या भूमींत

येतांच तिच्याशीं पूर्णत्वाने मिसळून जाऊं लागलें. त्याचें स्वदेशप्रेम व अभिमान तिच्याशीं निगडित होऊं लागला. युरोपांत चालू असलेल्या धार्मिक व राजकीय अन्यायानी गांजलेले लोकच या भूमींत आश्रयास येत असल्यामुळे व ती सर्वांना भरपूर उदार आश्रय देण्यास समर्थ असल्यामुळें जुन्या रहिवाश्याना नवीन पाहुण्याविषयीं कधीच दुजाभाव वाटला नाही. उलट प्रत्येक संस्थानांतील प्रत्येक नागरिक अशा दुःखहत नवागताचें सप्रेम स्वागत करण्यास, त्यास धीर देण्यास व त्याच्या आश्रयाची सुखसोय लावून देण्यास सदैव तयार असे. यामुळें परस्पर प्रेम व सहानुभूति याचा उगम तेव्हाच होई व उच्च प्रतीचा शेजारधर्म नांदूं लागे.

वसाहतींतील बहुतेक लोकाचा धर्म प्रॉटेस्टंट होता. त्यात सर्वांना परमतसहिष्णुतेचे महत्त्व हळूहळू पटत गेल्याने धर्मकलह निर्माण होण्याचें कारण राहिले नाही. गैरसमजामुळें व धर्मभोळेपणामुळे प्रथम काही काल मधून मधून अशीं वादळें उठलीं; परंतु तीं अनर्थावह होण्यापूर्वीच निमालीं. बाकीची सर्व परिस्थिति अनुकूलच असल्यामुळे सर्वांचा गुणसमुच्चय राष्ट्राचा पाया दृढ होण्यास उपयोगीं पडला आणि त्यांतून अमेरिकन राष्ट्र जोमाने वर येऊं लागलें.

त्या कालीं अमेरिकन लोकाचा उपजीविकेचा प्रमुख व्यवसाय शेतीचा होता. भूमि अशी वरदायिनी होती की, जो तिच्या सेवेस लागेल तो सुखी व्हावयाचाच. अवाढव्य जमिनी मिळण्याची सोय व अल्पमोली गुलामांचे काबाडकष्ट या जोडगोळीने अमेरिकन शेतकरी अल्पकाळात व श्रमात सुखी व सधन बनत होता. तंबाकू, तांदूळ, नीळ, गहू, मका, बटाटे, इत्यादि पिकें भरमसाट येत व त्याना युरोपच्या पेठेंत चांगलीच मागणी असे. यामुळे अमेरिकन शेतकऱ्यास कसलीच कमतरता पडत नसे. देशात शेतकरी सुखी असला म्हणजे इतर उद्योगधंदे व व्यापार यांचीही भरभराट स्वाभाविक होत जाते. त्या बाबींतही अमेरिका मोठी भाग्यवान होती. शेतात निर्माण झालेले वरील पदार्थ व शिवाय लोखंड, लोकर, मासे, डाबर, टरपेन्टाईन, इमारतीचें लाकूड व इतर सटर फटर माल याचा मोठा व्यापार अमेरिकेंतून इतर देशांशीं होत असे. ज्याकरितां अमेरिकेंतील वसाहतीची पहिली मुहूर्तमेढ रोवली गेली, तो जहाजें बांधण्याचा धंदा तर इतका वाढला की, त्याच्यापुढे

इंग्लंडांतील तो धंदा डबघाईला आला व त्यात पडलेल्या लोकांना स्वसंरक्षणार्थ पार्लमेंटला शरण जावे लागले. वसाहतींतून परस्पराचा अंतर्गत व्यापार मात्र फारच बेताचा होई. अरण्यमय प्रदेशामुळें दळण-वळण वाढविण्याचीं साधनें अत्यल्प होतीं; शिवाय या बाबतीत इंग्लंड-कडून मोठीं चमत्कारिक बंधनें वसाहतींवर लादण्यात आलीं होतीं. पक्का माल तयार करण्याच्या संबंधातही वसाहती विशेष स्वतंत्र नव्हत्या आपले उद्योगधंदे बुडूं नयेत म्हणून इंग्लडने--पण यासंबंधींचा विस्तृत विचार आपण पुढच्या प्रकरणांत करूं. तूर्त अमेरिकन लोकाच्या इतर जीवन-क्रमाविषयीं पाहूं.

सर्वसामान्य अमेरिकनाचा मुख्य व्यवसाय शेती असल्यामुळे व इतर व्यवसायाची फारशी वाढ झाली नसल्यामुळें त्या कालीं वसाहतींतून नगरांपेक्षा खेड्याचीच संख्या विशेष होती. ज्याची लोकसंख्या वीस हजा-राच्या आत बाहेर आहे अशीं शहरें तेराही संस्थानात अवघी चार होतीं. पेनसिल्व्हानियात फिलाडेलफिया, मासाच्युसेट्समध्यें बोस्टन, न्यूयॉर्क-मध्यें न्यूयॉर्क आणि कॅरोलिनामध्यें चार्लसटन. पैकी राजकारणांत बोस्टन, बंदर या नात्याने न्यूयॉर्क, विद्येचें माहेरघर म्हणून फिलाडेलफिया व व्यापारांत चार्लसटन सर्वांत पुढे होतें. बाकी मग सर्वत्र खेडींच खेडीं. तेथील शेतकऱ्याच्या गरजा साध्या असल्यामुळें व त्या तेथल्या तेथेच भागण्यासारख्या असल्यामुळें त्याचें परस्पर दळणवळण कारणापुरतें घडे. प्रवास करण्याचा प्रसंग क्वचित् प्राप्त होई व तो लांबचा असल्यास मोठें दिव्यच असे. टपाल येण्याजाण्याची व्यवस्था होती, पण ती भिकार, धोक्याची व महाग असे. यामुळे पत्रव्यवहारही बेताबाताचा घडून येई. काही शेतकरी उर्फ मळेवाले अत्यंत श्रीमान होते. त्या मानाने काही अगदी दरिद्रीही होते. परंतु याचें प्रमाण अल्प. सधन व सुखी शेत-कऱ्यांचें प्रमाण सर्वांत मोठें. नगरांतील लोकांना छानछोकीपणा किंवा चैन यांची थोडीशी ओळख झाली होती. खेड्यातील शेतकऱ्यांचा जीवनक्रम कष्टाळूपणाचा, साधा, आरोग्यप्रद व समाधानाचा होता.

बहुतेक लोक खेड्यांत राहात असले व शेतीच्या व्यवसायांत गुंत-लेले असले तरी त्यांच्याकडून किंवा वसाहतीचा कारभार पाहणाऱ्या सर-काराकडून शिक्षणाची हेळसांड मात्र मुळीच झाली नाही. प्रत्येक खेड्यास

जसें चर्च असेच असे, तशीच शाळाही पण असे. इ.स. १७६३ पर्यंत अमेरिकेंत दोन विश्वविद्यालयें व पाच विद्यालयेंही स्थापन झालीं होतीं. यावरून तेथील जनता आपल्या बालप्रजेच्या शिक्षणाविषयीं किती जागरूक होती, हें सहज कळण्यासारखें आहे. याशिवाय लोकशिक्षणाची प्रमुख अंगें म्हणजे मुद्रणालयें, वर्तमानपत्रें व मासिकें, ग्रंथालयें, इत्यादि. तर या सोयीही आवश्यकतेनुसार होत गेल्या. प्रथम काही छापखाने निघाले. नंतर इ.स. १७०४ मध्यें बोस्टनशहरीं 'बोस्टन न्यूज लेटर' नांवाचें पहिलें साप्ताहिक प्रसिद्ध होऊं लागलें. तेव्हापासून अनेक स्थानीं छापखाने व वर्तमानपत्रें निघत चाललीं. त्या कालचा प्रसिद्ध अमेरिकन बेंजामिन फ्रांकलिन यानेही एक छापखाना काढला होता व तेथून तो आपलें प्रसिद्ध पत्रक *Poor Richard's Almanac* हें काढीत असे. यानेच सार्वजनिक पुस्तकालयें व फिरतीं वाचनालयें स्थापण्याची खटपट केली व ती यशस्वी करून दाखविली. अमेरिकन राष्ट्र भक्कम पायावर उभारलें जाण्यास या साधनाचा चांगला उपयोग झाला. असो.

तेराही वसाहतींचा राज्यकारभार थोडाफार लोकमतानुसार असला तरी त्यात एकवाक्यता नव्हती. या बाबतीत वसाहतींचे बनाव तीन तऱ्हेचे झाले होते. कांही वसाहती राजाच्या खास मालकीच्या होत्या. म्हणून त्यांना 'रॉयल कॉलनीज' म्हणत. याचेवर मुख्य गव्हर्नर इंग्लंडकडून पाठविला जाई व इतर अधिकारीही इंग्लंडतर्फेंच नेमले जात. व्हर्जिनिया, न्यूयॉर्क, कॅरोलिना, जॉर्जिया, इत्यादि वसाहती 'राजाकित' (रॉयल) होत्या. दुसऱ्या कांही वसाहती लोकानी राजाकडून सनदा मिळवून स्थापिल्या होत्या. त्याना 'सनदी वसाहती' (चार्टर्ड कॉलनीज) म्हणत. मासाच्युसेट्स, ऱ्होड आयलंड, इत्यादि वसाहती सनदी होत्या. यांचा कारभार तेथील लोकांकडून चालविला जाई. आणखी इतर वसाहती काही धनाढ्य लोकांनी स्वत्वाधिकार मिळवून निर्माण केल्या होत्या. त्यांना 'खासगी मालकीच्या वसाहती' (प्रोप्रायटरी कॉलनीज) म्हणत. विल्यम पेनने स्थापिलेली 'पेनसिल्व्हानिया' किंवा लॉर्ड बाल्टिमोर याने अस्तित्वांत आणिलेली 'मेरीलँड' या वसाहती या धर्तीच्या होत. यांचे कारभार त्यांच्या मालकांच्या मर्जीप्रमाणें चालत.

अशा भिन्नतेमुळें सर्वांचे कारभार भिन्न स्वरूपाचे व विस्कळीत होते. प्रमुख कायदेकानू मात्र इंग्लंडमध्यें चालू असलेले होते. इंग्लिश नागरिकाचे सर्व हक्क व सवलती अमेरिकन नागरिकास देण्यांत आल्या होत्या. प्रत्येक वसाहतीला कायदे रचणारें लोकनियुक्त मंडळ नेमण्याचा अधिकार होता. परंतु सर्वांची गुरुकिल्ली मात्र इंग्लंडमधील पार्लमेंटच्या हातीं होती. यामुळें सर्व वसाहतींचें भाग्य इंग्लंडच्या मर्जीवर अवलंबून होतें. ही महत्त्वाची गोम किंवा उणीव अमेरिकन लोकांच्या लक्षात आली नव्हती असें नाही; परंतु त्याच्या स्वाभिमानाला किंवा ऐहिक उत्कर्षाला ती अद्यापि हानिकारक झाली नसल्यामुळें इंग्लंडचें स्वामित्व मानणें त्यांना कमीपणाचें वाटत नव्हते.

अशा प्रकारे अमेरिकन राष्ट्राचा तोंडावळा इंग्लंडप्रमाणें असतां त्याचा आत्मा मात्र तसाच नव्हता. त्यांच्यामध्यें राजनिष्ठा होती; पण त्याच्याच तोडीला स्वातंत्र्येच्छाही अशी बलवत्तर होती की, दुसरीला एवढासा धक्का लागला तर पहिली पटकन् मरावी. त्यांच्यामध्यें बुद्धि, श्रीमती, पराक्रम, शौर्य, धैर्य, इत्यादि गुणानी मंडित अशीं माणसें कितीतरी होतीं; पण त्याबरोबर जन्मजात उमरावी किंवा पदव्या यांचें बंड मुळीच नव्हते. त्याच्यामध्यें विद्वान पाद्री (उपदेशक) पुष्कळ होते; पण 'बिशप' (धर्माधिकारी) एकही नव्हता. थोडक्यात सागावयाचें म्हणजे जन्मजात श्रेष्ठकनिष्टपणास अमेरिकेत एवढासाही मान नव्हता. उलट त्याचा कल समता, बंधुता व स्वतंत्रता या उदात्त व अभिनव तत्वांकडे सर्वस्वीं झुकत चालला होता. यामुळें कालौघाबरोबर तें राष्ट्र हळूहळू एकजीव होत चाललें होते असो.

कोणत्याही राष्ट्रातील सर्वसामान्य प्रजेला स्वास्थ्य व समाधान लाभू लागलें म्हणजे त्यास उत्कर्षास चढविणारीं अनेक मानवरत्नें तेथे मोठ्या प्रमाणावर निर्माण होऊं लागतात. जनता शात,समंजस व सहानुभूतिपूर्ण असते. लोकनायक निःस्वार्थी, सच्छील, कर्तव्यतत्पर व गुणग्राहक असतात तर अनुयायीही आज्ञाधारक, विश्वासू, एकजुटीने राहणारे व नायकाच्या शब्दाकरितां स्वप्राणांवर उदार होऊन झगडणारे असे असतात. त्या कालीं अमेरिका अशा सुंदर व बलवर्धक स्थितींत होती. कितीतरी थोर थोर पुरुष त्या वेळीं पुढे आले. सर्वांत

प्रमुख जॉर्ज वाशिंगटन होय. याचें कुल प्रतिष्ठित व राजमान्य होतें. वाशिंगटनचा पणजा सकुटुंब अमेरिकेंत इ. स. १६५७ मध्यें गेला व व्हर्जिनिया वसाहतींत स्थाईक झाला. येथे आल्यावर हें घराणें चांगलें उदयास आलें व धनाढ्य लोकात त्याची गणना होऊं लागली. इ. स. १७३२ मध्यें जॉर्ज वाशिंगटनचा जन्म झाला. याचे शाळेंतील शिक्षण बेताचेंच झालें; पण आरोग्य, बल, खेळाडू वृत्ति, शौर्यधैर्य, सत्यनिष्ठा, तेजस्विता इत्यादि गुणानी तो सर्वश्रेष्ठ होता. कोवळया तारुण्यातच याने भूमिनिरीक्षकाची नोकरी पत्करली व ती त्यास फार मानवली! खांद्या-वर बंदूक टाकून निर्भय मनाने अरण्यातून संचार करण्यात वाशिंगटनला मोठी हौस वाटे. या वनसंचारामुळें सिंहाचे गुण त्याच्यामध्यें उतरले व पुढे तो स्वराष्ट्राच्या स्वातंत्र्ययुद्धात नरसिंह बनला! डिनविडी गव्हर्नराचे दूतकार्य यानेच हातीं घेतले होतें. तेव्हापासून तो सार्वजनिक कार्यात भाग घेऊं लागला. आपल्या सत्यनिष्ठेने तो आपल्या राष्ट्रास अत्यंत आवडता झाला व प्रसंग पडताच लोकांनी त्यास आपले प्रमुख नेमिले.

याच तोडीचा दुसरा पुरुष म्हणजे बेंजामिन फ्राकलिन होय. इ. स. १७०६ साली याचा एका धर्मनिष्ठ परंतु गरीब कुलात जन्म झाला. याचेंही शिक्षण साधारणच झालें; पण आत्मसंयमन, उद्योग-शीलता, नियमितपणा, टापटीप, निःस्पृहता आणि आशावादित्व याही गुणेंकरून त्याने कीर्ति व संपत्ति, लोकमान्यता व जगद्मान्यता मिळ-विली! जॉर्ज वाशिंगटन हा अमेरिकेचे हृदय म्हटल्यास बेंजामिन फ्रांक-लिन हा त्या राष्ट्राचें मस्तक होते असें म्हणण्यास हरकत नाही.

या दोन थोर पुरुषाप्रमाणेंच साम्युएल आडाम्स, जेम्स ओटीस, हेन्री पॅट्रिक, रिचर्ड ली, जॉन आडाम्स, हाकॉक, टॉमस पेन, जेफरसन इत्यादि पुरुषही मोठे नावाजण्यासारखे होते. त्या प्रत्येकांत एक विशिष्ट सद्गुण प्रकर्ष पावला असल्यामुळें अमेरिकेने लढविलेल्या स्वातंत्र्ययुद्धात या सर्व लोकांचा अत्यंत उपयोग झाला आणि सर्वांच्या एकजुटीने राष्ट्राचें उद्दिष्ट सफल झाले!

आता प्रश्न असा उद्भवतो की, इंग्लंडच्या आधिपत्याखाली जन्मास आलेल्या व संवर्धित झालेल्या या तेरा वसाहती बहुशः सुखात

व वैभवात असतां त्यांना इंग्लंडचें स्वामित्व का मानवलें नाही ? त्यांना कोणतें वैगुण्य असह्य झाल्यामुळें त्यानी मायभूमीवरच शस्त्र उगारलें ?

पुढच्या प्रकरणात या प्रश्नाचा परामर्श घेऊं.

---

## प्रकरण सत्रावें

# असंतोषाचा अग्नि कां उद्भवला ?

एखादा प्राणहारक रोग मनुष्याच्या शरीरांत जसा एकाएकीं उद्भवत किंवा स्फोट पावत नाही, तसाच जुलुमी सत्तेचा ग्रास घेऊं पाहणारा असंतोषही एकाएकी संभवत किंवा भडकत नाही. त्याचें बीजारोपण फार आधींपासून झालेलें असतें. मग अति झालें म्हणजे माती होण्याची दुर्धर वेला प्राप्त होते ! याच नियमानुसार इंग्लंडच्या सत्तेविषयीं अमेरिकन लोकाचा असंतोष पुष्कळ आधीपासून जन्मास येऊन क्रमाक्रमाने वाढत चालला होता. त्याची कारणें शोधावयाचीं तर आपणास बऱ्याच मागच्या काळाकडे दृष्टि टाकली पाहिजे. मागे आठव्या प्रकरणाची समाप्ति करतांना बर्क्लेच्या कारकीर्दीमुळें सामान्य जनतेचे नशीब फिरल्याचा उल्लेख केला आहे. तेव्हा तेथपासूनच आपण शोध घेत येऊं.

योगायोग असा की, ज्या भूमीवर पहिली इंग्लिश वसाहत स्थापली गेली, तेथेच इंग्लड व अमेरिका याच्या द्वैताचें बीज पेरलें गेलें. हा पाहिला पेरा बर्क्लेने केला. इ. स. १६४२ मध्यें तो गव्हर्नर म्हणून व्हर्जिनिया प्रांतावर धाडण्यात आला. अधिकारावर येताच त्याने आपले विषारी दात बाहेर काढले. परंतु व्हर्जिनिया प्रातवासीयाच्या सुदैवाने त्याची कारकीर्द मध्येच खंडित झाली. इ. स. १६४९ साली इंग्लंडच्या लोकांनी राजा पहिला चार्लस यास फाशीं देऊन राजसत्तेला विराम दिला. तेव्हा बर्क्लेसारखे तत्पक्षीय लोकही बारगळले. त्यास पदत्याग करून स्वदेशीं परत यावें लागलें. चार्लसच्या वधानंतर इंग्लंडांत क्रॉमवेलच्या आधिपत्याखाली प्रजासत्ता चालू झाली. वसाहती मूलत:च स्वतंत्र असल्या तरी, राजसत्तेचें जे थोडेसें बुजगावणें त्यांच्यावर—विशेषत: रॉयल कॉलनी

जवर–होतें तें आतां अनायासें नष्ट झालें व लोकसत्तेचें सौख्य विशेषतेने मिळूं लागलें. पुढे इंग्लंडची प्रजासत्ता अल्पजीवी ठरून इ. स. १६६० मध्यें लयाला गेली ! दुसरा चार्लस गादीवर आला. अमेरिकन वसाहती पुन्हा राजसत्ताकित झाल्या. राजाच्या कृपेंतले लोक अधिकारी म्हणून वसाहतींकडे रवाना होऊं लागले. त्यात बर्क्लेलाही व्हर्जिनिया प्रातावर गव्हर्नर या नात्याने नेमण्यात आलें. एक तप स्वातंत्र्याचें माधुर्य चाखलेले व्हर्जिनियावासी व सत्तामदास चटावलेला बर्क्ले याचा संबंध पुन्हा जुळून आला.

अधिकारावर येताच बर्क्लेने प्रथमत: तेथील लोकनियुक्त प्रतिनिधिमंडळाच्या घटनेकडे लक्ष पुरविलें. त्याच्या अनियंत्रित सत्तेला हा एक मोठा अडथळा होता. तो मोडून आपल्या हातातील तें खेळणें बनेल असा प्रयत्न त्याने आरंभिला. कोणत्याही देशात सत्तेच्या सावलीखाली आराम करूं इच्छिणारे काही लोक असतातच. व्हर्जिनियामध्यें येऊन मोठीं धनाढ्य होऊन बसलेली जीं काही माणसे होतीं, त्यातील कांही गणंग बर्क्लेने हाताशीं धरले आणि त्याच्या करवीं लोकनियुक्त मंडळाचें नपुंसकीकरण चालविलें. अर्थात् या कार्यास काही वर्षांचा अवधि लागला; पण बर्क्लेचा हेतु सफल झाला. सामान्य प्रजेला तुच्छ लेखणारे, लांगूलचालन करण्यास चटावलेले, मानाला भाळणारे, सत्यासत्याची चाड न बाळगणारे व स्वार्थाकरितां कोणाच्याही घरावर तुळशीपत्र ठेवण्यास तयार असणारे लोकच प्रतिनिधिमंडळात निवडून येऊं लागले ! अहंमन्य व राजसत्तावादी गव्हर्नर व होयबांचें मंत्रिमंडळ असा योग जमून आल्यावर व्हर्जिनियाच्या राज्यकारभाराने कोणती दिशा घेतली असेल, हें सहज कळण्यासारखें आहे. लोकस्वातंत्र्याला खग्रास ग्रहण लागण्याचा प्रसंग येऊन ठेपला.

त्या कालीं राज्यकारभाराच्या एकंदर खर्चासाठी कर बसविण्याचा अधिकार वसाहतीच्या प्रतिनिधिमंडळाकडेच होता. अर्थात् गव्हर्नर व इतर अधिकारी यांचें वेतन प्रतिनिधिमंडळाच्या सल्ल्यास धरून ठरत असे व इतरही आवश्यक खर्च तदनुरूप करण्यात येत. पण बर्क्ले साहेबांच्या कारकीर्दीत हा सारा मनु पालटला. वरपासून खालपर्यंत सर्वांना आपलें वेतन अपुरें वाटूं लागलें व प्रतिनिधिमंडळातील बहुतेक

व्यक्तींना खर्चाचे नवे नवे ढंग सुचूं लागले. एवढ्या तेवढ्या निमित्ताने नव्या नव्या कराच्या लहान मोठ्या योजना पुढे येऊं लागल्या व त्या लोकांच्या कानापर्यंत जाण्याच्या आतच पसार होऊं लागल्या. मात्र या चापातून अधिकारी वर्ग, प्रतिनिधिमंडळांतील शिष्ट व त्याचे बगलबच्चे यांची सहज सोडवणूक होईल अशी दक्षता मुळापासून घेण्यांत आली. लोकांचे प्रतिनिधि म्हणविणारांच्या संमतीनेच हा अन्याय घडूं लागल्या- मुळें, सामान्य प्रजेच्या शिरावरील कराचें ओझें सारखें वाढत राहिलें तरी लोकांना या जुलमाचा एकदम सुगावा लागला नाही. बहुतेक सारा वर्ग शेतकरी. तो सदैव आपल्या कार्यात गुंतलेला. खेडीं लहान लहान व फार विरळपणें वसलेलीं आणि दळणवळणाचीं साधनें अगदी अल्प. यामुळें कायद्याच्या व सुव्यवस्थितपणाच्या नावाखाली चाललेला हा गोंधळ चवाठ्यावर येणें कठीण झाले. दुसरी गोष्ट. मासाच्युसेट्स संस्था- नाने सार्वत्रिक लोकशिक्षणाचा प्रश्न जसा पद्धतशीर रीतीने व चिकाटीने हातीं घेतला होता, तसा प्रयत्नही व्हर्जिनियावासीयांनी अद्यापि अंम- लांत आणिला नव्हता. मुख्य शिक्षणाचाच अभाव असल्यामुळें त्याचीं जीं उपांगें—मुद्रणालयें व नियतकालिकें—त्याचाही प्रादुर्भाव झाला नव्हता. म्हणजे या दिशेनेही व्हर्जिनियाची प्रजा अंधेरांतच चाचपडत होती. बर्क्लेच्या कारकीर्दीत या सुधारणा घडून येणें प्राय: अशक्य होतें. लोक- शिक्षणाच्या कोणत्याही अंगोपांगांचा तो पक्का द्वेष्टा होता. शिक्षणाने व वाचनाने सामान्य प्रजा फाजील चौकस व धीट बनते, तरुण लोकांमध्यें राजद्रोह बोकाळतो आणि सर्वसामान्य लोकांच्या मनावरील राजसत्तेचा बोज उडून जातो, असें त्याचे प्रामाणिक मत होतें. ' माझ्या कारकी- र्दीत असल्या घाणेरड्या गोष्टी मी मुळीच होऊं देणार नाही, ' अशी त्याची प्रतिज्ञा होती. मग तिच्या आड येणार कोण व ज्ञानाचा प्रसार होणार कसा ? या प्रतिकूलतेमुळें अन्यायपीडिताचा एकोपा घडून येण्या- सही वाव राहिला नाही. सत्ताधाऱ्यांचा मार्ग निष्कंटक राहिला.

पण व्हर्जिनियावासीयांचा कोंडमारा एवढ्यानेच भागला नव्हता. बर्क्ले व त्याचे उपग्रह यांनी सत्ताबलावर वसाहतीच्या तंबाकूच्या प्रचंड व्यापारांतही प्रच्छन्नपणें हस्तक्षेप करून लूट चालविली होती. व्हर्जिनि- यामध्यें तंबाकूचें उत्पन्न दांडगें. वसाहतींतील बहुतेक शेतकरी या

मालाची पैदास करीतच; शिवाय रानटी इंडियनही त्यांना हा माल मोठ्या प्रमाणावर पुरवीत. बर्क्लेने आपले हस्तक पेरून इंडियनांकडून येणारा माल मधल्यामध्येंं दाबण्याचा उपक्रम सुरू केला. तात्पर्य, व्हर्जिनियाच्या लोकानी जेवढें सौख्य व स्वातंत्र्य उपभोगिलें होतें, त्याचा सहस्रांशही त्यांना आता लाभेना. अशा विपरीत स्थितींत एक तपाचा काल लोटला. पुढे इ. स. १६७५ पासून वसाहतवाल्यांवर एक नवीनच संकट कोसळूं लागलें. तें रानटी इंडियन लोकांच्या निष्ठुर आक्रमणाचें होय. गौरकायाचें वाढतें बल पाहून ते लोक पिसाळल्यासारखे झाले होते व संधि सापडेल त्याप्रमाणें वसाहतींच्या मागे लागले होते. मासाच्युसेट्स, मेरीलॅंड, -होड आयलंड इकडे त्या त्या स्थानच्या जातींनी प्रलय मांडिला होता. त्याचाच प्रतिध्वनि व्हर्जिनियाच्या सरहद्दीवर उठूं लागला. इंग्लिश वसाहतवाल्याना सुधारलेल्या शस्त्रास्त्रांचें साह्य असलें तरी मृत्यूप्रमाणे अकस्मात् येणाऱ्या घातक हल्ल्यापुढे ते काय करणार ? शिवाय ऐहिक वैभवाच्या लोभाने वसाहतवाल्याच्या छोट्या छोट्या टोळ्या फार दूरपर्यंत पसरत गेल्या होत्या. अशा ठिकाणीं मनुष्यबल कमी पडूं लागलें. त्यांत अलीकडे इंडियन लोकानाही सुधारलेलीं शस्त्रास्त्रें वापरतां येऊं लागल्यामुळे व त्याना त्याचा पुरवठा गोऱ्या लोकाकडूनच होत राहिल्यामुळें त्यांच्या हल्ल्याना भयानक स्वरूप येत चाललें. व्हर्जिनिया प्रांतात त्यानी उठाव केल्यानंतर अल्पावधींत त्यानी तेथील रहिवाश्याना दे माय धरणी ठाय करून सोडिलें. सरहद्दीवर तर त्यानी कहरच मांडला. वसाहतवाल्यांनी आपल्याकडून या संकटाचा प्रतिकार चालविलाच; पण रीतीप्रमाणें त्यांनी आपल्या सत्ताधारी गव्हर्नराकडे साह्याची मागणी केली ! परंतु "सरकारचें तिकडे लक्ष आहे," या ठरीव उत्तरापलीकडे बर्क्लेने काही एक केलें नाही. लोकाना आश्चर्य वाटलें, संताप आला; पण ते आपलें कांही वाकडें करूं शकणार नाहीत अशी बर्क्लेला खात्री असल्यामुळें त्याने त्यांच्या संतापाकडे बिलकूल लक्ष दिलें नाही. इकडे इंडियन लोकांच्या दंग्याचें स्वरूप सारखें वाढत चाललें. त्यांनी वसाहतवाल्यांचीं गांवें लुटलीं, शेतें व मळे उध्वस्त केले, गुरेंढोरें पळवून नेलीं, औतांचा नाश केला, घरेंदारें जाळलीं आणि तडाक्यांत सापडलीं तीं माणसें निर्दय-

पणें कापून काढलीं ! असा हाहाकार उडाला व प्रजा अगदी हवालदील होऊन गेली. तरी बर्क्ले व त्याचें मंत्रिमंडळ पाषाणाप्रमाणें थंड व निर्विकार राहिलें ! पण एवढ्यावरच त्यांचा प्रजाहितद्रोह थांबला नाही. संकटग्रस्त लोकांचा एकोपाही त्यांना पाहवला नाही. आपल्या संरक्षणार्थ असलेल्या गव्हर्नरादि अधिकाऱ्याकडून आपणास कांहीच साह्य मिळण्याचें चिन्ह दिसत नाही असें पाहून लोकानी एकजुटीने या दारुण संकटाचा परिहार करण्याचें योजिलें. त्यानी स्वयंसैनिकांचीं पथकें उभारलीं, थोडा दारूगोळा जमवला आणि कांही शहाण्या व धीट लोकांना पुढाकार देऊन त्यांच्याकडे या मोहिमेचें कार्य सोपविलें. परंतु लोकांनी स्वसंरक्षणार्थ योजिलेला हा प्रयत्नही बर्क्लेस असह्य झाला. त्याने तो सारा व्यूह राजद्रोही ठरवून ढासळून पाडला व त्यांत पडलेल्या लोकांना बजावलें की, "आम्ही तुमच्या संरक्षणार्थ असतां तुम्ही असला चोंबडेपणा करावा हें मला बिलकूल पसंत नाही व मी तें बिलकूल चालूं देणार नाही." आपल्या गव्हर्नराचा हा अडमुठा अधमपणा पाहून त्या लोकांची मनःस्थिति कोणत्या प्रकारची झाली असेल याची वाचकानीच कल्पना करावी. बरें,एवढ्याने बर्क्लेचा अधमपणा थांबला का ? नाही. उलट लोकांवर चिडून त्याने दंगेखोर इंडियनांना साह्य पोचवून त्याना मूक प्रोत्साहन दिलें ! आहे की नाही न्याय !

बर्क्लेने हा पराकोटीचा नीचपणा तरी का केला ? केवळ लहर म्हणून नव्हे. त्यांत त्याचा विशिष्ट हेतु होता. वसाहतवाल्यांचें जीवित सतत धोक्यात राहावें व त्या भीतीने त्यानी आपल्यास सतत वचकून असावें असा त्याचा कावा होता. लोक चांगले ठेचून निघाल्यावर मग त्यांच्या साह्यास धावण्याचें सोंग करावयाचें, लांचलुचपतीने दंगेखोरांना गप्प करावयाचें आणि मग वसाहतवाल्यांना बजावावयाचे की, "पहा आम्ही आहोंत म्हणून तुमचें रक्षण होत आहे ! मुकाट्याने आम्ही वागवूं त्याप्रमाणें चाला." परंतु बर्क्लेची ही धुंदी लौकरच उतरली. त्या सुमारास व्हर्जिनियामध्यें बेकन या नांवाचा एक मोठा धनाढ्य व्यापारी येऊन राहिला होता. हा फारसा पोक्त नव्हता. पण मोठा स्वातंत्र्याभिमानी, धीट व दुर्बलांचा कैवारी होता. बर्क्लेने निर्माण केलेली परिस्थिति

पाहून त्यास चीड आली. त्याने तिचा प्रतिकार करण्याचें ठरविलें आणि त्या कामीं लागलीच पुढाकार घेतला. मात्र प्रथमतः त्याने लोकांचे बल वाढवून व एकजूट करून दंगेखोर इंडियनाना झोडपून काढलें व वसाहतीच्या मागचा समेमिरा नाहीसा केला. तोंपर्यंत इकडे बर्क्लेने बेकनला राजद्रोही व बंडखोर ठरवून त्याच्या पारिपत्याची योजना चालविली होती. बेकनला ही गोष्ट कळण्याच्या आतच तो आपण होऊन बर्क्लेवर चालून आला! बर्क्ले धीट तितपतच होता. त्याने मुकाट्याने जेम्सटाऊन राजधानीतून पळ काढला. पण लोकांना त्याची इतकी चीड आली होती की गव्हर्नर नाही तर नाही, त्याची राजधानी जाळून टाकावी, असा विचार करून जेम्सटाऊनला त्यानी आग लाऊन दिली! लोकांचें हें वाढते बल व बेकनचें वजन पाहून बर्क्लेने शरणागति पत्करली व पश्चात्तापाचें बेमालूम सोंग आणून राज्यव्यवस्थेंत बदल करण्याचे मान्य केले. नंतर लोकांनी बेकनच्या देखरेखीखाली प्रतिनिधिमंडळ बनवून नवीन कायदेकानू केले. पण बर्क्ले हा दगलबाज आहे हें बेकन ओळखून होता. त्याचें नरमाईचें सोंग कोठवर टिकेल याची मोठी शंका होती. म्हणून त्याने आपल्या पक्षाच्या लोकाना सावध राहण्याविषयीं सूचना देऊन ठेविल्या होत्या. इतक्यात व्हर्जिनियावासी लोकाच्या दुर्दैवाने बेकन नवज्वराने आजारी पडला व त्यातच त्याचा अंत झाला! सूड घेण्याकरिता टपलेल्या बर्क्लेला फारच लौकर सुवर्णसंधि लाभली. मानहानि झाल्यामुळे खलीस आलेला नराधम कोणती राक्षसी कृत्यें आचरणार नाही? मृत्यु पावून बेकन त्याच्या दृष्टीआड झाला होता; पण त्याचे अनुयायी व सहकारी हयात होते. बर्क्लेने आपली क्रूरदृष्टि आता त्या लोकाकडे वळवली व तावडीत सापडतील त्याना भाजून काढलें! इंग्लंडचा तूर्तांचा राजा दुसरा चार्लस याने पितृवधाचा सूड म्हणून सहा लोकाचा बळी घेतला होता तर बर्क्लेने आपल्या मानहानीची भरपाई करण्याकरिता अनेक लोकाना नानाप्रकारे छळून बावीस लोकाना फासावर लटकाविले होते. अर्थात् त्याचा हा राक्षसी कारभार गुप्त राहाणे शक्यच नव्हतें. राजा व पार्लमेंट याच्या पर्यंत तो बोभाटा गेला व तिकडून बर्क्लेचें उच्चाटण तात्काळ करण्यात आलें.

नवजीवनदाता बेकन व छळवादी बर्क्ले व्हर्जिनियाच्या दुर्दैवाने व सुदैवाने नाहीसे झाले; पण पहिल्याचे पुण्यस्मरण व दुसऱ्याचे पापा-

चरण तेथील लोक आमरणान्त विसरले नाहीत. पहिल्याने निर्माण केलेली स्वातंत्र्यज्योत भविष्यकाळीं केव्हाही विझली नाही आणि दुसऱ्याने केलेली जखम भरून निघाली नाही. यामुळें इंग्लंडच्या सत्तेविषयीं निर्माण झालेला असंतोष व्हर्जिनियाच्या भूमींत सतत धुमसत राहिला ! असो.

इंग्लंडच्या सत्तामदाचा हा दर्प सांसर्गिक रोगाप्रमाणें लौकरच व्हर्जिनियावरून मासाच्युसेट्स संस्थानाकडे वळला. हें संस्थान मनस्वी व कार्यार्थी अशा प्युरिटन लोकानी कोणाचाही आधार न घेतां, खडतर तपस्या करून, उभारलें होतें. पूर्व नृपतींच्या सनदेचा त्यास बळकट आधार होता. येथील लोकाना इंग्लंडचे स्वामित्व व राजनिष्ठा मान्य होती. असें असताही धर्मस्वातंत्र्य किंवा लोकसत्ता मनातून नकोशी असलेल्या दुसऱ्या चार्लसला मासाच्युसेट्सच्या नागरिकाचें वाढतें स्वातंत्र्य-बल उघड्या डोळ्यांनी पाहवेना. यातच त्याच्या मनास झोंबणाऱ्या अशा आणखीही काही गोष्टी घडल्या होत्या. बोस्टन बंदराने 'नॅव्हिगेशन लॉ' कडे पूर्ण दुर्लक्ष चालविले होतें. कनेक्टिकट वसाहतीने राजनिष्ठे-ची शपथ उडवून देऊन प्रत्यक्ष लोकसत्ताक राज्यपद्धति चालू केली होती. आणि तिच्याच शेजारची वसाहत 'न्यू हेवन' येथील लोक तर इंग्लंड-च्या राजाचे द्वेष्टेच होते ! अर्थात् इतक्या अप्रिय गोष्टींनी अत्यंत कडू बनलेला लोकशाहीचा कषाय चार्लसला असह्य झाल्याविना कसा राहील ? म्हणून त्याने सर्वांचे पेकाट हळूहळू मोडावे असा विचार करून पहिली धाड मासाच्युसेट्सच्या सनदेवर घातली आणि बेकायदेशीरपणें वर्तन केल्याचा आरोप ठेवून इ. स. १६८४ मध्यें ती वसाहत त्याने आपल्या खास मालकीची करून टाकली. या अन्यायाविरुद्ध तेथील नागरिकानी पुष्कळ तक्रार केली; परंतु इंग्लंडमध्ये अद्यापि राजसत्ता पार्लमेंटच्या आवाक्याबाहेर असल्यामुळें त्याच्या तक्रारीचा कांहीच उपयोग झाला नाही. मासाच्युसे-ट्स 'रॉयल कॉलनी' बनली ती बनली ! या वसाहतीचा बळी घेतल्या-नंतर वर्षांभराने चार्लस दिवंगत झाला व त्याच्या जागीं त्याच्याच पावलावर पाऊल ठेवणारा त्याचा भाऊ दुसरा जेम्स गादीवर आला. यालाही वसा-हतींचें स्वातंत्र्य वावडेच होते. तेव्हा त्याचीं पाळेमुळे खणून काढण्याकरिता त्याने आपल्या कृपेतील व बर्क्लेपेक्षा सवाई असा सर एडमंड ॲंड्रॉस याला मासाच्युसेट्स वसाहतीवर इ. स. १६८६ मध्ये गव्हर्नर म्हणून पाठविलें.

याने भोवतालच्या साऱ्या वसाहतींच्या सनदा रद्द करून टाकण्याचा विडाच उचलला होता. म्हणून त्याने इ.स. १६८७ सालीं पहिली दृष्टि कनेक्टिकटकडे वळविली. थोडेसें सैन्य घेऊन तो हार्टफोर्डला गेला व तेथून पुढाऱ्याना सनद हजर करा म्हणून हुकूम फर्माविला! पण ती त्याच्या हातीं लागली नाही व तेथून त्यास फजीत होऊन परतावें लागलें. या मानहानीचें उट्टें त्याने लोकच्छल आरंभून भरून काढलें पण बर्कलेप्रमाणें त्यास हा सुखोपभोग फार काल घेता आला नाही. इ. स. १६८८ सालीं इंग्लडमध्यें जेम्स राजाचेंच उच्चाटण झालें. ती संधि साधून मासाच्युसेट्स वसाहतवाल्यांनी बंड करून अँड्रॉसला कैद केलें आणि पुन्हा लोकस्वातंत्र्याचा झेंडा उभारला! पुढे इंग्लंडमध्यें विल्यम राजा गादीवर आल्यानंतर १६९१ सालीं मर्यादित अधिकाराची सनद या वसाहतीला बहाल करण्यांत आली.

अशा प्रकारामुळे राजनिष्ठेला विशेष धक्का न लावता स्वतंत्रपणें फोफावूं पाहणाऱ्या वसाहतींना इंग्लंडचें आधिपत्य फार जाणवूं लागलें व असंतोषाचीं बीजें सर्वत्र पेरलीं गेलीं.

यानतर इंग्लंडमध्ये राजसत्ता मर्यादित झाली व इकडे अमेरिकेंत इंग्रज फ्रेंचाच्या लढ्याला तोंड लागले. पण या संकटात तरी वसाहतींना इंग्लंडच्या स्वामित्वापासून सौख्य लाभलें का? मुळीच नाही. अगोदर किती काळ तरी इंग्लंडकडून अमेरिकन लोकांना व्हावें तसें साह्य झालेंच नाही. पण जेव्हा होऊं लागलें तेव्हा तें मोठें विषवत् होऊं लागले. भारतीय युद्धात महद्यश संपादन करावे या आकांक्षेने कर्णाने शल्यास सारथ्य करण्यास बोलावले. त्या प्रसंगीं शल्याने जें वर्तन जाणून बुजून केलें, तसेंच वर्तन इंग्लंडच्या सैन्याने व सेनाधिकाऱ्यानी, अजाणता का होईना, अमेरिकन लोकाशीं केलें. दोनही प्रकारात फरक एवढाच की, दुर्दैवाने कर्णास त्याच्या अटकळीप्रमाणें यश मिळाले नाही व भाग्येंकरून अमेरिकन लोकाना तें मिळाले.

वास्तविक हें दीर्घकालीन युद्ध लढवितांना अमेरिकन वसाहतींनी कसलीच कुचराई केली नाही. धन जमविण्यात, सैन्ये उभारण्यात, सेनापति पुरविण्यांत, शौर्य धैर्य व चिकाटी दाखविण्यात व कुशलतेने डाव टाकण्यांत तेथील लोक मुळीच मागे पडले नाहीत. तसा प्रसंगच पडता तर त्यानी आत्मविश्वास व आत्मबल यावर तें झुंज यश गाठीपर्यंत चालविलें

असते यात शंकाच नाही. परंतु इंग्लंड हें त्याचें मायपोट होतें. त्याच्याविषयी त्याच्या मनात प्रेमादरभाव वसत होता. एखादा आज्ञाधारक व सुशील पुत्र कर्ता झाला असतांही आपल्या कर्तृत्वाचें श्रेय जसें आपल्या मातापित्यास देऊं पाहात असतो, तशी इंग्लंडविषयी अमेरिकनांची दृष्टि होती. ' आदरार्थें च ' त्यानी त्याचे साह्य अपेक्षिलें होतें. परंतु इंग्लडने मात्र तितक्याच सद्धेतूने आपला हात पुढे केला नाही. हे साह्य पोचविण्यांत त्याचा एक स्वार्थी हेतु होता. अमेरिकन वसाहती तरारत चालल्या आहेत व तेथील लोक धनधान्यांहीं समृद्ध होत आहेत ही गोष्ट इंग्रज मुत्सद्याना पूर्णपणे माहीत होती व या माहितीचा उपयोग करून घेण्याचेंही त्यानी ठरविलें होते.अमेरिकेच्या भूमीवर फ्रेंचाशीं लढण्याकरिता इंग्लंडांतून सैन्य व युद्धसामग्री रवाना करतांना इंग्लिश मुत्सद्दी मनाशीं हें योजून होते की, हेंच सैन्य पुढे अमेरिकेंत स्थाइक करावयाचे व त्यास लागणारा मलिदा इच्छेस येईल तेवढा अमेरिकन लोकाकडून काढावयाचा. त्यानी तो निमूटपणे दिला तर प्रश्नच नाही. पण जर त्यानी अनमान केला तर ज्या बागनेटानी फ्रेंचाची छाताडें फोडलीं, तीच त्याच्यावर रोखावयाची ! आता अशा वासनेनें धाडलेले सैन्य व त्याचे अधिकारी अमेरिकेंत आल्यावर तेथील जनतेशी कसे वागले असतील, हे काय सांगावयास पाहिजे ?

अमेरिकनाच्या साह्यार्थ पाठविण्यात आलेले पाहुणे इंग्लंडच्या हवेंत भले लोक असतील; परतु अमेरिकेच्या भूमीवर पाऊल टाकताच त्याच्यापैकी अनेकाच्या स्वभावात एकदम भलताच पालट पडला ! अमेरिकेत आल्याबरोबर हे निवडक लोक पराकाष्ठेचे उद्दाम, दुराग्रही, स्वस्तुतिप्रिय, कर्तव्यच्युत व वाक्शूर बनले ! अमेरिकनाचा व त्याचा संबंध येऊं लागताच त्याचें हें स्वरूप हळूहळू दृग्गोचर होऊ लागले. " अरे अमेरिकनानो ! तुमच्या रक्षणार्थ आम्ही आलों आहो. आमची इभ्रत, योग्यता, दानत, शौर्यधैर्य, परम्परा सर्व काही श्रेष्ठतर आहे ! आमचें भजनपूजन तुमच्याकडून जेवढें होईल तेवढें थोडेंच आहे ! म्हणून आमची मर्जी साभाळा व इमानीपणाने सांगू ती कामगिरी बजावीत चला." अशा धर्तीचें त्याचे बोलणें चालणें व वागणे घडूं लागलें. बरें, या दर्पोक्तीप्रमाणें ते लोक खरोखरीच गुणमंडित असते,

तर त्याचें हें वर्तन थोडेसें सह्य व क्षम्य ठरलें असतें; परंतु तसाही प्रकार नव्हता. प्रत्यक्ष रणांगणावर व युद्धाच्या हालचाली करितांना ते पदोपदीं हिणकस ठरूं लागले! ओहिओ खोरें जिंकण्याकरितां पैजेने आलेला ब्रॅडॉक सेनापति जसा तेथील अरण्यमय परिस्थितीमुळें भांबावला, खुळा ठरला व पराजित झाला, तसाच प्रकार अनेक सेनानायकांच्या बाबतींत अनेक ठिकाणीं अनुभवास येऊं लागला. असें असताही अमेरिकन सैनिक व सेनाधिकारी त्याचा बोज सांभाळण्यास मनापासून तत्पर होते. ते लोक परस्थानीं आले आहेत, आपल्या साह्यार्थ आले आहेत, तेव्हा त्यांना सांभाळूनच नेलें पाहिजे, हें ते जाणून होते आणि म्हणूनच त्यांना मोठेपणा देऊन त्याच्या हाताखाली वागण्यास व त्याच्या अनुज्ञेप्रमाणें युद्धाचे डाव खेळण्यास त्याची मान्यता होती. परंतु अमेरिकनांच्या या सौजन्याचा उपयोग शिष्ट इंग्रज पाहुणे सरळपणें करून घेतील तर ना! यामुळें त्या युद्धामध्यें अमेरिकनाना इंग्रजाचें साह्य होण्याऐवजीं अनेकदा अडथळाच झाला व तो शत्रूच्या अडथळ्यापेक्षा जबर ठरला! कोठें काय करावयाचे हे स्वत:ला कळावयाचें नाही आणि दुसऱ्याचें तर ऐकावयाचें नाही! अमेरिकन लोक सगळीकडेच बरोबरीने लढत असल्यामुळें त्याना पाहुण्याचें साह्य अगदी डोईजड होऊन बसलें! त्यांत आणखी दैवाची विटंबना अशी: पाहुण्याच्या मूर्खपणामुळे अपयश आलें तर त्याला जबाबदार अमेरिकन. पण याच्या उलट अमेरिकनांच्या शौर्याचातुर्याने यश लाभले तर पाहुणे इंग्रज शेफारून म्हणत, "एँहे! पाहिलेंत. आम्ही आहोत म्हणून तुमचा निभाव लागला आहे. नाहीतर त्या दुष्ट फ्रेंचानी तुमचा धुव्वा उडवला असता धुव्वा!" अशा स्थितींत शूरवीर अमेरिकनांना व त्याच्या सेनानायकाना किती मानखंडना वाटत असेल व संतापाने त्यांच्या जिवाचा किती तिळपापड उडत असेल, याची कल्पनाच करावी! खरोखरच त्या काळीं अमेरिकनांनी मोठा शांतपणा व समंजसपणा दाखविला! नाहीतर कोणता प्रसंग ओढवला असता देव जाणे! त्यांनी आपल्याच पक्षांत लाथाळी न करता यश पदरांत पाडून घेतलें.

अमेरिकन लोकांच्या साह्यार्थ इंग्लंडने केवढेंही औदार्य दाखविलेलें असो, फ्रेंच लोकाचा पूर्ण पराभव करून विजय मिळविण्याचें कार्य मुख्यत्वेंकरून अमेरिकनांनीच केलें. त्या विजयाचें तीन चतुर्थांश श्रेय

त्यांच्या शौर्याला व समंजसपणालाच दिलें पाहिजे. इंग्लंडने धाडलेल्या लोकांत वूल्फ सारखे कांही नामांकित सेनापति होते, नाही असें नाही; पण नादान लोकांचा भरणाही कमी नव्हता. एबरक्रॉम्बी, लौडन, ॲमहर्स्ट, गेज यांसारखे बडे या युद्धांत खरोखरीच भेदरट व नालायख ठरले ! त्यांपैकी कित्येकांनी वूल्फसारख्या सेनापतीचीही अडवणूक केली ! अशा या अवसानघातकी लोकानी लष्करी डावपेंच लढविण्याच्या सोंगाखालीं युद्धाचे प्रसंग टाळले आणि आपला भेदरटपणा अमेरिकन लोकापासून लपविण्याकरितां त्यांच्यावर हडेलहप्पी गाजविली !

सारांश, वरील युद्धप्रसंगाने इंग्लंडच्या लष्करी लोकाकडून अमेरिकनांपैकी अत्यंत योग्य अशा कर्त्या पुरुषाची पदोपदीं अवहेलना झाल्यामुळें उभयपक्षांतील प्रेमबंध तटातट तुटत गेले. ते पुन्हा सांधून घेण्याची कांहीच व्यवस्था झाली नाही. मनुष्यास वतनाप्रमाणें मानही अत्यंत प्रिय असतो; पण इंग्लंडने अमेरिकेच्या बाबतींत दोहोंची कदर बाळगली नाही. अमेरिकनांच्या मनात इंग्लंडविषयीं असंतोषाचा अग्नि फुलण्यास आणखी काय हवें होतें ?

या शिवाय आणखीही दोन अप्रिय गोष्टी इंग्लंडकडून सतत घडत राहिल्या. पहिली गोष्ट इंग्लंडमध्ये सामाजिक दृष्ट्या पतित किंवा तिरस्कृत ठरलेल्या लोकांना वसाहतींमध्यें धाडणें. 'इंग्लंडने हा असला उकिरडा आमच्या घरात आणून का टाकावा ?' अशी अनेक वसाहतींची तक्रार होती. पण इंग्लडने तिकडे दुर्लक्ष केलें. आता अशा लोकाना वसाहतीकडे पाठविण्यात इंग्लडचा दुष्ट हेतु होता असे नाही. शक्य असल्यास त्या लोकाना नव्या भूमींत नेऊन आत्मोद्धाराची संधि देऊन पाहावी, असा त्याचा हेतु; व काहींच्या बाबतींत तो सफलही झाला; पण असले डागळलेले आंबे आपल्या ताज्या आढींत पडावे, हें वसाहतींना मानवत नव्हतें. आणि म्हणूनच त्याचा प्रतिकार याविषयी सतत चालू होता.

दुसरी गोष्ट गुलामाच्या व्यापाराची. इ. स. १६१९ सालीं डचानी या व्यापाराचा सूत्रपात केला. अमेरिकेंत तो चांगला भरभराटीस येणार असें आढळून येतांच इंग्लंडने त्याची सारीं सूत्रे आपल्याकडे घेतलीं आणि आफ्रिकेवर स्वाऱ्या करून गुलामाचीं जहाजेंच्या जहाजें भरून अमेरिकेकडे आणिलीं. मातीमोलाने मिळणारें हें मनुष्यबल

कांही वसाहतींनी हव्यासाने पत्करलें असलें तरी व्हर्जिनिया व उत्तरेकडील स्वातंत्र्यवादी संस्थानें त्याच्या अगदी विरुद्ध होतीं. धार्मिक व नैतिक दृष्ट्या गुलामांचा व्यापार निंद्य असून त्यांच्या संसर्गानें आपली नीति, धर्म, संस्कृति व वर्ण यांचा अधःपात होईल असें त्यांना भय वाटत होतें. म्हणून इंग्लंडने हा माल यापुढे अमेरिकेंत आणूं नये असा त्यांचा कटाक्ष होता. परंतु इंग्लंड तरी काय करणार ! साम्राज्यविस्ताराकरितां लक्षावधि पौंडांची त्यास गरज भासत होती. ते या व्यापारावर एक पैशाच्या भांडवलाला एक रुपया नफा याप्रमाणें मिळत होते ! मग असा हा लाभ इंग्लंडने का सोडावा ?

---

## प्रकरण अठरावें

## आगींत तेल कसें पडत गेलें ?

फ्रेंच युद्धाच्या दिव्यातून बाहेर पडून पुरें वर्ष लोटलें नाही तोंच अमेरिकन वसाहतींना स्वतःच्या भाग्याकाशात एका नवीन संकटाचें अवडंबर गरगरून भरून येत असल्याचें दिसून आलें ! हें अगदीच अनपेक्षित नव्हतं. पण तें इतकें शीघ्रगामी, असह्य व उग्र असेल असें मात्र कोणालाच उमगलें नव्हतें. आणि म्हणूनच ज्या वेळीं तें क्षितिजावर दिसूं लागलें, त्यावेळीं प्रत्येक अमेरिकनास अत्यंत विषादयुक्त आश्चर्य वाटलें ! हें संकट दुसरें कांही नसून इंग्लंडच्या तत्कालीन राजसत्तेची कुटिल नीति व असीम तृष्णा वसाहतींच्या स्वातंत्र्याचा ग्रास करण्याकरितां धावून येत होती !

या वेळीं ( इ. स. १७६३–६४ ) इंग्लंडमध्यें तिसऱ्या जॉर्ज राजाची कारकीर्द सुरू होती. फ्रान्सवर मिळविलेल्या विजयामुळें युरोपच्या राजकारणांत इंग्लंडला महत्त्व मिळूं लागलें होतें व त्या मानाने फ्रान्सचें तेज मंद होत चाललें होतें. तिकडे हिंदुस्थानांतही ब्रिटिश सत्तेचा पाया विशेष खोल व सुदृढ होत चालला होता. या विजयाने व वैभवप्राप्तीने इंग्लंडची भाग्यप्रभात मोठी दीप्तिमन्त दिसूं लागली

होती. मग त्याच्या नेत्रांवर अहंकाराची धुंदी का चढूं नये ? याच धुंदींत त्याने अमेरिकन वसाहतींकडे पाहिलें. मद्यासक्त कीचकाने सैरन्ध्रीस पाहि· ल्यावर मग जसें त्यास इतर कांही सुचेना, तशीच स्थिति फ्रेंच युद्धातून न्हाऊन माखून निघालेली अमेरिकन वसाहतींची भरभराट पाहून त्या वेळच्या इंग्लंडच्या राजदरबाराची झाली. त्याचें मन अत्यंत लोभातुर झालें !

इंग्लंडची ही वसाहतींवरील लोभी दृष्टि काही आजकालची नव्हती. जवळ जवळ शतकभर मागची. पण ती आताच तीव्रतेने जागृत होण्या- सही एक प्रबल कारण घडलें होतें. यावेळी इंग्लंड अनेक दिशानी प्रबल, विजयी व पराक्रमी असलें तरी त्यास राष्ट्रीय ऋण सपाटून झाले होतें. त्यामुळें त्याचा कोष रिता पडला होता व इंग्लिश प्रजा कराच्या ओझ्याने अगदी दडपून गेली होती. तात्पर्य, इंग्लंड द्रव्याच्या अडच- णींत चांगलेंच सांपडलें होतें. अशा स्थितींत राजा व पार्लमेंट यांच्या चौकस दृष्टीला वसाहतींचें वाढतें वैभव फार भडक दिसूं लागलें, यांत नवल तें काय ? तात्काळ त्यानी सत्ताबलावर त्याचें द्रव्यशोषण करण्याचें ठरविलें. वास्तविक वसाहतींचा जन्म इंग्लंडकडून झालेला ! यामुळें वसाहतींतील बहुसंख्याक लोक इंग्लंडला मातृभूमि मानून तिला मोठ्या प्रेमादराने पाहात व तेथील राजाविषयी त्याना चांगली निष्ठा होती. तेव्हा राजा व पार्लमेंट यांनी आपली द्रव्याची अडचण वसाहतींना कळवून त्यांच्याकडून सामोपचाराने व आपुलकीच्या नात्याने द्रव्यसाह्य मागितलें असतें तर तें आनंदाने मिळालें असतें; पण असें नमते मिळतें घेतल्यावर मग इंग्लंडच्या प्रतापी सत्तेचें माहात्म्य तें काय राहिलें ? म्हणून त्याने जुलमी कायदे व अन्यायी कर याच्या साह्याने वसाहतींकडून द्रव्य काढण्याचें योजिलें. वसाहतींना ज्या सनदा देण्यांत आल्या होत्या व अमेरिकनांना इंग्लिश नागरिकाचे जे अधिकार होते, त्याअन्वयें राजा किंवा पार्लमेंट यांना वरील अन्याय करतांच येत नव्हता; परंतु त्याविषयीं त्यांनी कधी विचारच केला नाही. विल्यम पिट उर्फ लॉर्ड चॅथॅम यासारखे अमेरिकनाचे काही हितचिंतक वगळतां बाकीचे पार्लमेंटांतील लोक अमे- रिकेला आपली मत्ता मानीत होते. या लोकांचें असें मत बनविण्याचें श्रेय अमेरिकेच्या अन्नावर पोसलेल्या इंग्लिश सत्ताधाऱ्यांनी संपादिलें होतें. अलीकडे दोनतीन वसाहती सोडून बाकीच्या साऱ्या वसाहती राजसत्तांकित

झाल्या होत्या. यामुळें तेथील कारभार चालविण्यास इंग्लंडमधून फार मोठ्या अधिकाऱ्यांचा भरणा तिकडे होत असे. अशा अधिकाऱ्यांत बक्लें किंवा अँड्रॉसच फार असत. सत्ता गाजवून राज्योपभोग घेण्याची त्यांना प्रबल इच्छा असे. पण ती पार पडणें कठिण झालें होतें. या सर्व वसाहतींना आपलें प्रतिनिधिमंडळ स्थापून कायदेकानू करण्याची व कर बसविण्याची मुभा मिळाली असल्यामुळें व इंग्लिश अधिकाऱ्याचें वेतन देणें, कमी करणें किंवा वाढविणें हें त्याच प्रतिनिधिमंडळाच्या हातांत असल्यामुळें, इंग्लिश अधिकाऱ्यांना फारशा गमजा करतां येत नसत व या प्रतिबंधाचें त्याना फारफार वैषम्य वाटे. म्हणून ते वसाहतींच्या स्वातंत्र्याचे पक्के दुष्मन बनत आणि स्वदेशीं परत आल्यावर अमेरिकन वसाहतींची व तेथील लोकांची यथेच्छ निंदा करीत. " अमेरिकन वसाहतींना भलतेंच स्वातंत्र्य देण्यात आलें आहे. त्यामुळें तेथील लोक फार लाडावून गेले आहेत. ते इंग्लंडला मुळीच जुमानीत नाहीत. त्यांच्या मनांत खरी राजनिष्ठा नाही. पार्लमेंटने या गोष्टीकडे लक्ष देऊन साऱ्या सनदा रद्द करून टाकल्या पाहिजेत व अमेरिकन लोकांना दिलेले अधिकार काढून घेतले पाहिजेत. या गोष्टी जर होत नसतील तर वसाहतीवर आमची सत्ता आहे, असा टेंभा मिरवण्यांत इंग्लंडला काहीच भूषण नाही."—इत्यादि प्रलाप एका अधिकाऱ्याकडून निघत; तर दुसरा म्हणे, " माझी नाही त्याबद्दल एवढी तक्रार. अमेरिकन लोक ब्रिटिश प्रजाजन आहेत, तेव्हा त्यांना ते अधिकार असोत परते. पण मला चमत्कार वाटतो तो हा की, आम्हाला इथे इंग्लंडांत पदोपदीं द्रव्याची टंचाई भासत असतां, पार्लमेंटने अमेरिकन वसाहतीवर काही कर का बसवू नयेत ? पै पैशाने कर बसविला तरी लक्षावधि पौंड उभे राहतील ! पण आमची पार्लमेंट अशी गलथान आहे की, तिला नाकासमोरचा मधाचा कांदा दिसत नाही ! " यावर तिसरा म्हणे, " मी तुमच्याशी या बाबतींत पूर्ण सहमत आहें. पण माझी मुख्य तक्रार आपल्यासारख्या अधिकाऱ्यांच्या वेतनाबद्दल आहे. अहो, इंग्लंड सोडून आम्ही इतक्या दूरदूर पल्ल्यावर जायचें आणि वेतन काय म्हणाल तर म्हणे हजार दोन हजार पौंड ! हा का न्याय, का कायदा, का प्रजेचे हित म्हणायचें ! म्हणायचें तरी काय ? आमचे अधिकार वाढवून बघा म्हणावें. मग आम्ही

आहोंत न् अमेरिकेच्या त्या लोकसभा आहेत. पाहूं मग वेतन वाढवायला त्या कशा नाकबूल होतात!—" यावर आणखी एक म्हणे, "अरे पण मित्रा, मिशीवर इतका पीळ देण्याचें कारणच नाही. अमेरिकन लोक आपली सत्ता मानण्यास, प्रतिष्ठा ठेवण्यास किंवा कर भरण्यास नाखूश आहेत, असें का तुला वाटतें? नाही, मित्रा नाही. वाटेल तितके कायदे, कर लादून घेण्यास व आमच्यासारख्याची सत्ता मानण्यास ते लोक मनापासून उत्सुक आहेत. पण आमच्या पार्लमेंटचें तिकडे लक्ष जाईल तर शपथ." तीन धूर्तांच्या कथेप्रमाणे हे लोक वसाहतीकडे पाहण्याची इंग्लंडची दृष्टि व विचार करण्याची मनोभूमिका एका विशिष्ट वळणाची बनवीत होते. कालांतराने ही त्यांची खटपट यशाला येत चालली. अमेरिकन वसाहतींवर कायदे व कर लादण्याच्या सूचना पार्लमेंटमध्यें मधून मधून डोकावूं लागल्या.

यावरून असे मानण्याचें कारण नाही की, राजा व पार्लमेंट यानी वसाहतींना मोकळ्या अंगाने वाढूं दिलें होतें. तसा प्रकार मुळीच नव्हता. उलट त्या फारशा प्रबल किंवा स्वतंत्र होऊं नयेत, लुल्या पांगळ्या राहून सदैव आपल्यावर अवलंबून असाव्या अशी कारवाई प्रथमपासून रचण्यात आली होती. व्यापार व उद्योगधंदे या बाबतींत वसाहतींवर लादलेले कायदे इतके विलक्षण होते की, त्यानी जर ते खरोखरीच पाळण्याचें योजिलें असतें, तर ओझ्याच्या बैलापलीकडे त्यांची योग्यता गेली नसती. अमेरिकनानी शेतातून तंबाकूचे पीक वाटेल तेवढें काढावें पण त्यानंतर सिगारेट्स बनविण्याच्या भानगडींत पडूं नये. ताग, रेशीम, कापूस व लोकर यांची पैदास करवेल तेवढी करावी; पण त्यापासून उंची वस्त्रें निर्माण करण्याचें मनांत आणूं नये. खाणींतील लोखंड यथेच्छ उपसावें पण पुढे त्यापासून साधे खिळेमोळेही तयार करूं नयेत. तात्पर्य कोणत्याही कच्च्या मालापासून कसलाही पक्का माल त्यानी तयार करूं नये असा निर्बंध होता. इंग्रजी बायबलाच्या प्रती घरोघर लागत. पण त्या अमेरिकन प्रेसमध्यें छापण्याची कडक मनाई होती. जी स्थिति उद्योगधंद्यांची तीच अंतर्गत व्यापाराची. कोणत्याही एका वसाहतीने दुसऱ्या कोणत्याही वसाहतीला कसलाच माल पुरवावयाचा नाही किंवा व्यापारी देवघेव करावयाची नाही असाही एक कायदा होता. थोडक्यांत सांगा-

वयाचें म्हणजे इंग्लंडमधील व्यापारी, कारखानदार, पेढीवाले, अडत्ये, कसबी लोक, शेतकरी, मालाची वाहतूक करणारे व मजूर यापैकी कोणाच्याही उद्योगधंद्याआड किंवा हिताआड न येतां अमेरिकन वसाहतींनी आपला कारभार चालवावा आणि सारा कच्चा माल इंग्लिश व्यापाऱ्याच्या पदरांत ओतून त्याना प्रार्थना करावी की, “ बापहो, आता याचा पक्का माल इंग्लंडांतून बनवून आणा. आम्ही स्वतंत्रपणें काही करणार नाही. तुमचा संसार सुखाने चालवावा हेंच आमचें जीवितध्येय ! ”

इतका निर्बंध असूनही पुन्हा त्यास ‘ नॅव्हिगेशन लॉ ’चें ( नौकानयन कायद्याचें ) साह्य देण्यात आलेंच होते. या कायद्याचा मुख्य हेतु हॉलंडच्या समुद्रावरील व्यापाराला आळा घालावा असा असला तरी त्याचा पहिला दुष्ट परिणाम अमेरिकन लोकांना भोगावा लागत होता. वसाहतींच्या आयात निर्गत व्यापाराचीं सारीं सूत्रे इंग्लिश व्यापाऱ्याच्या हातीं गेल्यामुळें त्या बलावर त्यानी बाहेर नेण्याचा माल खुशाल पाडून मागावा आणि परदेशांतून आणिलेला माल वाटेल तितक्या महाग किमतीला विकावा ! कोणी जाब विचारता नाही. अशा काटेरी जाळ्यातून कोणत्या वसाहतवाल्यास आपले डोकें वर काढतां आलें असतें ? परंतु तेथील लोकांनी उघडपणें, किंवा चोरून मारून, लाच देऊन किंवा बेदरकार वागून वरील सारे कायदे धाब्यावर बसविले होते व आपला उत्कर्ष साधून घेतला होता. अमेरिकन लोकाचा हा बेकायदेशीरपणा इंग्लंडला किंवा त्याने वसाहतींवर धाडलेल्या गव्हर्नरादि सत्ताधिकाऱ्यांना दिसत नव्हता असें नाही; पण खुद्द वसाहती बालवयांत असल्यामुळें त्याचे एतद्विषयक प्रयत्न इंग्लंडच्या व्यापारास फारसे बाधक झाले नाहीत. दुसरी गोष्ट, राजा व पार्लमेंट निरनिराळ्या राजकारणांत गुंतल्यामुळें त्याना या घरच्या गोष्टीकडे चौकसपणें पाहण्यास सवड झाली नाही. आणि तिसरी गोष्ट, वसाहतीवरील सुलतानी नोकरशाहीला लाच खाण्यास भरपूर वाव असल्यामुळें त्यांनीही त्यासंबंधीं उचल केली नाही. यामुळें अमेरिकन लोकाना समृद्ध होण्यास चागली संधि मिळाली. पण म्हणतात ना, सर्व काल सारखा राहात नाही. त्या नियमास अनुसरून अमेरिकनांचा भाग्यकाल पालटला व संकटाचे नवे मेघ उठूं लागले.

इंग्लिश–फ्रेंच युद्धांत इंग्लंडहून आलेले गव्हर्नरादि अधिकारी, सैन्य व सैन्याधिकारी काय किंमतीचे असतात, हें अमेरिकन लोकांना फार चांगलें समजून चुकलें होतें. त्याची बडेजाव त्यांनी पूर्वीही फारशी मानली नव्हतीच; पण थोडासा भ्रम होता तोही आता नाहीसा झाला. अमेरिकन लोकांच्या मनावरून आपल्या प्रतिष्ठेचा बोज साफ उडालेला पाहून त्या सुलतानशाही अधिकाऱ्यांना मनातून भारी दुःख झालें ! शरमिंदेपणा व मानहानि या कातरींत सापडून ते अगदी चिडून गेले व त्यानी एकमत होऊन अमेरिकन लोकाचे उट्टें काढण्याचें ठरविलें !

युद्ध संपलें. तिसऱ्या जॉर्जची कारकीर्द सुरू झाली. अशा संधीला अमेरिकेच्या वरील हितशत्रूंनी आपला नगारा पिटण्यास सुरुवात केली. दैवयोगाने याच वेळीं राजाचें व थोरल्या पिटचें न पटल्यामुळें त्यास राजीनामा देऊन घरीं बसावें लागलें होतें. वसाहतींची कड घेऊन भांडणारा व कोणाचीही ताप चालूं न देणारा हा एवढाच काय तो मुत्सद्दी ! तो काटाही राजाने काढून टाकल्यामुळें वरील गणांचा मार्ग निष्कंटक झाला. पार्लमेंटमध्ये राजाच्या कलानुसार वागणाऱ्या जोहुकुमी हुजूरपक्षाचें प्राबल्य माजलें. मुख्य प्रधानपद राजाचा स्तुतिपाठक ब्यूट याने पटकावलें. ग्रेनव्हिल हा आरमारी खात्याचा मुख्य होता. त्यालाच पुढे कोषाध्यक्षाचे काम देण्यांत आले. याचा हस्तक हॅलिफाक्स. एके-काळी हा एका वसाहतीवर गव्हर्नर म्हणून गेला होता व तेथे अमेरिकन लोकाना अत्यंत अप्रिय होऊन व त्याच्याकडून अपमान पावून परत आला होता. याचाच मित्र टाऊनशेंड. हा पार्लमेंटमध्यें बसून अमेरिकन वसाहतींचा कारभार पाही. हा स्वतः अमेरिकेंत कधीच गेला नाही. तरी त्याला अहंकार असा की, वसाहतींची व तेथील लोकांची नस न् नस आपण जाणतों. याचा एक भाऊ फ्रेंचयुद्धाचे वेळीं अमेरिकेंत गेला होता. तो अमेरिकनाचा मनापासून द्वेष करी. तेव्हा त्याने जी माहिती चार्लस टाऊनशेंडला पुरवली, तीच त्याच्या अहंकाराचा आधार ! लॉर्ड नॉर्थ हा बोर्ड ऑफ ट्रेडचा–व्यापारी खात्याचा–मुख्य. हाही वरील लोकांच्या पंक्तींत शोभण्यासारखा. यामुळें वसाहतीचा वाली कोणी राहिला नाही आणि त्यांचें नशीब फिरलें. असो.

आता राजा व पार्लमेंट यांनी ठरविलें की, वसाहतीच्या बेकायदे-शीरपणाकडे बिलकूल दुर्लक्ष करावयाचें नाही. व्यापार उद्योगधंद्या-बाबतचे पूर्वीचे कायदे व 'नॅव्हिगेशन लॉ' याची अंमलबजावणी कडकपणें सुरू करावयाची. प्रजेला अप्रिय असे कायदेकानू तिच्याकडून पालन करून घ्यावयाचे म्हणजे त्यांत सक्तीचा व दंडुकेशाहीचा उपयोग करणें भागच पडतें. याकरितां दहा हजार सैन्य तिकडे पाठविण्याचें ठरलें आणि पूर्व किनाऱ्याच्या संरक्षणार्थ एक आरमारी काफिलाही रवाना करण्यांत आला. नंतर वसाहतींतील साऱ्या लहान मोठ्या अधिकाऱ्यांना जादा अधिकार देऊन हुकूम सोडण्यांत आले की, अमेरिकन लोकाना कायदे-शीर वागण्यास शिकवा. लष्कर व आरमार यांचें साह्य तुम्हास भरपूर मिळेल. "चला प्रजेला कायदा शिकवा व मिळेल तेवढें द्रव्य इकडे पाठवा !"

राजा व पार्लमेंट यांची ही नवी तयारी पाहून अमेरिकेच्या हित-शत्रूंना कितीतरी हायसें वाटलें आणि सत्तेचा दुरुपयोग करण्यास चटा-वलेल्या व प्रजेचा सूड घेण्यास टपलेल्या अरेरावी अधिकाऱ्यांना तर काय स्वर्ग हातीं आल्याप्रमाणें परमानंद झाला ! पण तिकडे अमेरिकन लोकांना मात्र इंग्लंडच्या या नव्या मनोवृत्तीचें सखेदाश्चर्य वाटलें. या घटकेपर्यंत त्यांची अशी खात्री होती की, इंग्लिश नागरिकास जें स्वातंत्र्य व इतर अधिकार आहेत, तेच आपल्यासही आहेत. अर्थात् त्याअन्वयें आपल्या संमतीवाचून कोणीही आपल्यावर कोणताच कायदा लादूं शकत नाही किंवा आपल्यावर अधिकार गाजवूं शकत नाही. पण आता ते पाहतात तों काय ? पूर्व किनाऱ्यावर इंग्लंडचें आरमार पहारा करूं लागलें होतें, बंदराबंदरातील जकातकचेऱ्या डोळ्यात तेल घालून बसल्या होत्या, मोठमोठ्या व्यापारी पेठांनजीक लष्कराचे तळ पडले होते आणि सारे अधिकारी मिशीला पीळ देत गुरकावूं लागले होते ! हा काय प्रकार आहे, या सुलतानशाहीचा अर्थ काय ? याचा जाब वसाहतवाले विचा-रणार तों झडत्या, धरपकड यांची धुमश्चक्री चालू झाली सुद्धा ! असल्या धामधुमींत सत्ताधिकाऱ्याना Writs of Assistance 'सहायकारी शासन-पत्रें' नांवाचें एक नवें शस्त्र देण्यात आलें. झडती वारंटाचा हा एक जहाल नमुना होता. साध्या झडती वारंटाला कांही नियम आहेत; पण हें 'रिट्स' वारंट अगदी बेबंद होतें, याचे कोरे फॉर्म साध्या शिपाया-

पासून ते गव्हर्नरापर्यंत सर्वांना भरपूर पुरवण्यांत आले होते. त्यांच्यापैकी ज्याना सूड घ्यावयाचा असेल, किंवा द्रव्याचा लोभ असेल किंवा कोणा कामिनीशीं अतिप्रसंग करावयाचा असेल त्यांनी खुशाल त्या वारंटाना उपयोग करावा. आणि कायदा व सुव्यवस्था ठेवण्याच्या नांवाखाली यथेच्छ गोंधळ घालावा. वरून ठपका येण्याची धास्ती नव्हती. खालून प्रजेला दाद मागण्यास वाट ठेवण्यांत आली नव्हती. एकाएकी अवतरलेल्या या आपत्तीने आपल्या स्वातंत्र्यास जिवापलीकडे जपणाऱ्या स्वाभिमानी अमेरिकन लोकाना काय वाटलें असेल याची कल्पना वाचकांनीच करावी.

पण जार्ज राजा व त्या वेळचें मंत्रिमंडळ यांनी तसा काही विचार केलाच नाही. आम्ही मालक व वसाहती आमचीं कुरणें. त्याची व्यवस्था आम्ही वाटेल ती करूं. अमेरिकन लोकानी नी मुकाट्याने मान्य केलीच पाहिजे. अशी त्याची आढ्यता. म्हणून त्यानी तिकडे तो वणवा लावून दिल्यानंतर पुढे वसाहतींच्या माथीं कर कोणकोणते बसविता येतील, आधी कोणते बसवावे व मागून कोणते लादावे, याची वाटाघाट चालू केली. इंग्रज लोक कायद्याचे मोठे भोक्ते ! व्यक्तीचा साधा जीवनक्रम असो किंवा राष्ट्राचें मोठें राजकारण असो, त्यांतील प्रत्येक लहान मोठ्या बाबीसंबंधीं आधी एवढा तरी कायदा पाहिजे. मग पुढील हालचाल. पिसाळलेल्या कुत्र्याला गोळी घालावयाची असली किंवा मंगळावर एखादें विमान धाडावयाचें असलें तरी या दोन्ही बाबतींत अगोदर कायद्याची आंखणी व मग प्रत्यक्ष कार्याची जुपी ! जी दक्षता कायद्याच्या रचनेसबंधीं तीच त्याच्या भाषेसबंधीं. उगीच सरळ अर्थवाहक शब्दरचना असावयाची नाही. रेशमाप्रमाणे मृदु व रबराप्रमाणें लवचीक असे वेचक शब्द आणि खुबीदार व पिळदार अशी त्यांची जुळणी ! असो. वसाहतीविषयीं नवा विचार करिताना इंग्लिश मुत्सद्यानी अमेरिकनांच्या संमतीची थोडी चाचणीही घेतली नाही. आपण करूं ते कायदे पाळण्यास व आपण लादूं ते कर हसतमुखाने भरण्यास ते लोक उत्सुक आहेत अशीच त्यांची कल्पना !

त्या भ्रमांतच त्यानी माहिती गोळा केली, आपसांत विचारविनिमय केला आणि नंतर ग्रेनव्हिल या कोषाध्यक्षाने स्टँप ड्यूटी बसविण्याकरितां **स्टँप ॲक्टची** रचना करून तो कायदा पार्लमेंटपुढे आणला ! या कायद्याप्रमाणें अमेरिकन वसाहतींतील प्रत्येक नागरिलाला कोणत्याही

कारणानिमित्त जे दस्तऐवज करावयाचे असतील, विवाह नोंदावयाचे असतील किंवा कोर्टांकचेऱ्यांतून भांडणें भांडावयाचीं असतील, त्या प्रत्येक वेळीं इंग्लिश पार्लमेंटने काढलेल्या स्टांपावर किंवा त्या धर्तींचीं काढलेलीं तिकिटें साध्या कागदावर लावून त्यावरच व्यवहार केला पाहिजे. तरच तो कायदेशीर समजला जाईल. एरव्ही नाही. असा हा कायदा होता. तो अंमलात आल्यास दरवर्षी साठ हजार किंबहुना त्याहून जास्त पौंड जमणार होते! साध्या कागदी चिटोऱ्यावर एक एवढासा छाप मारून जर एवढी मोठी रक्कम उभी राहणार होती, तर त्या वेळच्या अदूरदर्शी मुत्सद्यास ही कृति बेहद्द पसंत पडावी यात नवल तें काय? ग्रेनव्हिलच्या या मसुद्याची राजाने व त्याच्या भोवतालच्या ग्रहानी मनसोक्त प्रशंसा केली व त्यास मान डोलवली! या काळीं प्रत्येक वसाहतीतर्फे एकेक मुखत्यार इंग्लंडमध्यें राहात असे. त्यांनाही मग पाचारण करण्यात आलें. या मुखत्यारात बेंजामिन फ्रांकलिनही पेनसिल्व्हानिया वसाहतीतर्फे होता. त्यास व त्याच्या बरोबरीच्या बहुतेक सहकाऱ्यांस अमेरिकन लोकांच्या संमतीवाचून असा कर त्यांवर लादणें मंजूर नव्हतें. त्यानी त्याचा तात्काल निषेध केला. पण ग्रेनव्हिल तेवढ्या वर मूग गिळून बसणारा नव्हता. त्याने सामदामादि प्रयोग सुरू केले. वसाहती इंग्लंडचीं अपत्यें. त्यानी वयात आल्यावर मायदेशाला साह्य केले पाहिजे. या कराने जमलेला सारा पैसा आम्ही अमेरिकेंत अमेरिकनांच्या कल्याणाकरितांच खर्च करणार आहों. शिवाय हा कर गोळा करण्याकरितां सारे कामगार आम्ही अमेरिकनच ठेवणार. स्टॅंप विकणारे लोक सुद्धा अमेरिकनच. आमचा तसा संबंध कांहीं असणार नाही. मग सांगा यात तुम्हाला काय त्रास आहे? आणखी एक गोष्ट. हा एक कर तुम्ही मान्य केलात तर तुमच्या इतर उद्योगधंद्याला आम्ही इतर केवढ्या तरी सवलती देणार आहोंत. इत्यादि साखर त्याने त्या मुखत्यारांच्या मनावर पेरली आणि लगेच स्टॅप विकण्यास प्रतिष्ठित नागरिक कोण कोण आहेत, याची याद मागितली. या मधुर भाषेने कांही मुखत्यार विरघळले! पण बेंजामिन फ्रांकलिनने त्याचा पुन्हा निषेध करून म्हटलें, "अमेरिकन लोकांना इंग्लिश नागरिकत्वाचे जे अधिकार आहेत त्यांअन्वयें पार्लमेंटला किंवा राजाला असे कर लादतांच येत नाहीत म्हणून

आम्हास ते मंजूर नाहीत. आणि महाराज, हा कर गोळा करण्याकरितां अमेरिकन लोकच नेमण्याची जी आपली उदारबुद्धि आहे, तिच्यातील खोच न कळण्याइतके आम्ही भोळे नाहीं. आमच्या देशबांधवांना द्रव्य-लोभ दाखवून त्यांच्या हातून आमच्या गळयावर सुऱ्या चालविण्याचा आपला मनसुबा आहे, हें आम्ही जाणतों. पण ध्यानात ठेवा, एकही अमेरिकन या कराला संमति देऊन आपल्या स्वातंत्र्याला नख देणार नाही." त्याच्या या स्पष्टोक्तीने ग्रेनव्हिल थोडासा चपापला, तरी त्याने पुन्हा म्हटलें, "हें पहा, याच कराविषयीं तुमचा एवढा दुराग्रह असेल तर आम्ही तो बाजूला ठेऊं. तुम्ही दुसरा एखादा सुचवा. आमची इच्छा एकच आहे की, यापुढे वसाहतीवर काहीना कांही कर बसवा-वयाचेच. पार्लमेंटला तो अधिकार आहे. तुम्ही म्हणता पार्लमेंटमध्यें आमचे प्रतिनिधि नाहीत. पण हा निव्वळ गैरसमज आहे. पार्लमेंट ही खास जशी तुमची नाही तशीच आमची नाही. ती आपणा सर्वांची आहे व आपणा सर्वांचा राजाही पण एकच आहे. तेव्हा या दोघांचा अधिकार व सत्ता तुम्हाला मानली पाहिजे." पण यालाही फ्रांकलिन कबूल होईना. असो.

इकडे इंग्लंडात फ्रांकलिनने या नव्या कराकायद्यासंबंधीं जेवढा निषेध दर्शविला त्याच्या अनेक पटीने वसाहतींनी दर्शविला! आधीच्या कायद्यांच्या कडक अंमलबजावणीने त्रस्त झालेल्या अमेरिकन लोकाना जेव्हा हें कळलें की, आपल्या माथीं आणखी नवे कायदे व कर येऊं पाहात आहेत, तेव्हा त्यांच्या क्रोधास सीमा राहिली नाही! अमेरिकन वर्तमानपत्रातून या अन्यायाविरुद्ध कडक टीका येऊं लागली व लोक-जागृतीचें कार्य झपाट्याने सुरू झालें. बोस्टनचा प्रख्यात पुढारी व साऱ्या अमेरिकन लोकांना वंद्य झालेला साम्युएल आडाम्स याने अत्यंत निर्भयतेने "इंग्लंडचें हें कृत्य बेकायदेशीर आहे!" असें जाहीर रीत्या सांगितलें. हेन्री लीने "याचा परिणाम भयंकर होईल. इंग्लंडने वेळींच सावध व्हावें," म्हणून बजावलें. राबर्ट लिव्हिंगस्टन नांवाच्या एका पुढाऱ्याने आरोळी ठोकली, "सांभाळा रे बाबांनो! हा स्टॅंप कर उंटाचें पिल्लूं आहे. एकदा घरांत घुसलें की मग जड जाईल!" अशा प्रकारें प्रत्येक मोठ्या माणसाने ह्या कराचा निषेध चालविला. पॅट्रिक हेन्री व

जेम्स ओटीस या दोघा वक्त्यांनी आपल्या भाषणांमधून इंग्लिश मंत्र्याच्या ह्या जुलमी वर्तनावर नुस्ता अग्निवर्षाव केला आणि तद्विरुद्ध अमेरिकन लोकांचीं मनें खळबळून सोडलीं! ओटीस, कशिंग, थॅचर, ग्रे, शीफ इत्यादि लोकानी आपली कमेटी नेमून साऱ्या वसाहतींतून ही चळवळ रीतसर चालू केली. तात्पर्य, अमेरिकनांची मनोभूमि पुढच्या स्वातंत्र्य-संग्रामाला फार लौकर तयार झाली!

कर व कायदा लागू होण्यापूर्वी अमेरिकन लोकांनी त्यासंबंधीं इतका क्रोध व तिरस्कार दाखविला असतांही राजा किंवा पार्लमेंट यानी तिकडे बिलकूल लक्ष दिलें नाही. दंडुकेशाहीच्या जोरावर अमेरिकन लोकांवर हा बोजा आपण लादूंच लादूं असा त्याना विश्वास होता. आणि म्हणून त्यांनी पुढची चिंता न करिता इ.स. १७६५ मध्यें स्टॅप ॲक्ट पास केला आणि स्टांपाचीं जहाजें भरून अमेरिकेकडे रवाना केलीं! जो कोणी या कायद्याच्या विरुद्ध जाईल किंवा कराविरुद्ध बोलेल त्यास साध्या न्यायदानाच्या खटाटोपात न पडताच तुरुंगात कोंबण्याची व्यवस्था अगाऊच केली होती. स्टॅप व्हेंडर अमेरिकनच निवडले होते. प्रत्येकाने एखादें तिकीट किंवा स्टांप खपविला तरी त्यास मोठें पारितोषक मिळणार होतें. काही श्रीमंत द्रव्यलोभी अमेरिकनाना आंतून मलिदा चारून स्टांप कराचे गुणानुवाद गाण्यास ठायीं ठायीं पेरून ठेविलें होतें. तात्पर्य, तो कर तात्काळ कोठे ना कोठे तरी रुजावा व नाठाळपणा करीत का होईना पण अमेरिकनांनी तो मान्य करावा म्हणून इंग्लंडने भारी भारी तयारी केली होती. परंतु स्टांपाचीं जहाजें बंदरात येण्याचा अवकाश! दारूच्या कोठारांत ठिणगी पडल्याप्रमाणें भडका उडाला! इंग्लंडने पेरून ठेविलेल्या हस्तकांखेरीज अबालवृद्ध अमेरिकन खळबळून उठला! स्त्रिया व मुलें यांनी सुद्धा त्या कराला मूठमाती देण्याकरिता आपले प्राण तळहातावर घेतले! स्टॅप विकणाऱ्याचें, त्याची स्तुति करणाऱ्यांचे व ते कोणत्या ना कोणत्या हेतूने खरेदी करूं पाहणाऱ्या भोळ्या भावड्या लोकांचें जीवित धोक्यात आलें! त्याचीं घरें दारें लुटण्यात व जाळण्यापोळण्यांत आलीं आणि त्या कायद्याच्या प्रतिकूल बोलण्याने जें प्रायश्चित्त मिळणार होतें, त्याच्या अनंतपटीने जास्त अनुकूल बोलण्याने मिळूं लागलें! जनतेचें हें विराट्स्वरूप पाहून इंग्लंडचे अधिकारीही

थिजल्याप्रमाणें झाले व लष्करी लोकानाही शस्त्रास हात घालण्याची हिंमत होईना! ही वस्तुस्थिति इंग्लंडात कळताच थोरल्या पिट्ला मोठा आनंद झाला! ग्रेनव्हिल–त्या कायद्याचा जनक–मूर्ख ठरला व पार्लमेंटला तो कायदा माघारा घ्यावा लागला! लोकांच्या क्रोधानलातून बचावलेला स्टांपाचा माल परत आणण्यांत आला.

अमेरिकन लोकानी पहिला डाव तरी जिंकला!

---

## प्रकरण एकोणिसावें

# तडजोडीचे प्रयोग विफल ठरले

मोठ्या धूर्ततेने जन्मास घातलेला स्टाप कायदा व कर अमेरिकनानी एकजुटीने व अत्यंत संतापाने लाथाडल्यामुळें राजा व पार्लमेंट यांनी बिचकून थोडें पडतें घेतले तरी त्या मानहानीचे त्यांना मनापासून दुःख झाले. आपल्याकडून अमेरिकन लोकाच्या कोणत्या कोमल भावना दुखावल्या आहेत व त्या कशा निरामय करतां येतील याचा विचार सुद्धा न करता, वसाहतीमध्ये निर्माण झालेली स्वातंत्र्यसंरक्षणाची चळवळ दडपशाहीच्या जोरावर निर्मूल करण्याचा त्यांनी निश्चय केला आणि त्यास अनुसरून त्यानी स्टांप कायदा परत घेतला त्याच वेळेस Declaratory Act नावाचा जाहीर घोषणेच्या स्वरूपाचा एक नवा कायदा जन्मास घालून तो वसाहतीच्या माथीं मारला! त्या द्वारे त्यांनी अमेरिकनांस बजावलें की, "तुम्ही स्वत:संबंधी वाटेल त्या वल्गना करा पण तुमच्यावर सत्ता गाजविण्याचा अखेरचा अधिकार इंग्लिश पार्लमेंटलाच आहे!"

नव्या कायद्यामागून नवे करही उपस्थित झाले. वसाहतींच्या आयात व्यापारापैकी जीवनास आवश्यक असणाऱ्या अनेक पदार्थांवर जकात बसविण्यांत आली. व तिच्या उत्पन्नांतून अमेरिकेंत ठेविलेल्या इंग्रज सैन्याचा खर्च चालविणें, द्रव्यलोभी लोकांना मलिदा चारून घरभेदेपणा जारी करणें व इंग्लंडतर्फे नेमिलेल्या गव्हर्नरादिकांचे पगार वाढवून त्यांनाही विशेष मस्तवाल बनविणें इत्यादि गोष्टी करण्याचें ठरलें.

म्हणजे सत्ताबलावर अमेरिकन लोकाकडून द्रव्य काढून तें पुन्हा त्यांनाच काबूंत ठेवण्यासाठी खर्च करण्याचें हें इंग्लंडचें धोरण होतें. वसाहतींमध्ये भडकलेला लोकक्षोभ या उपायांनी कसा शमणार होता हें त्यांचें त्याना माहीत. असो.

या नव्या हिकमतीची दुर्दशा स्टाप कायद्याप्रमाणे होऊं नये म्हणून जो लष्करी बंदोबस्त करण्यात आला, त्यांत बोस्टन नगरावर मोठी कडक शिस्त धरण्यात आली. हें स्थान स्वातंत्र्यप्रिय मासाच्युसेट्स संस्थानची राजधानी, एक प्रमुख व्यापारी बंदर व सॅम्युएल आडाम्स या लोकप्रिय पुढाऱ्याचें निवासस्थान या तीन महत्त्व प्राप्त करून देणाऱ्या कारणांमुळे साऱ्या चळवळीचें केन्द्र बनलें होतें. तेव्हा तेथे आपल्या लष्करी सत्तेची मेख मारून ठेवल्यास तें विशेष शहाणपणाचे होईल असें इंग्लिश मुत्सद्याना वाटलें. म्हणून जनरल गेज यास सैन्यासह तेथे जाऊन तळ देण्याचा हुकूम फर्मावण्यात आला. गेज अमेरिकन लोकांचा पक्का द्वेष्टा असल्यामुळें त्यास ही कामगिरी फार मानवली. त्याने सैन्यासह मोटया दिमाखाने बोस्टनला येऊन भर मध्यवस्तींत तळ दिला. नगरवासीयाना या गोष्टीची अर्थातच मोठी चीड आली. त्यानी गेज व गव्हर्नर हचिनसन या दोघानाही "सैन्य काढून न्या, नाहीतर त्याचे दुष्परिणाम सर्वांसच भोगावे लागतील," म्हणून बजावलें. परंतु त्याच्या तीव्र निषेधाचा त्यानी काहीच विचार केला नाही. पुढे जें व्हावयाचे तेंच झालें. उद्दाम ब्रिटिश सैनिक व उद्धत अमेरिकन नागरिक याच्यामध्ये कुरापती सुरू झाल्या आणि शेवटीं इ. स. १७७० मध्यें इतिहासप्रसिद्ध **बोस्टनची कत्तल** घडली! ब्रिटिश सैनिक व बोस्टनचे नागरिक यांच्यांत चकमक झडून बोस्टनचे तीन लोक ठार व व दहा बारा जखमी झाले! हा घोर अपराध बोस्टनवासीयानी अणुमात्र सहन केला नाही. त्यापायीं सारें नगर खळबळून उठलें व त्याच्या पाठीशीं संबंध मासाच्युसेट्स संस्थान उभें राहिले. या लोकक्षोभाचा परिणाम असा झाला की, गव्हर्नर हचिन्सन व सेनापति गेज यांचा ताठा थोडासा उतरला. त्याना नगरातून सैन्य काढून न्यावें लागलें व अपराध्यांना न्यायासनासमोर खेचून त्यांस तुरुंग दाखवावा लागला. परंतु बोस्टनचे नागरिक एवढ्यावरच स्वस्थ बसले नाहीत. नवा कायदा व नवा कर

यांना मूठमाती देण्याचे महत्त्वाचें कार्य अद्यापि शिल्लक होतें. त्यांनी इंग्लंडमध्यें तयार झालेला माल वापरावयाचा नाही असा दृढ संकल्प केला व स्वदेशीचा प्रसार जोराने चालविला. अल्पकालातच हें आदोलन इंग्रज व्यापाऱ्याना जाणवूं लागलें. हें यश पाहून अमेरिकनांनी आणखी नेट धरला. आडाम्सच्या नेतृत्वाखाली आपली चळवळ सर्वतोमुखीं व सर्व संस्थानात व्हावी असा उपक्रम करण्यात आला. या कार्याप्रीत्यर्थ आडाम्स व त्याचे सहकारी मित्र यानी 'पत्रव्यवहार-समिति' नावाची एक अभिनव संस्था अस्तित्वात आणिली. परस्पर पत्रव्यवहार करून सार्वजनिक कल्याणाचे प्रश्न विचारपूर्वक सोडवावयाचे असा या संस्थेचा उद्देश होता. बोस्टनच्या समितीमध्यें जी वाटाघाट होईल ती त्या समितीच्या सदस्यांनी आपल्या परस्थ मित्रांना कळवावयाची. तेथे त्यानी आपली मंडळी जमवून आलेल्या पत्राचा विचार करावयाचा व ते लोण पुढे ढकलावयाचे आणि नंतर परस्परांस उत्तरें धाडावयाची असा या संस्थेचा उपक्रम होता. अमेरिकन लोकांना ही कल्पना इतकी आवडली की, वरील समितीच्या शाखा सर्वत्र ( खेड्यापाड्यातून सुद्धा ) पसरल्या आणि त्या सर्वांच्या एकोप्या-मुळें लोकजागृतीचें कार्य झपाट्याने चालू झालें व तें एकसूत्रांतही राहिलें.

अमेरिकन लोकानी एकमताने व एकमुखाने घातलेल्या ब्रिटिश मालावरील बहिष्काराचा आघात इंग्लंडला इतका असह्य झाला की, राजा व पार्लमेंट याना पुन्हा नमावें लागलें. त्यानी वसाहतींमध्यें येणाऱ्या मालावर लादलेल्या जकाती मुकाट्याने रद्द केल्या; परंतु अजूनही त्यांना अमेरिकन लोकावर आपला वरचष्मा ठेवण्याची खुमखुमी होती. म्हणून त्यानी वसाहतींमध्यें येणाऱ्या चहावर एक अत्यंत तुच्छ कर बस-विण्याची टूम काढली! या वेळीं अमेरिकनाना प्रतिवर्षी सुमारें पंधरा लक्ष पौंड चहा लागे. यापैकी फक्त एक दशांश ते इंग्लंडकडून खरेदी करीत व बाकीचा हॉलंडकडून घेत. यावर पार्लमेंटने अशी शक्कल का-ढली की, चहावरील कर भरूनसुद्धा हॉलंडपेक्षा इंग्लंडने पुरविलेला चहा अमेरिकन लोकांना स्वस्त पडावा. तात्पर्य, इंग्लंडचा वसाहतींना असा संदेश होता की, "पहा तुमच्याकरिता आम्ही केवढा स्वार्थत्याग करितों आहों. मग आता तुम्हाला तुमच्या संमतीवाचून बसविलेला चहावरील

कर जाचेल का?–कांहीच कारण दिसत नाही. आता उगीच शिंगें हालवूं नका. एवढा कर तुम्हाला मान्य केलाच पाहिजे!"

परंतु अमेरिकन लोकांना कर बसविण्यांतील हा भावच तर जाचत होता. राज्यकारभार चालविताना कर लादले पाहिजेत, हें अर्थशास्त्राचें साधें तत्त्व त्याना कळत नव्हतें असें थोडेंच आहे! पण त्यांचें म्हणणें असें होतें की, "ही गोष्ट आमच्या संमतीने झाली पाहिजे. आम्हांला प्रतिनिधित्व नाही तर आमच्याकडून करही मिळणार नाहीत!" म्हणून त्यानी इंग्लंडच्या नव्या योजनेचाही मनापासून धिक्कार केला व असला करयुक्त चहा एक चिमुटभरही वसाहतीमध्यें कोठेही येऊं द्यावयाचा नाही असें ठरविलें. पुन्हा एका नव्या आंदोलनास सुरुवात झाली. पण इंग्लंडने तिकडे दुर्लक्ष करून ईस्ट इंडिया कंपनीला चहा पुरवण्याचा मक्ता दिला. त्याप्रमाणें इ.स. १७७३ मध्यें कंपनीने अनेक जहाजें भरून अमेरिकेकडे धाडलीं. पैकी तीन जहाजें बोस्टनच्या बंदरांत येऊन लागलीं व बाकीचीं न्यूयार्क, फिलाडेलफिया व चार्लस्टन (कॅरोलिना संस्थान) येथे गेलीं. याचा प्रतिकार कसा करावयाचा? बोस्टनच्या नागरिकाना मोठा प्रश्न पडला. इंग्लंडकडून आलेला असला चहा घ्याव-याचा नाही याबद्दल सर्वत्र एकमत होतें व असला चहा आम्ही पिणार नाही, अशा शपथा हजारो लोकानी घेतल्या होत्या; तरीपण एकदा तो माल धक्क्यावर उतरला की, कोणातरी लोभी व्यापाऱ्याकडून तो पेठेंत घुसणार व तो पेठेंत घुसला की लोकाच्या घरात घुसणार हें निश्चित होतें. तेव्हा 'काय तोड काढावी?' या विचारात बोस्टन नगरांत उघड व गुप्त सभा होऊं लागल्या! शेवटच्या एका सभेंत आडाम्सने सांगितलें की, "कसें करूं व काय करूं हा मंत्र जपणाऱ्या नेभळट लोकाकडून देशाच्या अब्रूकरिता कांहीही व्हावयाचें नाही. मग उगीच बकवाद कशाला? इंग्रजाच्या लाथा खाण्यास तयार असा!" हें त्याचें निर्वाणीचें बोलणें काही धाडसी व आततायी लोकाना पुरेसें होतें. अशा लोकांनी रानटी इंडियन लोकांचे वेष परिधान केले आणि बंदरात घुसून चहाच्या जहाजांवर चाल केली! दोनशे लोकांची ही टोळी होती. हिने सूर्योदय होण्याचे आंत तीन्ही जहाजावरील चहा समुद्रांत फेकून दिला! अमेरिकेकडून इंग्लंडला मिळालेली **बोस्टन चहापार्टी** ती हीच होय!

'केव्हा केव्हा खाऱ्या पाण्यांत केलेला चहाही मोठा नामी होतो!' असें म्हणत वरील टोळी अंतर्धान पावली!

एकट्या बोस्टन बंदरांत इंग्लंडच्या मालकीचा तीन लक्ष रुपये किंमतीचा चहा नष्ट करण्यांत आला व याच कृतीचें अनुकरण इतरत्रही झालें! ही अशुभ वार्ता इंग्लंडांत कळतांच राजा व पार्लमेंट यांचें माथे ठिकाणावर राहिलें नाही. त्यांनी तेराही वसाहतींवर सेनापति गेज यास मुखत्यार नेमलें व बोस्टन बंदर आरमारी पहारा ठेऊन बंद करण्यांत आलें. नंतर त्यांनी घोषणा केली की, "चहाची नुकसानी भरून दिल्याखेरीज व साऱ्या अमेरिकनांनी माफी मागितल्याखेरीज बोस्टन बंदर खुलें केलें जाणार नाही व लष्करी अंमलही उठविण्यांत येणार नाही."

याबरोबरच त्यांनी दोन नवे कायदेही अमलांत आणिले. एका कायद्याने ब्रिटिश अंमलदारांनी अमेरिकेमध्यें केलेल्या कोणत्याही गुन्ह्याची चौकशी इंग्लंडमध्यें व्हावी असें ठरविण्यांत आलें व दुसऱ्याने फ्रेंच कानडा अमेरिकेस जोडून तेथील प्रजेच्या साह्याने अमेरिकन लोकांना वठणीवर आणण्याचा नवा मार्ग खुला केला.

ही भयंकर परिस्थिति पाहून अमेरिकन लोकांचा रागही अनावर झाला. त्यांनी साऱ्या वसाहतींची मिळून एक राष्ट्रीय सभा इ. स. १७७४ मध्यें फिलाडेलफिया येथे बोलावली आणि तींत पुढे काय करावयाचें हा महत्त्वाचा प्रश्न हातीं घेतला. त्याबरोबर पॅट्रिक हेन्री हा सुप्रसिद्ध वक्ता उठून म्हणाला, "बांधवांनो! विचार कसला करतां? आपणास दंडच ठोकले पाहिजेत. मी निक्षून सांगतों की, संग्रामावाचून आपणापुढे दुसरा कोणताही मार्ग नाही." त्याचें हें म्हणणें बहुतेक सर्वांना मान्य झालें. या बैठकींत वाशिंगटन होता. त्यानेही हाच मार्ग सुचविला.

वसाहतींनी स्वातंत्र्यसंरक्षणार्थ जें आंदोलन चालविलें होतें, त्यांत मासाच्युसेट्स संस्थान नेहमीच अग्रेसर असे. तेथील लोकांना राष्ट्रीय सभेचा निर्णय पूर्ण मान्य झाला. तात्काल त्यांनी गेजची लष्करी सत्ता धुडकावून दिली व आपल्यापैकीच जॉन हॅन्कॉक नांवाचा मनुष्य गव्हर्नर पदावर नेमला. हा बोस्टन येथील प्रतिष्ठित व मोठा धनाढ्य व्यापारी असून आडाम्सचा परम स्नेही होता. यानंतर त्या लोकांनी पुढील स्वातंत्र्यसंगराकरितां बारा हजार योद्धे तयार केले व इतर युद्धसामग्री

जमविली. त्या बाराहजार योद्धयांपैकी चार हजार लोक 'मिनिट मेन'—Minute Men—नावाचे स्वयंसेवक होते. युद्धाचें शिंग ऐकतांच जे एका मिनिटांत तयार होऊन धावून येतील ते 'मिनिट मेन.' पुढील युद्धात यांचा फार उपयोग झाला.

अमेरिकन लोकांची ही तयारी चाललेली पहून दंडुकेशाही गाजविण्यास उतावीळ असलेल्या गेज सेनापतीला व त्याच्या इतर सहकाऱ्यांना मोठा आनंद झाला. आता काय, हां हां म्हणता या चळवळ्या लोकांचा आपण धुव्वा उडवून देऊं, आडाम्स, हॅन्कॉक यांसारख्या पुढाऱ्याना पकडून त्यांचीं मुंडकीं लंडनमध्यें प्रदर्शनास पाठवूं व मग अमेरिकेवर रामराज्य करूं असें त्यांचें मनोराज्य होतें. पुढे गेजला कळलें की, बोस्टनच्या उत्तरेस वीस मैलावर असलेल्या कॉन्कॉर्ड गावीं बंडखोरांनी पुष्कळ युद्धसामग्री जमविली असून हॅन्कॉक व आडाम्स तेथेच आहेत. लागलीच त्याने गुप्तपणाने त्या स्थानावर हल्ला चढविण्याचे ठरविलें आणि पेटीकर्न नांवाच्या एका अंमलदारास एका तुकडीसह तिकडे धाडून दिलें. इ.स. १७७५ मध्यें एप्रीलच्या १८ तारखेला मध्यरात्रीं ही गोष्ट घडली. ती इतक्या गुप्तपणें करण्यात आली होती की, कोणाला कसलाच सुगावा लागूं नये. परंतु स्वातंत्र्यवादी अमेरिकन इतके भोळे किंवा बेसावध नव्हते. त्यानी आपले टेहळे ठेविले होतेच. त्यांच्यातर्फे ब्रिटिश सैन्याची ही हालचाल त्यांना तावडतोब कळली. त्यांनीही आपला योग्य तो बंदोबस्त केला. कॉनकॉर्ड खेड्याच्या पलीकडे लेक्सिंगटन नांवाचें एक खेडें आहे. प्रथम त्या गावच्या रोखाने जावयाचें आणि नंतर कॉनकॉर्डवर झटकन् झडप घालावयाची असा पेटीकर्नचा बेत होता. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं सकाळीं तो आपल्या लोकांसह लेक्सिंगटनच्या शिवेजवळ आला; पण तितक्यात मिनिटमेनच्या टोळीने त्यास गांठलें. उभयपक्षीं बाचाबाची झाली. पेटीकर्नने गोळया झाडण्याचा हुकूम दिला. या चकमकींत सात अमेरिकन ठार झाले! याप्रमाणें **ता. १९ एप्रिल १७७५ रोजीं लेक्सिंगटनची चकमक** झडली व या दिवसापासून **अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धास** आरंभ झाला!

पुढे पेटीकर्न कॉनकॉर्डवर धावला; पण त्यास तेथे कांही विशेष लाभ झाला नाही. इतक्यांत त्याच्या साह्याला लॉर्ड पर्सी नामक एक

उमेट अंमलदार आणखी लोक देऊन पाठविला होता, तो त्यास येऊन मिळाला. त्या दोघांनी अमेरिकन लोकांची हुरेवडी उडवीत थोडी गंमत करण्याचें योजिलें. पण ती त्याच्या चांगलीच अंगलट आली! आजूबाजूच्या चिडलेल्या शेतकऱ्यांनी व मिनिटमेननी त्याच्यावर हल्ला चढवून त्यांना पळ काढण्यास भाग पाडलें. बोस्टन गाठीपर्यंत तांबड्या डगल्याच्या ब्रिटिश शिपायांच्या तोंडास फेस आला! पुढे ब्रिटिश सैन्य बोस्टनमध्यें कोंडलें गेलें व बाहेरून त्यांच्याभोंवती अमेरिकन सैन्याचा वेढा पडला.

या थराला गोष्टी आल्यावर अमेरिकन लोकानी सर्व संस्थानातर्फे राष्ट्रीय सभेचें दुसरें अधिवेशन पुढच्या मेमध्यें फिलाडेलफिया-येथे भरविलें. सॅम्युएल आडाम्सच्या पत्रव्यवहार समितीच्या योजनेमुळें सर्वांचा एकोपा होण्यास फार मोठें साह्य झालें राष्ट्रीय सभेच्या या नव्या बैठकीचा हेतु स्वातंत्र्ययुद्ध पुढे कसें चालवावयाचें, त्याचें नेतृत्व कोणा-कडे द्यावयाचें व त्याचें ध्येय काय ठेवावयाचें हें निश्चित ठरविण्याचा होता. त्याप्रमाणें त्यांनी जॉर्ज वॉशिंगटन यास सेनापति नेमिलें, इंग्लंड-कडून स्वातंत्र्याचे हक्क मान्य होईपर्यंत युद्ध चालविण्याचें निश्चित केलें आणि प्रजाजन या नात्याने राजा, पार्लमेंट व इंग्लंडची सामान्य जनता याच्याकडे कैफियत धाडण्याचें ठरविलें. तात्पर्य, इंग्लंडच्या राजमंडळाने वसाहतींसंबंधीं जुलमी कायदे करून व अमेरिकन लोकांची अवहेलना करून अनंत अपराध केले असताही, त्या लोकाची इंग्लंड ही आपली मायभूमि आहे व तिचा आपला संबंध तुटूं नये अशीच भावना होती. इंग्लंडविषयींचें त्यांचें हें प्रेम खरोखरच अगदी मनापासून होतें. म्हणून त्यांनी राजा जॉर्जला असा अर्ज केला होता:—"कृपावन्त महाराज! दूरस्थ अमेरिकेंतील आपली राजनिष्ठ प्रजा आपणास न्यायदान मागत आहे. आपणास सर्वश्रेष्ठ व प्रिय नृपति मानून आपल्या कृपाछत्राखाली ब्रिटिश प्रजाजन या नात्याने राहण्याची आमची फार फार इच्छा आहे. तेव्हा आमचे रीतसर स्वातंत्र्याधिकार मान्य करून आम्हांला धन्य करा! आमचा हा अर्ज पाहतांच आपली प्रजावत्सलता जागृत होईल व ती आम्हास दूर ढकलणार नाही असा आम्हांस विश्वास आहे. राजनिष्ठापूर्वक आम्ही ही विनंती करीत आहों. आम्हाला कृपेंत ठेवा व आमची निष्ठावन्त सेवा घ्या."

पार्लमेंटमधील मुत्सद्यांनाही त्यांनी हेंच विनविलें होतें व इंग्लंडच्या सामान्य जनतेलाही " आम्ही तुमच्या रक्तामांसाचे आहों. तुमच्या खांद्याला खादा लावून बरोबरीच्या नात्याने व पूर्ण सलोख्याने तुमच्याच कृपाछत्राखाली राहण्याची आमची इच्छा आहे. तेव्हा आम्हाला न्याय द्या. आमच्या टाहोकडे दुर्लक्ष करूं नका. " असें कळविलें होतें.

आणि खरोखरच इंग्लंडच्या जनतेच्या अनुमताने जर या वेळीं इंग्लंडचा राज्यकारभार चाललेला असता तर अमेरिकनांची ही विनंती मान्य होऊन सलोख्याचा मार्ग सुकर झाला असता. परंतु इंग्लंडचा राजा तिसरा जॉर्ज व त्याच्या ताटाखालचें मांजर बनलेलें मंत्रिमंडळ यानी चालविलेला हेकडपणाचा कारभार खुद्द इंग्लंडच्या जनतेलाही त्या काळीं पसंत नव्हता. या समयास पार्लमेंटची प्रतिनिधि निवडण्याची पद्धति इतकी गचाळ व जीर्ण झालेली होती की जनतेच्या खऱ्या प्रतिनिधींना पार्लमेंटात निवडून येणे अशक्य झालें होतें. या स्थितीचा पूर्ण फायदा घेऊन राजाने सत्ता व द्रव्य याच्या जोरावर पार्लमेंटला आपली दासी बनविलें होते व लॉर्ड चॅथॅम-( पूर्वाश्रमीचा विल्यम पिट ) सारख्या खऱ्या लोकनायकांना घरीं बसवून कुचकिमतीच्या होयबाना हातीं धरून त्याच्याकरवी राज्यकारभार चालविला होता. यामुळें, स्नेहाळू इंग्लिश जनतेचें मत अनुकूल असतांही व बर्क चॅथॅम प्रभृति उदार मुत्सद्यानी अमेरिकनांचा जीव तोडून कैवार घेतला असताही केवळ राजाच्या आग्रहामुळें त्या पितापुत्र राष्ट्रांमध्यें संधि होऊं शकला नाही. व मानधन अमेरिकनास पितृराष्ट्रापासून फुटून निघण्याची पाळी आली.

अत्यंत आश्चर्याची गोष्ट तर खरीच; परंतु इंग्लंडपासून फुटून निघण्याची कल्पना अमेरिकन लोक व बहुतेक लोकनायक यांना अत्यंत असह्य व खेदकारक वाटत होती. जॉर्ज वाशिंगटन स्वतःला पक्का राजनिष्ठ म्हणवी. बेंजामिन फ्रांकलिनला इंग्लंड म्हणजे सर्वस्व वाटे व त्याचे नाव निघतांच त्यास प्रेमाचें भरतें येई. जॉन आडाम्स हाही इंग्लंडचा केवढा तरी अभिमानी ! सर्वांचा असा विश्वास की, राजाला आपल्यावर झालेले किंवा होत असलेले अन्याय कळले तर तो त्यांचें निराकरण करण्याकरितां तोंडचा घास खाली टाकील आणि आपल्या साह्यास धावून येईल ! त्या काळीं बेंजामिन फ्रांकलिन हा इंग्लंड-

मध्येंच होता. अमेरिकेचें व इंग्लंडचें फाटावें, त्यांच्यामधील स्नेहभावाचा उच्छेद व्हावा, ही गोष्ट त्यास मनापासून अप्रिय अस· त्यामुळें तो रात्रंदिवस तडजोडीच्या खटपटींत होता. परंतु विशाद काय, पार्लमेंटमध्यें बसलेल्या मंत्रिमंडळास पाझर फुटेल ? लॉर्ड चॅथम हा त्या वेळीं राजकारणात नव्हता तरी त्यासही इंग्लंडची अमेरिके· विषयींची उपेक्षा दुष्पारिणामी वाटत होती. एडमंड बर्कलाही राजा व पार्लमेंट यांचा मूर्खपणा व आधळेपणा योग्य वाटत नव्हता. फ्रांकलिनने या सर्वांच्या साह्याने तडजोडीच्या प्रयत्नाची कमाल केली, पार्लमेंट· मधील सर्व शिष्टांच्या गाठीभेटी घेण्याकरितां त्यांच्या घरांचे उंबरठे झिजविले आणि मानापमान गुंडाळून ठेऊन सर्वांच्या समजुती पाडण्या· ची शिकस्त केली. परंतु त्याची ही तळमळ सर्वस्वी विफल झाली !

अमेरिकन लोक तडजोड करण्यास व मिळतें घेण्यास इतके उत्सुक होते व आपल्याच देशबांधवावर ( इंग्रजांवर ) शस्त्र उगारण्यास ते इतके नाखूष होते की, तो अप्रिय प्रसंग टाळण्याकरितां त्यांनी राजाकडे एका मागून एक असे तीन अर्ज धाडले, पार्लमेंटपुढे आपली कैफियत सादर करण्याकरितां फ्राकलिनच्या योग्यतेचे दोनचार मुखत्यार लागोपाठ पाठविले आणि इंग्रज जनतेचें मन वळविण्याकरितां वर्तमानपत्रें, लेख व पत्रकें यांच्या द्वारें करून प्रयत्न केला. परंतु त्यांचे बदल्यांत त्यांना तुच्छता, अवहेलना व कुचेष्टा यापेक्षा काही मिळालें नाही ! इंग्लंडांतील तत्कालीन सत्ताधाऱ्यांचें अमेरिकनांना असेंच सांगणें होतें की, "बाबांनो ! तुम्ही राजनिष्ठ आहांत ना ? —उत्तम. तुम्ही पार्लमेंटला श्रेष्ठ मानतां ?—पसंत. तुम्हाला इंग्लंड· विषयीं प्रेम वाटतें ?—छान. आमच्या स्वामित्वाखाली राहण्याची तुमची इच्छा आहे ?—योग्य. तुमचा आमचा संबंध यावच्चंद्रदिवाकरौ राहावा, अशीही तुम्हांला तळमळ आहे ?—मान्य, त्रिवार मान्य ! मित्रांनो, या तुमच्या साऱ्या गोष्टी आम्हांला सोळा आणे पसंत आहेत. आता उलट पक्षीं आमची एकच गोष्ट तुम्ही मानली पाहिजे. आम्ही उदारमनस्क लोक. नेहमी पुष्कळसें मान्य करावयाचें व त्याच्या मोबदल्यांत अगदी एवढेंसें मागावयाचें असा आमचा शिरस्ता आहे. म्हणून आमचें तुम्हाला आग्रहाचें सांगणें आहे की, तुम्ही आमची

एकच गोष्ट मान्य करा. कोणती? तेवढें स्वातंत्र्य मागूं नका. बाकी तुम्ही आम्ही एक याबद्दल बांधाच नाही." असो

या सुमारास तिकडे अमेरिकेंत ब्रिटिश-अमेरिकन युद्धाला रंग चढत चालला होता. सेनापति गेज याच्या साह्यार्थ इंग्लंडमधून हौ, क्लिंटन व बरगॉइन हे नामांकित सेनानी मोठ्या सैन्यासह पाठविण्यांत आलेले होते. या मानाने अमेरिकन लोकांची तयारी अगदीच कमी प्रतीची होती. जॉर्ज वॉशिंगटनने सेनाधिपत्य पत्करून बोस्टनच्या वेढ्याचें कार्य मोठ्या दक्षतेने चालविलें होतें खरें; पण त्याच्या हाताखालील सैन्य सामान्य प्रजेंतून ( शेतकरी वर्गांतून ) आयत्या वेळीं उभें केलेलें असल्यामुळे, तें विस्कळीत व गबाळी होतें. स्वातंत्र्यप्रेम प्रत्येक सैनिकाच्या हृदयात ओतप्रोत होतें व वॉशिंगटनविषयीं सर्वांना अत्यंत आदर वाटत होता. एवढीच त्यांची युद्धाची तयारी. बाकी कपडेलत्ते, खाणेपिणें, लष्करी शिस्त, खरें युद्धचातुर्य, शस्त्रास्त्रें व दारूगोळा या सर्व साधनांची त्याच्याकडे भरपूर वाण होती. असें असतांही वॉशिंगटनने या तयारीवरच बोस्टनचा वेढा लढविला! त्याच्या हाता खालील दोन उपसेनापति-कनेक्टिकट संस्थानातर्फे आलेला पटनॅम व बोस्टनचा नागरिक वॉरेन-या दोघांनी या वेढ्यात चांगलें शौर्य दाखविलें व बंकरहिलची लढाई चांगली झुंजवली! हींत वॉरेन कामीं आला व अमेरिकनांना माघार घ्यावी लागली. परंतु असें अपयश आलें असतांही आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांनी व सैन्याने जें शौर्यधैर्य व चिकाटी दाखविली ती पाहून वॉशिंगटनला मोठा आनंद झाला व त्याने सर्वांचें अभिनंदन करून आपल्या लोकांना असा निर्वाळा दिला की, "आज अपयश घ्यावें लागलें तरी या युद्धांतील शेवटचा विजय निसंशय आपला आहे."

पुढे इ. स. १७७६ साल उगवेपर्यंत युद्धसामग्रीच्या अभावीं व कडक हिमकालामुळें वॉशिंगटनला बोस्टनचा वेढा रेंगाळत ठेवण्यापलीकडे विशेष कांही करतां आलें नाही. ब्रिटिश सैन्यास भरपूर कुमक असल्यामुळें त्यांनी अमेरिकन सैन्यास पुष्कळ नुकसान पोंचविलें व चार्लेसटाऊन जाळून टाकलें; तरीपण त्यांना अमेरिकन सैन्याची कोंडी फोडण्यांत यश आलें नाहीच. तेव्हा त्यांनी समुद्राकडून बाहेर पडून युद्धाचा वणवा इतर वसाहतींतून पेटविण्याचें ठरविलें. न्यूयॉर्क व साऊथ

कॅरोलिना येथील लढ्यास त्यानी तोंड पाडलें. मग अमेरिकनांनी तोडीस तोड म्हणून क्केबेकच्या किल्ल्यावर व कानडा प्रांतांतील इतर भागावर चढाई केली. यात त्यांना म्हणावें तसें यश आलें नाही. पण ब्रिटिशांची बरीचशी युद्धसामग्री त्याना सापडली. ती वॉशिंगटनला मिळताच त्याने चढाईचें धोरण स्वीकारलें आणि इ.स. १७७६ च्या मार्चमध्यें बोस्टननगर ब्रिटिशांकडून हिसकावून घेतलें! पुन्हा सबंध युद्धांत हें नगर ब्रिटिशाना घेतां आलें नाही!

वॉशिंगटनने बोस्टनमध्यें मोठ्या थाटाने प्रवेश केला व ही विजयवार्ता सगळ्या वसाहतींना कळताच सर्वत्र मोठा आनंदी आनंद उडाला. राष्ट्रीय सभेने आपल्या सेनापतीस या विजयाप्रीत्यर्थ एक सुवर्णपदक अर्पण केलें. इतक्यात इंग्लंडहून राजाने अर्ज लाथाडल्याची, पार्लमेंटने मुखत्याराची टवाळी उडवल्याची व इंग्लिश जनतेने या बाबतींत मूग गिळल्याची अशुभ वार्ता येऊन धडकली! ती ऐकतांच वॉशिंगटन-सारख्या राजनिष्ठाला काय वाटलें असेल याची अटकळ सहज करतां येईल. इंग्लंडचा द्वेष करणारे व त्याच्याशीं असलेला संबंध तोडून टाकण्यास अत्यंत उत्कंठित असलेले लोक ओठ चावून म्हणाले, "आम्ही काय सांगत होतों? आता तरी शहाणे व्हा आणि पूर्ण स्वतंत्र व्हा! इंग्लंडची प्रेमपाखर आता पुरे झाली!"

"पूर्ण स्वातंत्र्य!" ही घोषणा सर्वत्र निनादूं लागली! याच सुमारास लोकांना वस्तुस्थितीचें सम्यग्ज्ञान देणारें Common Sense –'सारासार विचार'–या नांवाचें एक सुंदर पत्रक बाहेर पडलें! अल्पावधींत याच्या सहस्रों लाखो प्रती निघाल्या व लोकांत वाटल्या गेल्या! अमेरिकेच्या स्वातंत्र्याचा पुरस्कर्ता टामस पेन याने ही चेतवणी दिली होती! पेनने या पत्रकात म्हटलें होतें, "अमेरिकेच्या लाडक्या पुत्रांनो! तुम्ही कोणत्या भ्रमांत आहांत? इंग्लंडला मिठ्या मारीत बसण्याची तुमची हौस अजून फिटली नाही का? उठा आणि ईश्वरदत्त स्वातंत्र्य मिळवा! इंग्लंडने तुमच्याशीं केलेली वर्तणूक जगाच्या वेशीवर टांगा आणि त्याकडे बोट दाखवून सांगा कीं, याकरितां आम्ही स्वतंत्र होत आहोंत! जोंपर्यंत तुम्ही 'आम्ही ब्रिटिश प्रजाजन आहों.' म्हणून नाचाल तोंपर्यंत तुमचा स्वातंत्र्यवाद कोणीही ऐकणार नाही व त्याबद्दलचे

तुमचे प्रयत्न बदमाषीचे ठरतील! आणि तुम्ही जहाजेंच्या जहाजें भरून जरी अर्जे धाडलेत तरी ते कस्पटाप्रमाणें मानले जातील, हें निश्चित समजा. म्हणून थोडेंसें साधें व्यवहारज्ञान शिका आणि स्वतंत्र व्हा !"

प्रत्येक खऱ्या अमेरिकनाच्या अंत:करणांत उठणाऱ्या विचारांचाच हा प्रतिध्वनि असल्यामुळे वरील पत्रकांतील मथितार्थ सर्वांनाच पटला व 'स्वातंत्र्याची घोषणा करा !' असा लोकाग्रह सर्वत्र सुरू झाला. लागलीच राष्ट्रीय सभेने आपली विशेष बैठक भरविली ! या बैठकीस साऱ्या वसाहतींचे प्रतिनिधि जमले असून स्वातंत्र्याची चळवळ मुळापासून चालविणारे बहुतेक सारे पुढारी हजर होते. त्यांत इंग्लंडहून निराश होऊन आलेला बेंजामिन फ्रांकलिनही पण होता. वॉशिंगटन रणभूमीवर असल्यामुळें त्याने सहानुभूतीचा संदेश धाडला होता. सारी सभा थाटल्यावर स्वातंत्र्यघोषणेचा प्रश्न चर्चेस निघाला. भविष्यकाल काय चमत्कार दाखवील याचा कोणाला काहीच अदमास नसल्यामुळें सर्व मंडळींत नाना प्रकारच्या शंका निघून मोठा कडाक्याचा वाद झाला. पण शेवटीं बहुमताने स्वातंत्र्याचा जाहिरनामा काढण्याचेंच निश्चित झालें व त्याचा मसुदा तयार करण्याचें कार्य टॉमस जेफर्सनकडे सोपविण्यांत आलें. त्याने हें कार्य फारच चातुर्यानें पार पाडिलें. या स्वातंत्र्यघोषणेंतील (Declaration of Independence) प्रास्ताविक थोडक्यांत असें होतें:—

" अखिल मानवजातीच्या जीवनक्रमांत ज्या वेळीं एखाद्या अंकित राष्ट्राला स्वतंत्र होण्याची आवश्यकता भासूं लागते, स्वामिराष्ट्राशीं असलेले त्याचे सारे जिव्हाळ्याचे संबंध त्यास तोडून टाकावेसे वाटतात व जगातील इतर स्वतंत्र राष्ट्रांच्या पंक्तीला सन्मानाने बसण्याची त्यास तीव्र इच्छा होते, त्या वेळीं त्याने सर्वांचें प्रेम व सहानुभूति संपादन करण्याकरितां आपल्या दु:खांचें मूळ काय आहे व आपण का विभक्त होतों आहों याचीं न्याय्य कारणें लोकप्रसिद्ध करावीं हेंच उचित होय. त्याप्रमाणें आम्ही अमेरिकन लोक इंग्लंडपासून का फुटून निघत आहों याचीं कारणें पुढे देतों. आमचा असा दृढ विश्वास आहे की, जगातील यच्चयावत् मनुष्यें सारख्या योग्यतेचीं आहेत, दयाळू परमेश्वराने त्यांना आपआपलें आयुष्य सुखासमाधानांत व्यतीत करण्यास पूर्ण अवसर ठेविला आहे व स्वातंत्र्योपभोग हा तर

प्रत्येकाचा जन्मसिद्ध अधिकार आहे. प्रजेचे हे ईश्वरदत्त अधिकार कोणीही खंडित करूं नयेत व सर्वांचा जीवनक्रम सुरळीत चालावा म्हणून राज्यसंस्था अस्तित्वांत आली आहे. अर्थात् ही संस्था अशीच असली पाहिजे की, जी कोणावर जुलूम करणार नाही, कोणाच्या हिताआड येणार नाही किंवा कोणाच्या स्वातंत्र्यावर घाला घालणार नाही. परंतु जेव्हा अशी संस्था आपलें कर्तव्य योग्य प्रकारें पालन करण्यास असमर्थ ठरते व कांही व्यक्तींच्या सुखाकरितां बहुजनसुखाच्या आड येऊं लागते, तेव्हा ती सुधारण्याचा किंवा मुळापासून बदलण्याचा किंवा तिच्या स्थानीं आपल्या सुखसोयीप्रमाणें नवीन संस्था आणण्याचा अधिकार प्रजेला आहे. आणि याच अधिकारावर आम्ही अमेरिकन लोक आज आपलें स्वतंत्र सरकार स्थापीत आहों व आपलें स्वातंत्र्य जाहीर करीत आहों."

अशा प्रकारची समयोचित प्रस्तावना करून नंतर त्याचेखालीं इंग्लंडने अमेरिकन वसाहतींशीं व लोकांशीं कोणकोणते अन्याय केले त्यांचे २७ आरोप नमूद केले होते. सर्व प्रतिनिधींनी तें घोषणापत्र एक मताने मंजूर केलें व निरनिराळया वसाहतींतर्फे पंचावन्न लोकांनी त्यावर सह्या केल्या ! नंतर ता.४ जुलै इ. स. १७७६ या दिवशीं त्याच्या प्रती मोठ्या जयघोषांत वाटण्यात आल्या ! अल्पकालांत ही घोषणा तेराही वसाहतींत पसरली व पुढे दिगताला गेली ! त्या दिवसापासून अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें हें राष्ट्र जन्मास आलें व स्वयंतेजाने तळपूं लागलें !

---

## प्रकरण विसावें

# स्वातंत्र्ययुद्धाचा पूर्वरंग

अमेरिकन लोकांची स्वातंत्र्यघोषणा युरोपांतील राष्ट्रांच्या कानीं जाऊन आदळताच त्यांची दृष्टि आश्चर्यचकित झाली व बहुतेकांना मनांतून मोठा आनंद झाला. फ्रान्सचें लक्ष तर एकदम तिकडे वेधलें. अमेरिकेमध्यें जोमाने वाढणारा ब्रिटिश लोकाचा हा बलिष्ठ बाहु अशा कांही प्रसंगाने गळून पडल्यास फ्रेंचांना तें अत्यंत इष्ट होतें. म्हणून या भल्या दूरच्या स्वातंत्र्यसमराकडे ते मोठ्या कौतुकाने पाहूं लागले. इंग्लंडच्या

नेत्रांना हें नवें अंजन थोडेंफार चुरचुरलें असलें तरी त्याची दृष्टि निवळण्याकडे त्याचा उपयोग झाला नाही. अविचारी राजा व अनुदार मंत्रिमंडल यांनी हें युद्ध शेवटपर्यंत झुंजविण्याचें प्रथमपासूनच कायम केलें होतें. मात्र त्यांतील अन्याय त्यांसही जाणवला असावा. कारण, केवळ या युद्धाकरितां म्हणून त्यांनी फार मोठें भाडोत्री सैन्य जर्मनींतून आणविण्याची योजना केली होती. अमेरिकन लोक हे इंग्लंडच्याच रक्तसंबंधाचे असल्यामुळें कदाचित् पुढे मागे इंग्लिश सैन्य त्यांच्याशीं लढण्याचें नाकारील व त्यांच्या या बेदिलीमुळें आपणास अमेरिकन वसाहतींवरील मगरमिठी सैल करावी लागेल अशी त्यांस धास्ती होती. म्हणून त्यांनी या बाबतींत जर्मनीकडे पाहिलें होतें. त्या कालीं जर्मनींत 'हेसिअन' नांवाची एक लढाऊ क्षत्रिय जात होती. हे लोक जो भाकरी देईल त्याची चाकरी करण्यास व दूरदेशांतरीं जाऊन लढाया मारण्यास उत्सुक असत. म्हणून ब्रिटिश पार्लमेंटने आपल्याच रक्तमांसाशीं संबंध असलेल्या आपल्या दूरस्थ प्रजेला नामोहरम करण्याकरिता या तिन्हाईत लोकांची योजना केली आणि त्यांचें तीस सहस्रपर्यंत सैन्य उभारून तें अमेरिकेंत धाडून दिलें. ही तयारी पाहून इंग्लंडशीं सामोपचाराची तडजोड घडवून आणण्याबद्दल अमेरिकन लोकांच्या मनांत जो एक क्षीण आशातंतु होता, तोही पार तुटून गेला व पूर्वीच सुरू झालेल्या संग्रामाची तड पोचविल्याशिवाय आता आपला तरणोपाय नाही हें त्यास पक्केपणीं कळून चुकलें.

इ. स. १७७६ च्या आगष्टमधील गोष्ट. ब्रिटिश सेनापति जनरल हौ याने आपल्या पंचवीस हजार सैनिकांसह आता आपला मोर्चा न्यूयॉर्ककडे वळविला. बोस्टन येथे झालेला पराभव त्यास फार डाचत होता. त्यांत स्वातंत्र्यघोषणेची भर पडली! अमेरिकनांचें हें दंड थोपटणें त्यास असह्य झाले. म्हणून त्याने न्यूयार्कवर प्रचंड आघात करण्याचें ठरविलें. त्याचा हा विचार त्याचें युद्धकौशल्य दर्शविणारा होता. अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धाचा सूत्रपात उत्तरेकडील संस्थानांनी केला होता व त्यांत मासाच्युसेट्सने प्रामुख्य स्वीकारलें होतें. यामुळें अमेरिकन राष्ट्राचें मस्तक बोस्टन ठरत होतें. जनरल हौने पहिला प्रहार त्यावर केला, पण तो फसला. तेव्हा त्याने न्यूयॉर्कवर दृष्टि फेकली! हें स्थान म्हणजे अमेरिकन राष्ट्राचा कंठनाळच. तेव्हा तो चिरून उत्तर

संस्थानरूपी मस्तक इतर वसाहतींपासून पार तोडून टाकावयाचें व मग हडसन नदीच्या पात्रांतून वर शिरून कानडापर्यंत मुलुखबंदी करावयाची असा त्याचा मनसुबा होता. परंतु त्याचें हें धोरण वाशिंगटनने अगाऊच ताडलें! त्याने बोस्टनचा योग्य तो बंदोबस्त केला आणि वायुगतीने न्यूयॉर्क गांठून हौच्या पुढे आघाडी मारली. या वेळीं त्याच्या हाताखाली सुमारें अठरा हजार तरुण व युद्धोत्सुक सैनिक होते. पण त्यापैकी निम्या अधिकांना युद्ध म्हणजे काय याचें नक्की ज्ञान नव्हतें. लष्करी शिक्षण घेतलेल्यांची संख्याही अल्पच होती. जसे सैन्य तशी युद्धसामग्री व शस्त्रास्त्रें. तीं चांगलीं नव्हतींच, पण विपुलही नव्हतीं. असा कमकुवतपणा असताही वॉशिंगटनने न्यूयार्क लढविण्याचें ठरविले होतें. त्याचें धैर्य अनुपम, उत्साह अदम्य व निरीक्षण मोठे अचूक. जनरल हौचें मनोगत त्याने बरोबर ताडलें होतें. म्हणून त्याने न्यूयॉर्कला येताच आपला व्यूह रचला. नगराच्या उत्तर बाजूस काही अंतरावर हडसन नदीच्या मुखाचा बंदोबस्त व्हावा व शत्रूस पात्रातून वर चढता येऊं नये म्हणून नदीच्या पूर्वपश्चिम तीरांवर 'ली' व 'वॉशिंगटन' या नावाचे दोन लढाऊ किल्ले पूर्वीच उभारलेले होते. या किल्ल्याचा त्याने आधी बंदोबस्त केला आणि नदीच्या पात्रांत काही जुनीं जहाजेंही बुडवून ठेविलीं. नंतर त्याने न्यूयॉर्ककडे पाहिलें. त्याच्या दक्षिण अंगास लॉंग आयलंड नावाचें बेट आहे. त्या बेटांतील टेकड्यावर सैन्य ठेऊन त्याचेवर पटनॅम नामक सेनापति नेमला आणि त्याने स्वतःकडे नगरसरक्षणाचें अवघड कार्य घेतलें. मुख्य मुख्य सेनाधिकाऱ्यांना त्याने योग्य त्या सूचना दिल्या असल्यामुळें न्यूयॉर्क आपण यशस्वीपणाने झुंजवूं अशी त्यास मोठी आशा होती. परंतु---!

इकडे जनरल हौ साहेब मनोराज्य करीत येत होते. अमूक अवधींत न्यूयॉर्क सर करावयाचें. नंतर हडसनच्या पात्रांतून वर चढून आंत घुसावयाचें. नंतर साऱ्या बंडखोरांना पादाक्रांत करावयाचें आणि मग स्वातंत्र्याचें वारें पिऊन उधळलेल्या वसाहती ताब्यांत आणून पार्लमेंटकडून नवा सन्मान मिळवायचा. इत्यादि मनोराज्य करीत स्वारी न्यूयॉर्कच्या आसमन्तात आली. पाहते तों काय! याच्या आधी वाशिंगटन त्या स्थानीं उपस्थित! हौची थोडी निराशा झाली तरी

त्याने मग अवधि न लावतां लॉंग बेटाच्या पश्चिमेस असलेल्या स्टेटन बेटावर उतरून युद्धास तोंड पाडलें. हौचा दळभार मोठा असल्यामुळें व पटनॅम सेनानीने वाशिंगटनच्या सूचना अवमानिल्यामुळे लॉंग बेट विशेष काल झुंजूं शकलें नाही. अमेरिकन पक्षाला अपयश येण्याचें चिन्ह स्पष्ट दिसूं लागलें. या वेळीं पटनॅम आपल्या नऊ हजार सैनिकांसह कैदच व्हावयाचा. परंतु वाशिंगटनच्या दूरदृष्टीने त्याची अब्रू बचावली ! रात्रीच्या गाढ धुक्याचा फायदा घेऊन वाशिंगटनने पटनॅमसह सर्व सैन्य नदीपलयाड काढून नेलें. लॉंग बेटाचा ताबा ब्रिटिश सैन्याकडे गेला. मग न्यूयॉर्क सांभाळून धरणें अशक्यच झालें. वाशिंगटनने तेंही सोडलें व हडसन नदीच्या पूर्व किनाऱ्याने तो वर सरकूं लागला. परंतु या वेळीं त्याचें दैव त्यास प्रतिकूल झालें. कोणी विश्वासघातक्याने 'वाशिंगटन' किल्ल्याचे नकाशे ब्रिटिश सेनापतीस पुरवल्यामुळें तो तत्काळ त्याच्या हातात गेला ! निराश होऊन वाशिंगटन ससैन्य नदी पार करून पश्चिमेकडे आला. पूर्वेकडील किल्ला शत्रूकडे गेल्यामुळें, त्याच्या समोरचा 'ली' किल्लाही लढविणें अशक्य झालें ! तोही ब्रिटिशांना मिळाला व या दोनही किल्ल्यांत असलेला दारूगोळा व सैन्य त्याच्या ताब्यांत गेलें. इकडच्या भागांतील रक्षणाकरिता चार्लस ली नांवाच्या सेनापतीस वाशिंगटनने नेमिलें होतें. हा सेनापति चागल्यापैकी; परंतु मोठा घमंडनंदन होता. वाशिंगटनचें मुख्य सेनापतित्व त्यास मुळीच मान्य नव्हतें. वास्तविक या संकटप्रसंगीं त्याने भलताच अनुदारपणा न दाखविता वाशिंगटनसारख्या सर्वमान्य सेनापतीला योग्य तें साह्य पोचविण्यास हवें होतें. हे त्याने केलें नाहीच. उलट, वाशिंगटनने दिलेल्या आज्ञा किंवा सूचना धाब्यावर बसवून त्याच्या मार्गात काटे मात्र पेरून ठेविले ! या क्षुद्र करणींत त्याचा असा दुष्ट हेतु होता की, त्या धावपळींत वाशिंगटनची चागली फजिती व्हावी व तो सेननायक होण्यास अगदीच अयोग्य आहे असें अमेरिकन जनतेला व राष्ट्रसभेला वाटूं लागावें. त्याचा तूर्तास परिणाम असा झाला की, एखादें गंभीर युद्ध केल्यावाचूनच वाशिंगटनला पराभव पत्करावा लागला व शत्रूला पाठीवर घेऊन न्यू जर्सी प्रातात निघून जावें लागलें. बरें त्यामुळें लीचें कांही विशेष कल्याण झालें म्हणावें तर तसेंही घडलें नाही. वाशिंगटन

आपला बचाव करीत त्याच्यापासून दूर सरकल्यामुळें तो एकटा पडला व पुढे कांही कालाने शत्रूच्या तावडींत सापडून कैद झाला !

अशा प्रकारें युद्धाचा प्रारंभच अमेरिकन लोकांना अपेशी झाल्यामुळें त्यांच्या पक्षांत निराशेची दाट छाया पसरली व भावी कालाविषयीं बहुतेकांचीं मनें चिंतातुर बनलीं! कोणत्याही युद्धप्रवृत्त राष्ट्राला पराजय अप्रियच असतो. परंतु अमेरिकन लोकांना जें अपयश आलें होतें, तें कांही अगदीच अकल्पित नव्हतें. त्यांच्या तत्कालीन परिस्थितीचाच तो एक दृश्य परिणाम होता. आणि असा काही प्रकार घडेल ही धोक्याची सूचना वाशिंगटनने आगाऊच देऊन ठेविली होती. ज्या वेळीं अमेरिकन राष्ट्रसभेपुढें स्वातंत्र्यसंग्रामाचा प्रश्न चर्चेस निघाला त्या वेळीं एकत्रित झालेल्या प्रतिनिधींमध्यें स्वतःच्या व शत्रूच्या बलाबलाविषयी व सोयींगैरसोयींविषयीं तुलनात्मक वाटाघाट चालू झाली. ती ऐकल्यावर एका सभासदाने मोठ्या झोकांत सांगितले की, "जर आपला सत्पक्ष असेल तर परमेश्वर आमचें साह्य केल्यावाचून राहणार नाही." या वाक्यावर सभेंत टाळी पडली. परंतु वाशिंगटनने लगेच उठून सांगितलें की, " हा विश्वास मी अयोग्य मानीत नाही. परंतु तेवढ्यावर विसंबून आपणास स्वातंत्र्यसग्राम यशस्वी करतां येईल असें मानणें मात्र धोक्याचें आहे. आम्ही आपल्याकडून नेटाचे प्रयत्न केले पाहिजेत व आपलें बलाबल नीट तोलून पाहून पाऊल टाकलें पाहिजे. हें जर आपण न करूं तर बिचारा परमेश्वर आमच्या बाबतींत बुचकळ्यांत पडेल आणि आपणास फसल्यासारखें होईल."

वाशिंगटनच्या मनांत असा संदेह निर्माण होण्याचें कारण असें होतें की राष्ट्र या नात्याने अमेरिकन वसाहतींचें संघटन अद्यापि झालेंच नव्हतें. फ्रेंचयुद्धाच्या प्रसंगापासून त्यांच्यामध्यें एकसूत्रीपणा येत चालला होता, यात शंका नाही. पण ब्रिटिश सत्तेच्या छायेखालीच ही गोष्ट घडल्यामुळें राष्ट्रीयत्वाची स्वतंत्र भावना त्यांच्या ठिकाणीं दृढमूल झालेली नव्हती. त्याची एकजूट आवळ्याच्या मोटेप्रमाणें होती. आता इंग्लंडशींच शत्रुत्व करण्याचा प्रसंग उद्भवल्यामुळें ती एकजूट असून नसल्यासारखी झाली आणि प्राप्त संकट कसें निभावून न्यावयाचें हा प्रश्न वाशिंगटनसारख्या विचारी पुरुषांना पडला. अशा वेळीं केवळ

वावदूकता किंवा प्रांताभिमान किंवा स्वातंत्र्यप्रेम किंवा परमेश्वरावरील विश्वास उपयोगी पडणारा नव्हता.

कोणत्याही करणास्तव युद्ध उपस्थित करणें फार सुलभ आहे. परंतु तें यशस्वी करून दाखविणें मात्र मोठें दिव्य आहे. त्यांतून धडपणें पार पाडावयाचें म्हणजे युद्धप्रवृत्त राष्ट्राच्या मागे, प्रजेवर सुलभतेने हुकमत चालवूं शकणारें बलिष्ठ सरकार, आकंठ भरलेला व सतत भरत राहणारा फार मोठा खजिना आणि प्रचंड सैन्य व आरमार हीं साधनें अगदी जय्यत तयार असावीं लागतात. मौज अशी की, अमेरिकन लोकांजवळ नेमकीं हीं तीन साधनेंच आज उपलब्ध नव्हतीं! या दृष्टीने इंग्लंड पूर्ण सुदृढ तर वसाहती पूर्ण लुल्या होत्या. तेव्हा वसाहतींचें हें वैगुण्य इंग्लंडच्या पथ्यावर पडेल की काय ही धास्ती सर्वांनाच पडली होती. असो.

स्वातंत्र्यघोषणा करण्यापूर्वी वसाहतींचें वरील वैगुण्य झाकलें जावें व त्या विशेष कार्यक्षम बनाव्या म्हणूनच प्रमुख लोकनायकांनी तेराही संस्थानांतलि सर्वमान्य प्रतिनिधि एकत्र आणून राष्ट्रसभेची (Continental Congress) स्थापना केली व तिच्या आधिपत्याखाली **'अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें'** या राष्ट्रास जन्म दिला. परंतु ही व्यवस्था केवळ औपचारिक (कागदोपत्रीं) झाली होती. सत्यसृष्टींत ती अद्यापि अवतरली नव्हती. यामुळें स्वातंत्र्ययुद्ध कोणत्या धोरणावर व कोणीं चालवावयाचें? त्याच्या प्रीत्यर्थ लागणारें सैन्य व द्रव्य कसें जमवावयाचें? आणि या सार्वत्रिक संकटांत अमेरिकन प्रजेचें संरक्षण व नियंत्रण कोणत्या विधीने व्हावयाचें? या प्रश्नांचा निर्णय लागला नव्हता व त्यापूर्वीच युद्धास प्रारंभ झाला होता. तात्पर्य, यावेळीं अमेरिकन लोकांजवळ राष्ट्रसभा होती पण सरकार नव्हतें, पैसा होता पण खजिना नव्हता, माणसें होतीं पण सैन्य नव्हतें आणि जहाजें होतीं पण आरमार नव्हतें. अशा अनवस्थेंतच तेरा फळ्या कशा तरी एकत्र आणून बनविलेला त्यांचा ताफा स्वातंत्र्याचें बंदर गांठण्यास निघाला होता! मग वाशिंगटनसारख्या कर्तृत्ववान् सेनापतीस यश कसें यावें?

इंग्लंडतर्फे वसाहतींचा कारभार पाहण्यास आलेले व अमेरिकन लोकांच्या दृष्टीने शून्यवत् असलेले ब्रिटिश अधिकारी राष्ट्रसभेचें वाढतें बल थांबविण्यास जरी असमर्थ झाले होते तरी स्वातंत्र्याची चळवळ कांहीं ते

लोक स्वस्थपणें पाहत बसले नव्हते. धाकदपटशा, भेदनीति, अत्याचार इत्यादि अनेक बऱ्यावाईट उपायांनी ते स्वातंत्र्यवादी लोकांच्या मार्गात विघ्नें उत्पन्न करण्याचा प्रयत्न अहोरात्र करीत होते. वसाहतींची मर्मस्थानें कोणती आहेत व कोणते प्रयोग केले असतां ही चळवळ नामशेष होईल याची भरपूर माहिती त्यांनी युद्धास आलेल्या ब्रिटिश सेनाधिकाऱ्याना व इंग्लडमध्ये पार्लमेंटला कळविली होती. त्यामुळें कोणत्या प्रसंगाचा कसा फायदा घ्यावयाचा हें धूर्त मंत्रिमंडळाला आगाऊच उमगलें होतें. ज्या वेळी जनरल हौ न्यूयॉर्क नगरांत घुसत होता, त्याच वेळीं त्याचा सख्खा भाऊ लॉर्ड हौ हा एक आरमारी काफिला घेऊन न्यूयॉर्क बंदरांत उपस्थित झाला होता. पार्लमेंटकडूनच यास मुद्दाम धाडण्यात आले होतें. याच्या एका बगलेंत आरमारी बल होतें; पण दुसऱ्या बगलेंत तहाच्या वाटाघाटींचे पुडके होतें. मुळापासून हा अमेरिकन लोकाचा चाहता व फ्रांकलिन आदि लोकाचा मित्र असल्यामुळें या कार्यावर त्याची योजना झाली होती. प्रसंग पडला तर त्याने समुद्राची दिशा साभाळून जमिनीवर लढणाऱ्या ब्रिटिश सैन्यास साह्य पोचवावें आणि स्वातंत्र्यवादी पक्षाचा बीमोड करण्यास झटावें. नाही पक्षीं मित्रत्वाचें प्रदर्शन करीत राष्ट्रसभेशी तडजोडीचे बोलणें काढावे व मोहक आश्वासनाच्या वर्षावांत अमेरिकनाची स्वातंत्र्योर्मि जिरेपर्यंत कालापव्यय करावा. तात्पर्य, लॉर्ड हौच्या आगमनाचा असा दुहेरी हेतु होता.

न्यूयॉर्क हस्तगत झाले व वॉशिंगटन पराभूत होऊन न्यूजर्सीच्या जंगलांत निघून गेला. या इष्ट गोष्टी घडून येताच हौ बंधूंनी आपलें मायाजाल पसरलें. एकीकडे त्यानी कॉर्नवॉलीस नामक सेनापतीस वॉशिंगटनच्या पाठलागावर सोडले, दुसरीकडे राष्ट्रसभेशीं तहाची वाटाघाट चालू केली आणि तिसरीकडे अमेरिकन प्रजेकरिता भपकेदार जाहिरनामे काढले! यात ब्रिटिशाच्या अतुल सामर्थ्याची कीर्ति गाइली असून तिच्याच जोडीला वॉशिंगटनच्या पराभवाचें भपकेदार चित्र रेखाटलें होतें. त्याचेखाली राजनिष्ठेचें महत्त्व सांगून स्वातंत्र्याच्या चळवळीचा व ती चालविणाऱ्या लोकाचा उपहास केला होता तर त्याच्याच बरोबर राजद्रोह केल्यास कोणते दुष्परिणाम घडून येतील व स्वातंत्र्यवादी पक्ष किती लौकर

ठार होणार आहे, याचेही रसभरित वर्णन होतें. आणि या सर्वांवर मोहक आश्वासनाची साखर भरपूर पेरून टेविली होती.

ही बंधूंच्या या तिहेरी मात्रेचा अगदी सोळा आणे जरी नाही तरी दहा बारा आणे गुण तात्काळ दिसूं लागला! अमेरिकन लोकांच्या आत्मविश्वासास जोराचा धक्का बसला, राष्ट्रसभेंतील प्रतिनिधींचा एकोपा डळमळीत झाला आणि तेराही वसाहतींमध्यें संशय, भीति व मानसिक द्विधावस्था चटकन निर्माण झाली! ब्रिटिश लोकांना हेंच हवें होतें. कित्येक वाचकाना या चमत्कारिक स्थित्यंतराचें नवल वाटण्याचा संभव आहे. परंतु मनुष्यस्वभावाचें मुख्य वर्म लक्षांत घेऊन त्यानी या गोष्टीचा विचार केल्यास, तींत त्यांना नवल करण्यासारखें कांहीच आढळणार नाही. मनुष्यप्राणी हा स्वभावतः स्वार्थी व सुखलोलुप आहे. त्याच्या ठायीं उदात्त भावना नाहीत असें नाही. परंतु आपल्या सुखाला, धनाला, लाभाला किंवा जीविताला धक्का बसतो असें दिसतांच समाजातील बहुतेक व्यक्तींचे उदात्त विचार नरम पडतात आणि सुरक्षित मार्गाचा अवलंब करणे त्याना बरें वाटतें. ब्रिटिशांचा विजय व वॉशिंगटनचा पराजय झालेला ऐकून स्वातंत्र्योत्सुक अमेरिकन जनता गांगरली ती यामुळें. स्वातंत्र्यवादी पक्ष प्रिय खरा, त्याचे ध्येयही मान्य खरें, तें सिद्धीस नेण्याकरिता सर्वांनी झटलें पाहिजे हेंही खरें आणि त्याकरिता प्रत्येकाने सर्वस्वत्यागाला तयार असलें पाहिजे हेंही खरें; पण या साऱ्या गोष्टी परस्पर होत असतील, आपल्या सुखाहिताच्या आड न येतां होत असतील तर उत्कृष्ट ! त्याची झळ स्वतःलाच लागूं लागली तर? मग कांही फरक नको. आहे तें बरें आहे. असेंच ज्याला त्याला वाटूं लागतें. दुसरी एक महत्त्वाची गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. व्यक्ति व समाज यांचीं मनें केव्हाही एकाच स्वरूपाचीं असत नाहीत. समष्टीचें मन जरी उदात्त व ध्येयप्रवण असलें तरी व्यक्तिशः प्रत्येकाचें मन वैयक्तिक स्वार्थाच्या आशेने लोभाविष्ट होणें अशक्य असतें असें नाही. यामुळें एकंदर अमेरिकन जनता जरी स्वातंत्र्यवादी असली तरी ब्रिटिश अधिकाऱ्याचे जाहिरनामे फडकूं लागतांच अनेक अमेरिकनांचें—व्यक्ति या नात्याने—चित्त चंचल झालें !

साधारणपणें असा नियमच आहे की, सामाजातील धनिक वर्ग हा प्रचलित राजसत्तेच्या विरुद्ध जाण्यास सदैव कचरत असतो.

अमेरिकन समाज याला अपवाद नव्हता. वरील जाहिरनामे लागतांच ठिकठिकाणच्या अनेक श्रीमंत लोकांनी आपण राजनिष्ठ ब्रिटिश प्रजानन असल्याचें जाहीर केलें व त्यांच्या नादाने किंवा वजनाने राष्ट्रसभेच्या प्रतिनिधीपैकीही कांहींनी आपला स्वीकृत पक्ष सोडून दिला ! हें पाहून समाजांतील त्या त्या व्यक्तींचे अनुयायीही राष्ट्रसभेच्या हेतू-पासून फुटून दूर झाले. कांही वटवाघळाच्या जातीच्या लोकानी संधि सापडेल तसें दुटप्पी धोरण आखण्याचे योजिलें. लोभी, स्तुतिपाठक, मानाचे हव्यासी यांनाही एक नवीन पर्वणी सापडली. तात्पर्य, स्वातंत्र्यो-त्सुक अमेरिकन राष्ट्राचा सारा बनाव बराच खिळाखिळा झाला व आपले ध्येय गाठावयाचें कसें, हा प्रश्न वाशिंगटन, फ्राकलिन, आडाम्स आदि-करून प्रमुख लोकनायकांना पडला ! परंतु ते लोक चटकन हताश होण्यासारखे नव्हते. स्वातंत्र्ययुद्धाच्या पूर्वरंगात असा कांही गोंधळ व्हावयाचाच हें त्यानी गृहीत धरलें होतें. म्हणून तहाच्या वाटाघाटीला लॉर्ड हौ येत आहे असे कळतांच वाशिंगटनने राष्ट्रसभेला निरोप धाडला की, " सावध रहा व भलत्याच अटींवर तह मान्य करूं नका. मी पराभूत होऊन पळत असतां, हा निरोप पाठवीत आहें. कारण, आपण आज ना उद्या आपल्या पवित्र कार्यांत यशस्वी होऊं असा मला दृढ विश्वास आहे. धैर्य धरून वर्तावें. अमेरिकेचें स्वातंत्र्य इंग्लंडकडून मान्य होईपर्यंत शस्त्र खाली ठेवावयाचें नाही. " वाशिंगटनच्या या प्रोत्साहनपर संदेशानुरूपच राष्ट्रसभेच्या कार्यकर्त्यांनी आपलें धोरण आखलें व हौची तडजोडीची खटपट विफल झाली.

याच वेळीं त्या लोकांना हेंही उमगून आलें की, राष्ट्र या नात्याने आपल्या वसाहती विकलाग आहेत. तेव्हा मध्यवर्ती राष्ट्रीय सरकार स्थापन होण्याची संधि येईपर्यंत आपल्या कार्यास युरोपांतील राष्ट्रांकडून सहानुभूति व साह्य मिळविण्याचा जोराचा प्रयत्न केला पाहिजे. फ्रेंच लोकांचें व त्यांचें पूर्ववैर अद्यापि विस्मृत झालें नसताही इंग्लंडचा शत्रु तो आपला मित्र या नात्याने त्यांनी फ्रान्सचें साह्य जोडण्याचें ठरविले. आणि त्याप्रमाणें इ. स. १७७६ च्या आक्टोबरमध्यें फ्रांकलिनच्या आधिपत्याखाली एक शिष्टमंडळ युरोपकडे रवाना केलें.

इकडे वाशिंगटन आपल्या मोडक्या तोडक्या सैन्यासह ब्रिटिश सैन्याला हुलकावण्या दाखवीत न्यूजर्सी प्रांत तुडवीत चालला होता. तो ट्रेंटन नामक गावाजवळ आला. या गावाजवळून डेलावेअर नांवाची खोल नदी संथपणें वाहात होती. दिसेंबरचा महिना असल्यामुळें जिकडे तिकडे कडक थंडी पडली असून नदींतून बर्फाचे धोंडे वाहात होते. अशा संकटांतही वाशिंगटनने डेलावेअर नदी मोठ्या हिमतीने पार केली व आपल्या मागोमाग शत्रुसैन्याला येतां येऊं नये म्हणून तिच्या काठच्या खालवरच्या शंभर मैलातील नावा वगैरे साधनें नाहीशीं करून टाकलीं ! वाशिंगटन निसटून गेलेला पाहून व नदी ओलांडण्यास कांही साधनें मिळण्यासारखीं नाहीत, असें पाहून हिमकाल संपेपर्यंत ब्रिटिश सैन्यास ट्रेन्टन गांवीं तळ देऊन राहाणें भाग पडलें. भयंकर थंडी, मधून बर्फाचा वर्षाव सुरू झालेला व डेलावेअर नदी गोठलेली अशा स्थितींत आता काही कालपर्यंत युद्धाचा प्रसंग येणार नाही, असें ब्रिटिश सैन्यास वाटलें. आणि सेनाधिकारी व सैनिक प्राप्त झालेल्या ( इ. स. १७७६ च्या ) नाताळच्या सणाची मौज लुटण्यांत दंग झाले. सदैव सावध असलेल्या वाशिंगटनला ही संधि अप्रतिम वाटली व त्याने एक अत्यंत साहसाचा डाव योजिला. नाताळच्या सणाची मुख्य रात्र. जिकडे तिकडे गाढ अंधकार पसरला होता. आकाश वादळाने धुंद झालें होतें. बर्फाचा जोराचा वर्षाव चालू होता व थंडी इतकी असह्य पडली होती की, निधड्या छातीच्या मनुष्यासही घराबाहेर पडणें अशक्य होतें. इतकी प्रतिकूल स्थिति असतांही वाशिंनटनने पंचवीसशें सैनिकासह नदी ओलांडली व ब्रिटिशांच्या तळावर एकदम हल्ला चढविला ! तो इतका जोरदार व अचूक होता की, वाशिंगटनकडील एकही माणूस जायबंदी न होतां त्यास विजय मिळाला ! ब्रिटिश सैन्य व सेनाधिकारी हतधैर्य होऊन मुकाट्याने शरण आले ! एक हजार कैदी, पुष्कळ दारूगोळा, कपडेलत्ते व अन्नसामग्री वाशिंगटनला मिळाली ! त्याच्या सैन्यात आनंदीआनंद उडाला ! पुढे लौकरच या विजयाची वार्ता सर्वत्र पसरली व निराशाग्रस्त झालेल्या स्वातंत्र्यवादी पक्षास पुन्हा थोडासा उत्साह चढला. राष्ट्रसभेच्या चालकानाही हायसें वाटलें !

अशा प्रकारें अत्यंत अल्प सामग्रीवर वॉशिंगटनने मोठा विजय मिळविला असतां त्याच्यापुढे एक नवीन संकट उपस्थित झालें. मागे सांगितलेंच आहे की, अमेरिकन वसाहती राष्ट्रस्वरूपाने संघटित झाल्या नसल्यामुळें त्यांच्याजवळ एक मुख्य खजिना किंवा कायमचें खडे सैन्य नव्हतें. आणि त्याची कांहीं नक्की व्यवस्था करण्याचे आतच राष्ट्रसभेने कांहीं जुजबी योजना करून वाशिंगटनला मुख्य सेनापति नेमून टाकले होतें. त्यास ही कच्ची योजना पसंत नसताही त्याने राष्ट्रावरील आपत्काल ओळखून सेनापतित्व पत्करलें व तेव्हापासून गेल्या वर्षभर तो राष्ट्रसभेला विनवीत होता की, "सैन्याची व खजिन्याची व्यवस्था दृढ पायावर करा. नाहीतर मागाहून मोठा गोंधळ होईल." पण त्याच्या या सांगण्याकडे राष्ट्रसभेने म्हणावें तसें लक्ष दिलें नाही. राष्ट्रसभेच्या या दुर्लक्षाचें कारण मोठें विषादजनक होतें. वॉशिंगटन हा अद्वितीय योग्यतेचा पुरुष असतां, त्यास अवमानणारे असे कांहीं लोकनायक राष्ट्रसभेत होते. त्याना वॉशिंगटनचा मोठेपणा मनांतून रुचत नव्हता. या अशा लोकांपैकीच जॉन आडाम्स हा एक होता. राष्ट्रसभेने स्वातंत्र्ययुद्धाची व्यवस्था पाहण्याकरितां जें एक मंडळ नेमिलें होतें, त्याचा मुख्य जॉन आडाम्स होता. सर्वानुमतें सेनापतिपदावर वॉशिंगटनची योजना झाल्यामुळें त्यास (आडाम्सला) त्याच्याविषयीं (वॉशिंगटनविषयीं) उघड अप्रीति दाखविता येईना आणि मनांतून तर तो त्यास नको होता. त्याचा खरा ओढा गेटस् व लीसारख्या अयोग्य माणसाकडे होता. त्यामुळें कांही कारण घडून वॉशिंगटन खाली येईल तर बरें असें आडाम्सला नेहमी वाटे व म्हणून तो इतरांची अनुमति किंवा इच्छा असताही वॉशिंगटनच्या योजना किंवा सूचना धुडकावून लावी किंवा त्याविषयीं टाळाटाळ करी. लीने वॉशिंगटनचा जो आज्ञाभंग केला होता, त्यास असें हें आतलें कारण होतें. खरोखर वॉशिंगटनच्या स्थानीं दुसरा कोणी पुरुष असता, तर त्याने कलह तरी माजविला असता किंवा या आतील लाथाळीला कंटाळून आपल्या पदाचा त्याग तरी केला असता. परंतु त्याने धीरोदात्त शांतपणा पत्करून कार्य चालविलें होतें. असो.

ट्रेंटनचा विजय मिळविल्यानंतर वाशिंगटनने पुन्हा एकदा आपल्या व आपल्या सैन्याच्या अडचणी राष्ट्रसभेपुढे मांडून " लौकर

कांही व्यवस्था करा," म्हणून विनविलें. वस्तुस्थिति अशी होती की, आज वाशिंगटनच्या हाताखाली जें सैन्य वागत होतें, तें एक वर्षाच्या मुदतीनेच जमविलें होतें व त्यांची ती मुदत आता संपलेली होती. राष्ट्र सभेच्या दुर्लक्षाने म्हणा किंवा तिच्या जवळही साधनें नव्हतीं म्हणून म्हणा या सैन्याचे खरोखरीच अत्यंत हाल झाले होते. त्याच्या आरोग्य-रक्षणाची, अन्नवस्त्राची व वेतनाची अशी कसलीच व्यवस्था नीट झाली नसल्यामुळें व पराभूत होऊन त्यास धावपळ करीत जीवन कंठावें लागल्यामुळें सारे सैनिक आपआपल्या घरीं जाण्यास अगदी उतावीळ झाले होते. वाशिंगटनसारखा उदारमनस्क, प्रेमळ, गुणग्राहक व न्यायी सेनापति त्याना लाभल्यामुळेंच आतापर्यंतची वेळ निभावून निघाली होती; पण यापुढे वाशिंगटनची ती हुकमत टिकणें अशक्य होतें. म्हणून त्याने ट्रेंटनच्या विजयाचें महत्त्व सागून राष्ट्रसभेकडे आपल्या सैनिकाच्या सुखसोयीबद्दल गाऱ्हाणें गायिलें. परंतु युद्धासंबधींचीं सूत्रें आडाम्सकडे असल्यामुळें व त्याचा वाशिंगटनाच्या कर्तबगारीविषयीं प्रतिकूल ग्रह असल्यामुळें त्याने "एवढासा विजय मिळविला तो काय व त्याचा गाजावाजा तो किती?" अशी अवहेलना करून स्वकर्तव्य बजावलें नाही. शेवटीं वाशिंगटनने आपली अडचण आपल्या धनिक मित्राना कळविली. फिलाडेलफिया येथे रॉबर्ट मॉरिस नावाचा एक मोठा व्यापारी व पेढीवाला वाशिंगटनचा जिवलग स्नेही होता. त्यास त्याचें पत्र पोचतांच त्याने रात्रीचा दिवस करून दीड दोन लाख रुपये जमविले व तो खजिना वाशिंगटनकडे धाडून त्याची अब्रू वाचविली! मॉरिसच्या या साह्याने अमेरिकन राष्ट्राचें सुदैव जागृत झालें म्हणण्यास हरकत नाही. वाशिंगटनला पुन्हा मोठा जोम चढला!

इकडे वाशिंगटनच्या पाठलागावर लॉर्ड कॉर्नवालिस सेनापति होता. ट्रेंटनच्या पराभवाने त्याच्या कर्तबगारीवर ठपका आला. म्हणून त्याने अगदी तातडीने वाशिंगटनला पकडण्याच्या प्रतिज्ञेने त्याच्यावर ता ३ जानेवारीला ( इ. स. १७७७ ) मोठ्या सैन्यानिशीं धावा केला. पण वाशिंगटनने आता कांत टाकलेली असल्यामुळें त्यास या आक्रमणाचें बिलकूल भय वाटलें नाही. त्यानेही उठावणी केली. दोन्ही सैन्यांची प्रिन्स्टन नामक गावीं गाठ पडली! पहिल्या हल्ल्यात अमेरिकन

सैन्य हटलें ! ही स्थिति पाहताच प्रसंगावधानी वाशिंगटनने मोठ्या साहसानें आपला घोडा सर्वांच्या पुढे घातला व पाठ फिरवूं पाहणाऱ्या सैन्यास नवें उत्तेजन दिलें. या वेळीं ब्रिटिश सैन्य अवघें पन्नास हातांवर होतें व त्याच्याकडून गोळ्याचा वर्षाव सारखा सुरू होता. असें असतां आपल्या सेनानीनें सर्वांपुढचें धोक्याचें स्थान पटकावलेलें पाहून अमेरिकन सैन्यास वीरश्री चढली ! त्याने लगट करून विजय मिळविला व कॉर्नवालिसच्या सैन्यास धूळ चारली ! नंतर वाशिंगटन आपल्या लोकासह मॉरिस टाऊनकडे निघून गेला. व टेकडीवर जंगलांत त्याने आपली छावणी केली.

इकडे फ्रांकलिनच्या प्रामुख्याखाली अमेरिकन राष्ट्रसभेने रवाना केलेलें शिष्टमंडळ फ्रान्समध्ये जाऊन सुखरूप पोचले व फ्रेंच लोकानी त्याचा चागला सत्कार केला. या वेळीं सबंध युरोपमध्यें अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धाविषयीं हार्दिक सहानुभूति निर्माण झाली होती. फ्रांकलिनने तिचा चागला उपयोग करून घेतला. अनेक ठिकाणांहून नामांकित वीर पुरुष व लढवय्ये सैनिक अमेरिकनांचा पक्ष घेऊन लढण्याकरिता अमेरिकेंत जाण्यास तयार झाले. फ्रान्समधील मार्क्विस डी लाफेटे हा तर स्वतःच्या खर्चाने निघाला. हा मोठा धनिक असतांही त्याचें या स्वातंत्र्ययुद्धाकडे मोठें लक्ष लागलें होतें. वयाने हा अवघा एकोणीस वर्षांचा म्हणजे अगदी कोवळा तरुण होता. त्यात त्याचें नुकतेंच लग्नही झालें होतें. असें असता सौख्याचीं सारीं साधनें बाजूला सारून तो अमेरिकेकडे जाण्यास निघाला. त्याच्या तरुण पत्नीचें व त्याचें अत्यंत प्रेम असतांही त्या रमणीने आपल्या पतीच्या वीरोचित उद्देशास अडथळा आणिला नाही. तिने त्यास आनंदाने अनुमति दिली. लाफेटेबरोबर बॅरन डी काल्ब व स्टयूबन नांवाचे दोन जर्मन सेनापतिही निघाले. ही कांही व्यक्तींची खासगी मदत झाली. फ्रेंच सरकारने मात्र एकदम उघडपणें मदत देण्याचें कबूल केलें नाही. तथापि लौकरच साराटोगा येथील विजयानंतर तीही गोष्ट घडून आली व फ्रान्सची बहुमोल मदत अमेरिकनांना झाली.

इ. स. १७७७ च्या जुलैमध्यें लाफेटे आपल्या सरंजामासह अमेरिकेंत येऊन पोचला. फ्रांकलिनकडून त्याने शिफारस पत्र आणिलें

असल्यामुळें त्याच्या हेतूच्या शुद्धतेबद्दल विशेष शंका निघाल्या नाहीत. मग वाशिंगटनच्या हाताखाली त्यास देण्यांत आलें. काल्व व स्ट्यूबन यांच्या ज्ञानाचाही फार फायदा झाला. त्यांनी वाशिंगटनच्या सैन्यास युद्धकलेचें शिक्षण देण्याची जबाबदारी आपल्या अंगावर घेतली. या नव्या बाहेरच्या साह्यामुळें राष्ट्रसभेने वाशिंगटनची जी उपेक्षा चालविली होती, तिला पुष्कळ आळा बसला. तो मोठा योग्यतेचा सेनापति आहे, हें बाहेरच्या लोकानी सागितलें तेव्हा तें राष्ट्रसभेला पटूं लागलें !

अमेरिकन सैन्यामध्यें अशा हालचाली सुरू असता, तिकडे ब्रिटिशपक्षही काही अगदीच स्वस्थ बसला नव्हता. जनरल हौ फिलाडेलफिया हस्तगत करण्याच्या विचारांत होता. लॉर्ड कॉर्नवॉलीस वाशिंगटनच्या कच्छपीं लागला होता व कानडा प्रांतातून बरगॉईन सेनापति मोठ्या सैन्यासह खाली येत होता. ब्रिटिश सैन्यास एक दोन पराभव मिळाले असले तरी अमेरिकन लोकाना आपण लौकरच दमवूं ही ब्रिटिश सेनापतींची आशा अद्यापि ताजी होती. बरगॉईन याच आशेने मोठ्या दिमाखाने खाली उतरत असतां **बिनिंगटन** या नावाच्या गावी त्याच्या बिनीच्या पलटणींची व मेजर स्टार्क नावाच्या छोट्या अमेरिकन सेनानीची गाठ पडली. स्टार्कजवळ एवढेसें सैन्य असतांही त्याने आपल्या शिपायांस उद्देशून म्हटलें, "मित्रानो ! ते पहा तांबडे कोटपाटलूणवाले. यांचा पराजय आज करावयाचाच. तो न झाला तर मिसेस स्टार्क विधवा होणार हें निश्चित समजा." एवढें बोलून त्याने हल्ला चढविला ! आश्चर्य असे की, बरगॉईनची तयारी मोठी असतांही स्टार्कने त्यास चांगला हात दाखवून आपला शब्द खरा करून दाखविला ! बरगॉईनने कोणीकडून आपली बाजू सावरून निराळा मार्ग पत्करला. स्टार्कने त्यास बारीकसाच चिमटा घेतला होता. परंतु तेवढ्याने त्याच्या मनाची खंबिरी ढासळली व सैन्याची व्यवस्था खिळखिळी झाली. त्यास अनुभवाने असें समजून आलें की, सत्ताबलावर ब्रिटिशांनी अमेरिकन लोकावर आपला शह ठेविला असला तरी त्याच्या मनावर ब्रिटिशांच्या सत्तेचा थोडाही प्रभाव राहिलेला नाही. बहुतेक अमेरिकन जनता कॉंग्रेसला वश झाली असून त्याचे प्रेम व निष्ठा तिच्या ठायीं जडली आहे. ही वस्तुस्थिति त्याने पार्लमेंटलाही कळवून ठेविली व अशा स्थितींत जय कोठवर मिळेल ही शंका प्रगट केली.

असो; आपला प्रवासमार्ग बदलून व अज्ञात प्रदेशांत निर्माण होणाऱ्या अडचणी सहन करीत बरगॉईन साराटोगा नांवाच्या गावाजवळ आला. येथे त्याचा मार्ग आडविण्यास एक मोठें अमेरिकन लष्कर दबा धरून बसलें होतें. या सैन्यावर वॉशिंगटनचे मित्र व त्याच्या हाताखाली कसून तयार झालेले बेनेडिक्ट आर्नोल्ड व डॅनिअल मॉर्गन या नावाचे दोन सेनापति होते. शिवाय जॉन आडाम्सच्या कृपेतला जनरल गेटस् हा मुख्य सेनापति म्हणून नेमलेला होता. अमेरिकन सैन्यापेक्षा ब्रिटिश सैन्य संख्येने मोठें, सुसंघटित व शस्त्रास्त्रांनी सुसज्ज होतें. सेनापति बरगॉईन स्वत: खंदा लढवय्या असून याच्या साह्यास फ्रेझर, ऑकलंड, क्लार्क, क्लिन्टन असे शूर पुरुष देण्यात आले होते. यामुळें त्याची तयारी नांवाजण्यासारखी होती.

साराटोगाच्या भोवतालच्या भागांत वरील दोन्ही सैन्याची गाठ पडली व एका मोठ्या आणीबाणीच्या युद्धास प्रारंभ झाला. ब्रिटिशांची तयारी दाडगी असली तरी मुख्य सेनापति बरगॉईन पहिल्यापासूनच गोंधळून गेला होता. यामुळें तो युद्धकलाकुशल असूनही त्याची बुद्धि काम देईना. प्रत्यहीं त्याचें पाऊल मागेच पडत चाललें. दीड महिना त्याने निकराने युद्ध केलें. परंतु विशेष उपयोग झाला नाही आणि शेवटीं इ.स. १७७७ च्या आक्टोबरच्या १७ तारखेला अशी विपरीत स्थिति प्राप्त झाली की, त्यास व त्याच्या सैन्यास शस्त्रें खाली ठेवावीं लागलीं! सहा हजार सैनिकासह तो अमेरिकन सेनापतींचा कैदी झाला! गेल्या दोन हजार वर्षांत जगाच्या पाठीवर ज्या क्रांतिकारक लढाया झाल्या आहेत, त्यात साराटोगा येथे घडलेल्या वरील लढाईची गणना करण्यात येते यावरून ती किती महत्त्वाची झाली हें सहज कळण्यासारखें आहे. अमेरिकनाच्या या विजयाने तीन गोष्टी घडल्या. स्वातंत्र्यवादी पक्ष बलवान ठरला. ब्रिटिश लोकांचा उन्माद एकदम उतरला आणि फ्रान्स राष्ट्राने वसाहतींचे स्वातंत्र्य मान्य करून हें स्वातंत्र्ययुद्ध शेवटपर्यंत चालविण्यास लागणारा पैसा, दारूगोळा, सैन्य व आरमार देण्याचें मान्य केलें!

आता साऱ्या वसाहती आनंदून गेल्या! जिकडे तिकडे साराटोगाच्या युद्धांत विजय मिळविलेल्या सेनापतींचा जयजयकार होऊं लागला व राष्ट्रसभेचें बल अनंतपटीने वाढलें. राजनिष्ठ पक्ष जागच्या

जागीं थिजल्यासारखा झाला ! हें सर्व ठीक झालें; पण या वेळीं कारण नसतां वॉशिंगटनची मात्र निंदा झाली. त्याचा प्रतिस्पर्धी जनरल गेटस् व गेट्सचा पाठीराखा जॉन आडाम्स. दोघांनाही अस्मान ठेंगणें झालें ! त्यांनी बिचाऱ्या वॉशिंगटनला उगीचच कोपरखळ्या मारल्या ! जॉन आडाम्स राष्ट्रसभेंत मोठ्या आढ्यतेने वदूं लागला : "पहा आमचा गेटस् ! नाहीतर तो वॉशिंगटन. मुख्य सेनापति म्हणून मिरवतो न् हौ व कॉर्नवॉलीस यांच्यापुढे सारखा पळतो आहे ! " वस्तुस्थिति अशी होती की, साराटोगाच्या युद्धात जनरल गेट्स नाममात्रानेच उपस्थित होता. तेथील सारी हालचाल केली आर्नोल्ड व मॉर्गन यांनी व विजयही पण यांच्याच परिश्रमाचा व युद्धचातुर्याचा. पण दैवदुर्विलास असा की, रणांगणापासून अलिप्त राहिलेल्या जनरल गेट्सला सारें श्रेय मिळालें. वॉशिंगटनचे शिष्य मागे पडले व त्याची निंदा होत राहिली !

याच संधीला हौने पेनसिल्व्हानिया संस्थानांत घुसून फिलाडेलफिया हें राजधानीचें नगर हस्तगत केलें. वाशिंगटनने आपल्याकडून त्याचा पुष्कळ प्रतिकार केला परंतु साराटोगाच्या रणभूमीवरून मोकळें झालेलें सैन्य गेट्सने त्याच्याकडे रवाना न केल्यामुळें त्याच्या प्रयत्नांस यश आलें नाही व त्यास पिछेहाट पत्करावी लागली. आपल्याशीं झालेल्या अन्यायाची दाद त्याने कॉंग्रेसकडे मागितली. परंतु तेथील सारेंच वातावरण त्यास प्रातिकूल असल्यामुळें त्याच्या म्हणण्याकडे कोणीच लक्ष पोचविलें नाही. उलट आडाम्सने त्याच्या नव्या पिछेहाटीचा गाजावाजा मात्र भरपूर केला ! त्या धीरोदात्त पुरुषाने केवळ राष्ट्रकार्यावर दृष्टि देऊन सारे मानभंग व मनोभंग मुकाट्याने सहन केले. मात्र त्याची योग्यता राष्ट्रसभा जाणत नसली तरी राष्ट्र जाणून होतें व तें त्याच्यावर आपल्या प्राणांची कुरवंडी करण्यास तयार होतें.

---

## प्रकरण एकविसावें

## स्वातंत्र्ययुद्धाचा उत्तररंग

साराटोगाच्या रणांगणावर बरगॉईनसारखा मोहरा चीत झाला ! फ्रान्ससारख्या बलिष्ठ राष्ट्राने अमेरिकेच्या स्वातंत्र्यास मान्यता दिली।

एवढेंच नव्हे तर त्याने तिचा पक्ष उचलून धरला हें पाहून मात्र इंग्लंड थोडेसें गडबडलें. त्यांत त्याने अमेरिकन लोकाशीं (स्वतःच्या रक्ताशींच) भांडत सुटावें या गर्ह्य गोष्टीबद्दल त्याची युरोपभर निंदा सुरू झाली आणि जर्मनीने आपलें भाडोत्री सैन्य यापुढे पुरविण्याचें साफ नाकारिलें. ही स्थिति पाहून राजा व पार्लमेंट यांना थोडेसें भान आलें. वसाहती-संबंधाने आपण कांही निराळा विचार करण्यास हवें होतें, असें त्यास आता वाटू लागलें. या मनोदयानुरूप त्यांनी इतरत्र चालू असलेलें युद्ध बंद न ठेवतां पुन्हा तहाचें बोलणें लाविले. त्याचा हा नवा डाव पाहून वाशिंगटनला मोठी चिंता निर्माण झाली. राष्ट्रसभेमध्यें त्याच्या शब्दाला विशेष मान नसल्यामुळें तींतील कांही सभासद साराटोगाच्या विजयाने हुरळून जातील व ते ब्रिटिशांच्या गोड गोड आश्वासनांना भाळून अप्रशस्त तह करतील असें त्यास भय पडलें. अर्धवट विजयाचा आनंद मानून त्या भरांत पुन्हा ब्रिटिशसत्तेच्या आहारीं जाणें त्यास बिलकूल पसंत नव्हतें. आपण आणखी थोडा नेट धरल्यास इंग्लंडला शरणागति पत्करावी लागेलच लागेल व मग तें आपण म्हणूं त्या अटींवर तह करण्यास तयार होईल असा त्यास विश्वास होता. परंतु हें जमावें कसें ? सर्व वसाहतींना साभाळून धरणारें सरकार नाही, राष्ट्र-सभेंत एकोपा नाही, कायमचें खडें सैन्य नाही व आहे त्याचा खर्च चालविण्यास द्रव्य नाही. अशा गोंधळांत इंग्लंडने तहाची साखर पेरली व ती जर कांही सभासदांना मधुर लागली तर ? युरोप काय म्हणेल ? आपल्या साह्यास तयार झालेले फ्रेंच लोक व त्यांचे सरकार काय म्हणेल ? पुढील पिढी कोणत्या दृष्टीने आपल्या कृतीकडे पाहील ? इत्यादि विचारांनी त्या थोर स्वातंत्र्यवीराचें अंतःकरण दुःखव्याकुल झालें. पण तो केवळ खंत करीत बसणारा पुरुष नव्हता. त्याच्या विचाराचे जे समभागी होते त्या सर्वांशीं त्याने पत्रव्यहार करून सर्वसामान्य लोकाचें स्वातंत्र्यप्रेम जागृत राहील व राष्ट्रसभाही हुरळून न जाईल असा बंदोबस्त केला. एवढ्यानेच तो गप्प बसला नाही. तो जसा आत्मविश्वासू होता, तसाच मोठा श्रद्धाळू व ईश्वरनिष्ठ होता. म्हणून त्याने राष्ट्रीय उपोषण व प्रार्थना करण्याचा एक दिवस निश्चित केला. या दिवशीं सर्व अमेरिकनांनी आपआपल्या जवळच्या धर्ममंदिरात जमावें आणि

सर्वांनी एकदिलाने प्रार्थना करावी, की, "परमेश्वरा! आमचीं सर्वांचीं अंतःकरणें एकमेकाविषयीं शुद्ध असोत आणि सर्वांचें स्वातंत्र्यप्रेम अढळ राहो!" त्याच्या या सदिच्छेप्रमाणें इ. स. १७७८ एप्रिलच्या २२तारखेला सर्व अमेरिकनानी उपोषण केलें व फावला वेळ प्रार्थनेंत घालविला. त्या कालीं सार्वत्रिक मागल्याकारितां असे उपोषणदिन पार पाडण्याची प्रथा अमेरिकन लोकांत प्रचलित होती. स्वातंत्र्य-युद्धाच्या प्रारंभीं इ. स. १७७४च्या जूनमध्यें असा एक दिन साजरा करण्यांत आला होता. अस्तु.

याच वेळीं राष्ट्रसभेच्या घटनेंत एक छोटासा पण महत्त्वाचा फेर-फार झाला. फ्रान्समध्ये फ्राक्लिन आपलें शिष्टमडळ घेऊन गेला होता. त्यास विचारसाह्य करण्यास एक सुयोग्य हस्तक पाहिजे होता. चिठ्या टाकून पाहतां त्यांत जॉन आडाम्सचें नाव निघालें. तेव्हा राष्ट्रसभेने त्याची नेमणूक त्या कामाकडे केली. या योजनेमुळें वाशिंगटनचा मार्ग बराच निष्कंटक झाला. त्याचीं मतें व सूचना विचारांत घेण्यासारखी स्थिति राष्ट्रसभेंत उद्भवली. त्यानंतर इंग्लंडची तहाची वाटाघाट नामंजूर होऊन फेटाळली गेली. पुन्हा युद्धाच्या हालचालींकडे लोकांचें लक्ष लागलें.

अमेरिकन लोक तहाच्या प्रलोभनास बळी पडत नाहीत व उत्तरे-कडील रणभूमीवर आपणास म्हणावें तसें यश येत नाही, असें पाहून ब्रिटिश सेनापतींनी युद्धाच्या क्षेत्रांत थारेपालट करण्याचें योजिलें. दाक्षि-णेकडील संस्थानात त्यानी युद्धास नवें तोंड पाडण्याचें ठरविलें. यापूर्वी त्यांनी स्वातंत्र्ययुद्धाच्या अगदी प्रारंभाला इकडच्या प्रांतांत थोडेसे चावे घेतले होते आणि ते विशेष यशस्वी झाले नव्हते. तरी पण तिकडेच पुन्हा एकदा जोर करण्याचा त्यांनी मनसुबा रचला. या वेळीं न्यूयॉर्क व त्याच्या भोवतालचा थोडासा प्रदेश त्यांच्या ताब्यांत होता. हौने फिलाडेलफिया नगर हस्तगत केलें होतें. पण यापुढे फ्रेंचांचें साह्य अमेरिकन लोकाना मिळणार हे ऐकून त्याने वरील नगर सुरक्षित नाही असें जाणून सोडलें. पुढे तो व त्याचा बंधु लॉर्ड हौ या दोघांनी राजिनामे दिले. जनरल हौच्या जागीं क्लिंटन व लॉर्ड हौच्या जागीं बायरन नांवाच्या सेनानींची नेमणूक झाली. या स्थित्यंतरानेही या युद्धास कांहीं निराळें वळण लागण्याचें चिह्न दिसूं लागलें.

दक्षिणेकडे युद्धाचें भगदाड पाडण्याकरितां ब्रिटिश सैन्याच्या हाल-चाली सुरू झाल्या व त्यांस अनुसरून इ.स. १७७८ च्या जूनमध्यें पंधरा हजार सैनिकांचा एक दळभार न्यू जर्सी प्रांत ओलांडून जाण्यास निघाला. ही वार्ता वाशिंगटनला लागतांच त्याने त्याच्याशीं सामना देण्याचें ठरविलें व संख्येने तितकेंच सैन्य बरोबर घेऊन मॉनमाउथ गावीं ब्रिटिश फौजेस गाठलें! या प्रतिकाराची वॉशिंगटनने इतकी सुंदर मांडणी केली होती की, विजय निश्चित होता; परंतु त्याचीच एक घोड-चूक त्याच्या अंगलट आली! ती अशी:—मागे न्यूयॉर्कच्या लढाईत ज्या चार्लस लीने त्यास अवमानिलें होतें, त्यास ब्रिटिशांनी कैद केलें असल्याचें सांगितलेंच आहे. सदर ली त्या वेळीं ब्रिटिशांतर्फे फासावरच लटकणार होता; परंतु अमेरिकन राष्ट्रसभेने स्वतःच्या प्रतिष्ठेकरितां, जॉन आडाम्सचा आग्रह पडला म्हणून व वॉशिंगटनने त्याचा अपराध विसरून त्यास क्षमा केली म्हणून, कैद्यांची अदलाबदल करण्यांत 'ली'ला सोडवून घेतला. एवढेंच नव्हे तर वॉशिंगटनने दिलदारी ठेऊन त्यास आपल्या हाताखाली पुन्हा उपसेनापति म्हणून नेमून घेतलें. मॉनमाउथच्या रणां-गणांत याजकडे एक कामगिरी सोपविण्यांत आली होती. वास्तविक या वेळीं तरी त्याने वॉशिंगटनचें औदार्य स्मरून त्याची आज्ञा पार पाडा-वयास हवी होती; परंतु तो मूर्ख होता की विश्वासघातक होता कोण जाणे, त्याने पुन्हा आज्ञाभंग केला. इंग्रजाचा मोड होऊन विजयश्री आपल्याला आता माळ घालणार इतक्यांत त्याने स्वतःच्या सैन्याला माघार घेण्याचा हुकूम दिला! त्याच्या या कृतीचा वॉशिंगटनला किती राग आला असेल तें सांगणें नलगे. तूर्त त्यास पराभूत व्हावें लागलें. पुढे लीवर कोर्टमार्शल होऊन त्यास हाकून देण्यांत आलें व त्याच अवस्थेंत त्याचा कुत्र्याच्या मोतीने अंत झाला! अस्तु.

यौद्धिक प्रसंगांच्या दृष्टीने इ. स. १७७९ हें वर्ष साधारणपणें उभयपक्षीं कांहीसें मंदीचेंच गेलें म्हणण्यास हरकत नाही. तरी अमेरिकन लोकांतर्फे एक महत्त्वाचा विजय मिळविण्यांत आला. डॉ. बेंजामिन फ्रांकलिनने फ्रान्समध्यें बसल्या बसल्या एक छोटेंसें अमेरिकन आरमार तयार करण्याची व्यवस्था केली होती. या काफिल्यावर कॅप्टन पॉल जोन्स नांवाच्या इसमाची नेमणूक केली होती. हा असा धाडशी

होता की, फ्रान्सहून हें आरमार घेऊन तो अमेरिकेकडे येत असतां, उत्तर समुद्रांत व इंग्लंडच्या पूर्व किनाऱ्यावर त्याने ब्रिटिश आरमारावर हल्ला करून दोन जहाजें काबीज केलीं आणि नंतर त्याच्यावर स्वतंत्र अमेरिकेचा—पट्टेदार व चांदण्या असलेला ( Stars and stripes चा )—राष्ट्रध्वज फडकवीत अमेरिका गाठली! पॉल जोन्सच्या या विजयाने उद्या आरमारी युद्ध सुरू झाल्यास त्यांतही अमेरिकन लोक मागे पडणार नाहीत, असें सिद्ध झालें.

यानंतर इ. स. १७८० साल उजाडलें. आणि दक्षिणेकडील नव्या युद्धास जोराने तोंड लागलें. इकडे रणभूमि आणण्यात ब्रिटिश सेनापति कॉर्नवॉलिस व त्याचे सहकारी मित्र याचा कांही विशेष हेतु होता. गुलामाच्या व्यापाराबाबत दक्षिणेकडील संस्थानें व उत्तरे-कडील संस्थानें याच्यामध्यें थोडासा बेबनाव होता. शिवाय हीं संस्थानें राजकृपेने संस्थापित झालीं असल्यामुळें येथे राजनिष्ठ पक्षाचें प्राबल्य होतें. तेव्हा या परिस्थितीचें पाठबळ आपणास मिळेल व तिकडून विजय मिळवीत आपण साऱ्या वसाहती दमवून सोडूं अशी त्यांस ( ब्रिटिश लोकाना ) आशा होती. बरें, यदाकदाचित् सर्व वसाहतींचा घास घेण्याचें नाहीच जमलें तर 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पण्डितः।' या न्यायाने वसाहतींची निमेनिम वाटणी करून तह घडवून आणतां येईल, असा त्यांचा विचार होता. त्याप्रमाणें ब्रिटिश फौजा दक्षिणेंत जॉर्जिया व कॅरोलिना या संस्थानांत घुसल्या व तेथील साव्हाना, चार्ल-सटन इत्यादि प्रमुख नगरें त्यांनी काबीज केलीं. अर्थात् या संकटाचा प्रतिकार करण्याकरितां राष्ट्रसभेने आपल्या खास कृपेचा सेनापति जनरल गेट्स यास स्वारीवर धाडलें. साराटोगाच्या युद्धाचें फुकटचें श्रेय मिळ-वून गर्वांध झालेला गेट्स मोठ्या दिमाखाने दक्षिणेंत आला. इ. स. १७८० च्या आगष्टमध्यें त्याची व कॉर्नवॉलीसची कॅमडेन येथे गाठ पडली. उभयपक्षीं तुंबळ युद्ध झालें. परंतु गेट्सच्या अंगीं स्वभावतः युद्धकौशल्य नव्हत्यामुळें त्याच्या सेनेचा धुव्वा उडाला व त्यास शत्रूच्या तडाक्यांतून निसटतां निसटतां पुरेवाट झाली!

इकडे हा पराजय होऊन अमेरिकन पक्षाला मोठा धक्का बसतो न बसतो तों तिकडे उत्तरेंत एक अत्यंत शोचनीय, घृणास्पद व अतर्क्य

प्रकार घडला ! उत्तरेकडील वेस्ट पॉइंट नांवाच्या किल्ल्यावर साराटोगा युद्धांतील प्रसिद्ध योद्धा, कुशल सेनापति, वाशिंगटनचा विश्वासू मित्र व स्वातंत्र्यवादी पक्षाचा मोठा आधार बेनेडिक्ट आर्नोल्डो यास नेमिलें होतें ! हा ब्रिटिशांनी दाखविलेल्या आमिषाला बळी पडला व विश्वासघातक ठरला ! त्याने तें महत्त्वाचें स्थान शत्रूस देण्याचें मान्य केलें ! परंतु अमेरिकेचे सुदैव बळकट ! अँड्री नांवाचा एक गुप्त हेर ( ब्रिटिशांकडील ) पकडला गेला व त्याच्याजवळ आर्नोल्डचीं पत्रें सापडलीं ! हा प्रकार जाहीर होतांच सर्वत्र फार मोठी खळबळ उडाली ! अँड्रीला फासावर लटकाविण्यात आलें. आर्नोल्ड मात्र पळून ब्रिटिशाच्या आश्रयास गेला ! पुढे या घातकी मनुष्याने अमेरिकन पक्षाशींच युद्ध करण्यांत भाग घेतला. पण त्यास यश आलें नाही. ब्रिटिश लोकही त्यास तिरस्काराने वागवूं लागले. शेवटीं लीप्रमाणेंच त्याचाही अंत अत्यंत दु:खांत घडून आला.

गेटस्च्या पराभवाने साचिंत झालेले अमेरिकन लोक लोक-नायक आर्नोल्डोचें नीचतम स्वराष्ट्रद्रोहाचें पातक ऐकून सखेदाश्चर्यांत बुडून गेले. आणखी एक वाईट परिणाम असा झाला की, सर्वांच्या-मध्ये व सर्व ठिकाणी संशयाचें दाट धुके निर्माण झालें. राष्ट्रसभेतील प्रतिनिधीही एकमेकाकडे संशयित दृष्टीने पाहूं लागले. वाशिंगटन-सारख्या अत्यंत निर्मलयश राष्ट्रसेवकाविषयीं शंका उपस्थित झाली. कोणत्याही राष्ट्रात –विशेषेकरून तें युद्धांत गुतलें असेल तर–असला प्रसंग खरोखरीच मोठ्या कसोटीचा असतो. लोकनायकांच्या समयज्ञ-तेची व शांतपणाची ती एक कडक परीक्षा असते. अमेरिका या वेळी तशीच मोठ्या पेचांत सापडली होती. शत्रूला या संधीचा फायदा घेऊन नवें भगदाड पाडण्यास सोयीचें झालें होतें; परंतु स्वातंत्र्यप्रेमी अमेरिकनाच्या सुदैवाने ही वावटळ लौकरच शांत झाली. आणि राष्ट्रसभेने वाशिंगटन-च्या सल्लामसलतीने दाक्षिणेकडील लढाया कशा झुजवावयाच्या हें निश्चित केलें. या कामीं त्यांनी गेट्सच्या जागीं नेथनल ग्रीन नामक शूर पुरुषाची योजना केली आणि त्याच्या साह्यास साराटोगा युद्धातील प्रसिद्ध योद्धा मॉर्गन यास देण्यांत आलें. ग्रीन हा वाशिंगटनचा शिष्य असून युद्धाचे डाव खेळण्यात त्याच्याइतकाच चतुर होता. अल्प साधनावर मोठें कार्य

कसें उरकावें याचा त्यानें चांगला अभ्यास केला होता. अशी ही वीरांची दुक्कल आपआपल्या सरंजामासह दक्षिण संस्थानांत येण्यास निघाली.

तोंपर्यंत इकडे लॉर्ड कॉर्नवालीस यानें जॉर्जिया व कॅरोलिना वसाहतींमध्यें शिरून नुस्ता धुमाकूळ घातला होता. कॅमडेन येथें गेटस् सारख्या नादान मनुष्यावर मिळविलेल्या विजयानें त्याची दृष्टि फिरून गेली होती व अल्पावकाशात साऱ्या वसाहती पादाक्रांत होणार अशीं सुखस्वप्नें त्यास पडूं लागलीं होतीं. मात्र या मनोराज्यांत एकच वैगुण्य ठळकपणें त्यास खटकूं लागलें होतें. कॅरोलिनामध्यें जाऊन आपल्या लष्करी सामर्थ्याची चुणूक दाखवितांच आपणापुढे राजनिष्ठ लोकांचे तांडे मुजरे करण्यास येतील ही जी त्याची गोड अपेक्षा होती, ती विफल ठरली. तेथील प्रजेनें त्याचें स्वागत केलें पण तें फार वेगळ्या प्रतीचें. तें पाहून तो चिडला. तेथे जे कर्तृत्वशून्य झालेले ब्रिटिश अधिकारी होते, त्यांनी सल्ला दिला की लोकांना राजनिष्ठा शिकवावयाची असेल तर त्यास सोपा उपाय म्हणजे अन्याय, अत्याचार व दडपशाही हाच! दुर्दैवानें कॉर्नवॉलीसला तें मत पटलें. तेव्हांपासून त्याच्या अंगात आग्या वेताळ शिरला! बॅंक्राफ्ट नावाच्या सर्वमान्य इतिहासकारानें या कालाचें पुढीलप्रमाणे वर्णन केलें आहे.

In carrying out his plan, the first measure of Cornwallis in 1780 was a reign of terror. On the capitulation of Charleston, eminent patriots remained prisoners on parole....... Accepting the suggestions that severity was the true mode to hold the recovered province, he addressed the most stringent orders to the commandants to imprison all who would not take up arms for the king, and to seize or destroy their whole property.........He set up the gallows at Camden for the indiscriminate execution of those among his prisoners who had formerly given their parole. The destruction of property and life assumed still more hideous forms, when the peremptory orders and examples of Conwallis were followed by subordinates in remote districts away from supervision. Cruel measures seek and find cruel agents; officers whose delight was in blood patrolled the country, burned houses, ravaged

estates and put to death whom they would. No engagement by proclamation or by capitulation was respected. There was no question of proofs and no trial. The enemy were determined to break everyman's spirit; or to take his life."

Vol. V. PP. 391—392.

याचा भावार्थ इतकाच की, इतरांच्या सूचना ऐकून कॉर्नवॉलिसने १७८० मध्यें निवळ कृतांताचा अवतार धारण केला; चार्लेसटनमधील मोठमोठ्या देशभक्तांना अटक करण्यात आली; इंग्लंडच्या राजाच्या बाजूने लढण्यास जे कबूल होणार नाहीत त्यांना तुरुंगांत टाकून त्यांची मालमत्ता जप्त करण्याविषयीं सेनाधिकाऱ्याना हुकूम सोडण्यांत आले;... दूरदूरच्या प्रांतांत पसरलेल्या अंमलदारांनी जो अनर्थापात केला तो याहीपेक्षा हिडिस व भयंकर होता; कर्दनकाळ अधिकाऱ्यांनी सर्व देश पालथा घातला, घरें जाळलीं, इस्टेटी उध्वस्त केल्या व मनास येईल त्यास फांसावर चढविलें; इ०.

अशा धर्तीचे कॉर्नवॉलिसचें तांडव कॅरोलिनामध्यें चालू असतां, नव्या उमेदीचे दोन नवे अमेरिकन सेनापति मोठ्या सैन्यासह झुंजण्यास येत आहेत अशी वार्ता त्यास लागली. ती ऐकून त्याच्या उन्मादांत भरच पडली. त्यानेही आपली तयारी केली.

इकडे पूर्वसंकेताप्रमाणें ग्रीन व मॉर्गन कॉर्नवॉलिसच्या आसपास आले. गनिमी काव्याच्या एका नव्या युद्धास आरंभ झाला. कांही काल दोनही पक्षांचे सुरुवातीचे पवित्रे झाल्यावर इ. स. १७८१च्या जानेवारीमध्यें दोघांची समोरासमोर गाठ कौपेन येथे पडली. हें स्थान दक्षिण व उत्तर कॅरोलिनाच्या पश्चिम सरहद्दीवर आहे. येथे पहिल्यांदा मॉर्गनने कॉर्नवॉलीसशीं सामना केला व त्यास चीं चीं करीत मागे हटविलें. नंतर मॉर्गन मागे पडला व ग्रीनने त्याचें स्थान पटकाविलें. आता युद्धास निराळा रंग आला. ग्रीनने पराजित झाल्याचें सोंग घेतलें व उत्तर कॅरोलिनामध्यें शिरून उत्तरेकडचा मार्ग धरला. चार्लेस्टन नगर हें कॉर्नवॉलीसचें युद्धसामग्रीचें मुख्य स्थान होतें. तेथून त्यास शक्य तों दूर नेऊन फेकणें हाच ग्रीनच्या पराभवाचा व पिछेहाटीच्या धोरणाचा सरळ अर्थ होता. परंतु विजयाच्या धुंदींत कॉर्नवॉलीसला मागचें पुढचें भान राहिलें नाही. ग्रीनला


व्हर्जिनिया
उत्तर कॅरोलिना
दक्षिण कॅरोलिना
कॅमडेन
जॉर्जटाउन
चार्लसटन
अटलांटिक महासागर
स्वातंत्र्य युद्ध
दक्षिणेकडील रणभूमि
संस्थानाची सरहद्द
कार्नवालिसच्या हालचालींचा मार्ग

मोठ्या सैन्यासह पकडून मोठा विजय संपादन करण्याचा मोह त्यास आवरेना. ग्रीनने टाकलेल्या आमिषाला तो भाळला. या खुबीदार पिछेहाटींत ग्रीनला मनस्वी त्रास झाला. पण त्याने आपला हेतु साधला. कॉर्नवॉलीसला त्याने दोनशें मैल लांब म्हणजे कॅरोलिना व व्हर्जिनिया प्रांताच्या सरहद्दीपर्यंत झुलवीत नेलें आणि नंतर इ. स. १७८१ च्या मार्चमध्यें त्या दोघांचें **गिलफोर्ड** नामक स्थानाजवळ पुन्हा युद्ध झालें. यातही ग्रीनचाच पराभव झाला. पण कॉर्नवालीस इतका नुकसानींत आला की न भूतो न भविष्यति ! त्याची ती स्थिति पाहतांच त्याला सोडून ग्रीनने आपलें तोंड पुन्हा दक्षिण कॅरोलिनाकडे वळविलें. पाखराच्या गतीने तो खाली आला व नंतर मॉर्गन, संटर, मेरिअन व पिकन्स इत्यादि सेनापतींच्या साह्याने त्याने जॉर्जिया व दोन्ही कॅरोलिना येथील ब्रिटिश फौजा झोडपून काढल्या! कॉर्नवॉलीसला हें वृत्त कळतांच त्याने संतापाने मनगटें चावलीं; पण त्याचा उपयोग नव्हता. भयंकर नुकसानीसह प्राप्त झालेला विजय त्यास डोईजड झाला होता. पुन्हा ताजेतवाने व्हावयाचें म्हणजे त्यास व्हर्जिनिया ओलांडून न्यूयॉर्ककडेच जाणें भाग होतें. तेथून पुन्हा आपण खाली घसरूं व अमेरिकनांची खोडकी मोडूं अशी त्यास अद्यापि आशा होती. म्हणून तो न्यूयॉर्ककडे जाऊं लागला. तों वाटेंत त्यास बिचवा फ्रेंच सेनापति लाफेटे आढळला ! या 'पोरा'वर कॉर्नवालीसचा मोठा दांत ! तेव्हा त्याचा एकदा धुव्वा उडवावयाचा असा त्याने निश्चय केला ! तो लाफेटेच्या मागे लागला आणि त्या पोरानेही ग्रीनप्रमाणेंच त्याची अवस्था केली ! सर्व प्रकारची नुकसानी सोशीत व त्या संतापात भोवतालचा प्रदेश उध्वस्त करीत कॉर्नवॉलीस चालला ! शेवटीं लाफेटेने त्यास झुकांड्या देत चेसापीक उपसागरास मिळणाऱ्या यॉर्क नदीच्या कांठच्या **यॉर्कटाऊन** नामक गावात नेऊन टाकलें हें स्थान लढाईच्या दृष्टीने कुचकामाचें असताही कॉर्नवॉलीसला तेथे आश्रय घेणें भाग झालें ! ही गोष्ट वाशिंगटनला कळली मात्र, त्याने एका मोठया वेढ्याची तयारी केली ! त्याच्या पाठलागावर असलेल्या क्लिंटन नामक ब्रिटिश सेनापतीस वाटलें वाशिंगटन न्यूयॉर्कवर धावून येत आहे. म्हणून त्याने तेथचा बंदोबस्त चालविला. त्याचा तो भ्रम वाशिंगटननेही पण कायम ठेविला. स्वतःच्या

सैन्याला सुद्धा त्याने आपल्या खऱ्या मानसाचा परिस्फोट होऊं दिला नाही. अत्यंत सावधगिरीने त्याने आपली आखणी केली आणि त्याच्या साह्यार्थ आलेल्या फ्रेंच आरमारालाही एक कानमंत्र पाठविला! सर्व तयारी मनासारखी व जय्यत होतांच त्याने उठावणी केली! न्यूयॉर्क-वर झडप घालण्याचें सोंग करीत अत्यंत चपल गतीने त्याने चेसापीक उपसागर गाठला व तेथून जहाजाने यॉर्कटाऊनच्या तटाबाहेर पदार्पण केलें! कॉर्नवॉलीसच्या गळयाला त्याने बरोबर सरकफास घातला होता! कॉर्नवॉलीस आंतून पाहतो तों काय, समुद्रात फ्रेंच आरमार तोफा डागून उभें! जमिनीवर अमेरिकन सैन्याचा अर्धचंद्र!

कॉर्नवॉलीसने मोठ्या शौर्याने तीन आठवडे युद्ध केलें! परंतु त्याच्या भोंवतीं पडलेला वॉशिंगटनचा गळफास न तुटण्यासारखा होता. शेवटीं निरुपायाने इ. स. १७८१ च्या आक्टोबरच्या १९ तारखेला त्याने शरणचिठ्ठी दिली! अमेरिकनांचा मोठ्यात मोठा विजय झाला! या पराभवाने ब्रिटिशाचें पेकाटच मोडलें!—अमेरिकनांनी सुरू केलेल्या स्वातंत्र्ययुद्धाची आता समाप्ति झाली!

यानंतर पुढे दोन वर्षांनी म्हणजे स्वातंत्र्ययुद्ध सुरू झाल्या-पासून बरोबर आठ वर्षांनी इ. स. १७८३ च्या एप्रिल १९ तारखेला पारीस शहरांत स्वतंत्र अमेरिका व इंग्लंड यांचा बरोबरीच्या नात्याचा तह झाला! इंग्लंडला अमेरिकेचें स्वातंत्र्य मुकाट्याने मान्य करावें लागलें!

---

## प्रकरण शेवटचें

# नवी विटी व नवें राज्य

युद्ध संपलें व त्यांतून इष्ट तें महत्पद प्राप्त झालें. इंग्लंडचें अन्यायी जूं नामशेष झालें व त्याच्याकडून मानास्पद संधि करून घेतां आला. वादळाची घोर रजनी विलय पावली व तिच्या उदरीं तेजस्वी उषेचा उदय झाला. खरोखरच त्या वेळेचें अमेरिकनांचें भाग्य अनुपमच.

परंतु एवढ्यानेच त्यांच्या सर्व संकटांचा परिहार झाला नव्हता. रोगमुक्तता झाली तरी पूर्ण आरोग्य लाभेपर्यंत मागची चिंता

सुटत नाही. प्रचंड वादळ शांत झालें तरी त्याने केलेला नाश भरून येण्यास कांही अवधि लोटावा लागतो. योजिलेलें महत्कार्य पार पडून जातें परंतु त्याच्याकरितां मांडलेला पसारा आवरणें शिल्लक राहतें. त्याप्रमाणें अमेरिकन वसाहती युद्धोत्तरकालीन गोंधळांत सापडल्या होत्या. त्यांची भाग्यप्रभात फाकली असली तरी कांही लहान मोठ्या संकटांचें अवडंबर वातावरणात तरंगत होतें.

स्वातंत्र्ययुद्धाच्या सामुदायिक संकटामुळें सर्व वसाहती बंधुभावाने एकत्र होऊन लढल्या. पण तें कार्य उरकताच त्यांची आवळयाची मोट सुटली ! पुन्हा तेरा वसाहतींचे तेरा संसार अलग होऊन पडले आणि त्यांना पूर्वीपेक्षाही जास्त विस्कळीतपणा येण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. त्या उगवत्या राष्ट्रावर ही मोठी आपत्ति कोसळूं पाहात होती. गतयुद्धांतून तें यशस्वी होऊन बाहेर पडले असलें तरी स्वातंत्र्याव्यतिरिक्त तादृश लाभ असा कांहीच झाला नव्हता. उलट सतत आठ वर्षें त्यास एका बलाढ्य राष्ट्राशीं झुंज करावी लागल्यामुळें, त्याचें अंग भाजून निघालें होतें. त्याची शेती डबघाईला आली होती, व्यापार थंड पडला होता, उद्योगधंदे साफ बसले होते व सामान्य व्यवहारही मोठ्या कष्टाचा झाला होता. यामुळें बहुतेक सारी प्रजा कर्जबाजारी होऊन तिच्यावर दारिद्र्याची अवकळा दाट पसरली होती. लोकात दारिद्र्य पसरलें म्हणजे त्यांच्यामध्यें अनेक अवगुण साथीच्या रोगाप्रमाणें पसरूं लागतात. क्षुल्लक कारणावरून भांडत सुटणें, एवढ्यातेवढ्याकरितां खोटेपणा करणें, चालतां बोलतां विश्वासघात करणें, निष्कारण संशयी बनणें व स्वार्थाकरितां वाटेल तें पाप करण्यास तयार होणें इत्यादि गोष्टी अगदी सरोस होऊन बसतात. त्यांतून राष्ट्र एकसंधी व एका सत्तेखाली असलें तर याची काही व्यवस्था लावणें शक्य कोटींतील असतें. परंतु येथे सारीच धर्ती वेगळी होती. तेरा प्रकृतींचीं तेरा संस्थानें एका दावणीला होतीं. कोणीं कोणाला बोलावयाचें किंवा सांभाळून घ्यावयाचें ? आपसांतील लाथाळी बरी नाही हें सर्वांना कळत होतें. पण तिचें नियंत्रण कोणीं व कसें करावयाचें हाच प्रश्न होता. असो.

आपला सर्वांचा एक संघ असला पाहिजे तरच आपला निभाव लागेल ही कल्पना वसाहतवाल्यांना स्फुरली नव्हती असें नाही. शेंदीडशे

वर्षांपूर्वीच तिचा उगम झाला होता. इ.स. १६४३ मध्यें प्रथमत: संघ करण्याची आवश्यकता भासली. त्या वेळीं 'न्यू इंग्लंड' या नांवाखाली ज्या वसाहती स्थापन झाल्या होत्या, त्यांना डचलोक व रेड इंडियन यानी सारखा त्रास देण्यास सुरुवात केली. ही आपत्ति पाहून वरीलपैकी चार वसाहतींनी—मासाच्युसेट्स, कनेक्टिकट्, प्लायमाउथ व न्यू हॅवन यांनी—आपला संघ स्थापन केला आणि त्याच्यातर्फे सैन्य ठेऊन व त्याचा खर्च आपसात वाटून घेऊन आपलें रक्षण केलें! ही जूट सुमारें चाळीस वर्षें टिकली. पुढे इ.स. १७५० सालीं फ्रेंचाशीं कलागती सुरू झाल्या. तेव्हा पुन्हा संघ स्थापण्याची गरज उत्पन्न झाली व मग उत्तरेकडील सात आठ संस्थानांनी एकोपा केला. यामुळेंही सर्वांचें हितच झालें. पुढे इ. स. १७७४ सालापासून इंग्लंडशींच दावा खेळण्याची वेळ आली. तेराही वसाहतींच्या स्वातंत्र्यालाच ग्रहण लागलें. त्याबरोबर त्यांनी एक होऊन राष्ट्रसभेची स्थापना केली व तिच्या अधिकाराखाली स्वातंत्र्याचा जाहिरनामा काढला. पुढे स्वातंत्र्ययुद्ध झालें व त्यांतही सर्वांनी एकजूट ठेव ल्यामुळें यश आलें. तात्पर्य, एकजुटीने राहण्यात कोणतें कल्याण आहे, याची स्पष्ट कल्पना वसाहतींना होती. मग आता त्या एक का होत नव्हत्या? त्यांनीच स्थापलेली राष्ट्रसभा काय करीत होती?—कारण असें होतें की, नव्या संघामध्यें प्राधान्य कोणाला द्यावयाचें? व्यक्तीला की वसाहतीला? समजा, कोणालाही देण्याचें ठरलें तरी ती व्यक्ति किंवा ती वसाहत कोणती? तिची निवड का व कशी करावयाची? इत्यादि प्रश्न उपस्थित होणार होते. हे सोडविण्यास राष्ट्रसभा असमर्थ होती. कारण, तिला सत्तेचा पाठिंबा नव्हता. शेतांत उभारलेल्या बुझगावण्याप्रमाणें तिची अवस्था होती. हा तिचा दुबळेपणा पाहूनच वॉशिंगटनसारखे पुढारी मध्यवर्ती सरकार लौकर निर्माण करा म्हणून आक्रोश करीत होते. परंतु युद्धाच्या धांदलींत तिकडे कोणीच लक्ष दिलें नाही. किंवा अनेकांची इच्छा असूनही ती गोष्ट अमलांत आली नाही. पण आता मात्र तिकडे दुर्लक्ष करणें आत्मघातकीपणाचें होतें. युद्धनिवृत्त झाल्यामुळें निरुद्योगी झालेलें सैन्य, त्रस्त झालेले शेतकरी व दारिद्र्यपीडित प्रजा यांच्यामध्यें अराजकता पसरण्याचीं चिह्नें स्पष्ट दिसू लागलीं. त्यांच्याकडे न पाहिल्यास ती आग कशी भडकेल याचा

नेम नव्हता व ती जुजबी उपायांनी शमणेंही कठीणच होतें. बाह्यत: युद्ध संपलें होतें, इंग्लंडची सत्ता कानडा प्रांतांत जाऊन बसली होती, युरोपांतील राष्ट्रांनी 'अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें' हें स्वतंत्र राष्ट्र असल्याचें मान्य केलें होतें. हें सर्व योग्य झालें होतें. परंतु खुद्द वसाहतींमध्यें एकराष्ट्रीयत्व कुठे होतें? त्या आपणास परस्परांपासून भिन्न समजून तुटकपणें वागूं लागल्या होत्या आणि एकमेकांवर तुटून पडतात की काय, अशा भाडखोर अवस्थेंत शिरल्या होत्या. भविष्यकाळांत उग्र रूप धारण करणारे तीन प्रश्न त्यांच्या दारांत घोटाळत होते. स्वातंत्र्ययुद्ध झुंजविण्याकरितां परराष्ट्राकडून घेतलेलें कर्ज कोणी फेडावयाचें व तें कोणत्या मार्गानें? परराष्ट्रांशीं राजकारण चालवावयाचें तें कोणातर्फे व कोणत्या नियमाप्रमाणें? आपसातील संबंध, तंटेबखेडे, देणें घेणें, व्यापार यांची वाट काय लावावयाची व ती कोणी लावावयाची? हेच ते प्रश्न होत. यांत एखाद्या व्यक्तीचा किंवा वसाहतीचा संबंध नसून अमेरिकन लोक व राष्ट्र याचा होता! येथे राष्ट्राची पत पणाला लागलेली होती. याशिवाय वसाहतींच्या भावी उत्कर्षाचा प्रश्नही यात गोवला गेला होता. आलेघानी पर्वताच्या पलीकडे जो फार मोठा प्रदेश फ्रेंचांकडून मिळालेला होता, तो आता सर्व वसाहतींच्या मालकीचा होता; पण त्याची वाटणी कशी करावयाची व त्याचें स्वामित्व कसें सांभाळून ठेवावयाचें? याचा निर्णय तात्काळ होणें अगत्याचें होतें. तात्पर्य, या सर्व प्रश्नांचा किंवा अडचणींचा एकदम निकाल लावावयाचा तर सर्व वसाहतींना सारखेंच मान्य असणारें व सर्वांना योग्य मार्ग दाखविणारें राष्ट्रीय सरकार स्थापन करणें एवढा एकच उपाय होता. पण तो सर्व वसाहतींतील प्रमुख लोकांना समजून येण्यास चार वर्षें लागलीं. वाशिंगटन, फ्रांकलिन, आडाम्स, जेफरसन, मॅडिसन, हॅमिलटन इत्यादि प्रमुख लोकनायकांनी जेव्हा सारखी धावपळ केली, अनेकांच्या अनेक प्रकारें समजुती घातल्या व रात्रंदिवस चिंता वाहिली, तेव्हा कुठे हा सरकार स्थापन करण्याचा प्रश्न धसाला लागला. त्याच्या निर्णयार्थ एक मोठी राष्ट्रसभा भरण्याचें निश्चित झालें. त्याप्रमाणें इ.स. १७८७मध्यें ता. १४ मेला वाशिंगटनच्या अध्यक्षतेखाली राष्ट्रसभेच्या या विशिष्ट अधिवेशनास प्रारंभ झाला. सर्व वसाहतींतून

पंचावन्न प्रतिनिधि हजर होते. हे सर्व लोक मोठे समंजस, सुविचारी राष्ट्रहितचिंतक व कार्यनिष्ठ होते. तरी त्यांच्यामध्यें दोन पक्ष पडलेच. राष्ट्रीय सरकार स्थापन करून सर्व वसाहतींचा राजकीय संघ झाला पाहिजे असें म्हणणारे 'संघटनावादी'( Federalists ) व त्यांच्या विरुद्ध मताचे 'संघटनाविरोधक' ( Anti-Federalists ).

सर्वांचें मिळून असें एखादें सरकार असलें पाहिजे, हा विचार अत्यंत सयुक्तिक असतांही त्यास विरुद्ध असणारे वादाचे अनेक मुद्दे राष्ट्रसभेपुढे आले. धर्म व राज्यकारभार यांची सांगड कशी घालावयाची व कोणत्या धर्मपंथाला राष्ट्रीय मान्यता द्यावयाची ? ज्यांची लोकसंख्या मोठी आहे अशा वसाहती व ज्याची अल्प आहे अशा वसाहती यांचे अधिकार बरोबरीने ठेवावयाचे की नाही ? तसें न झाल्यास बड्यांच्या पुढे छोट्यांचें हितरक्षण कसें व्हावयाचें ? मताधिकारामध्यें काळ्या निग्रो गुलामाचें वर्गीकरण कोठे व कसें करावयाचे ? हे तीन मुद्दे फार महत्त्वाचे होते. यामुळें नवीन राज्यघटनेचा (Constitution) मसुदा ठरवितांना प्रत्येक कलमागणिक वादाचा प्रश्न उपस्थित होऊं लागला आणि त्याची मजल ' मुद्यापासून गुद्यापर्यंत ' जाऊं लागली ! कित्येक प्रसंग असे उद्भवले की, सभेचें काम पुढे चालविणें अशक्य झालें व कोणताही निर्णय न लागताच ती बैठक उधळली जाणार असें भय अध्यक्षास व इतर कित्येकांना वाटलें.

चार महिने जवळजवळ रात्रंदिवस ही बैठक चालू होती. यावरून तें कार्य किती भानगडीचें होतें हें सहज कळण्यासारखें आहे. शेवटी चार महिन्यांनंतर सर्वांना स्वतंत्रता लाभेल, सर्वांचे हितसंबंध सारखे राखले जातील, राज्यकारभारात सर्वांचा हात राहील व कोणी कोणाच्या आड येणार नाही अशी एक योजना करण्यांत आली. ती सर्वच्या सर्व येथे देणें अशक्य आहे. तिचा थोडक्यात निष्कर्ष असा:-

धर्म व राज्यकारभार याची अगदी फारखत करण्यांत आली. त्यामुळें व्यक्तीचें धर्मस्वातंत्र्य कायम राहून एक मोठा कलहाचा प्रश्न अजीबात नाहीसा झाला. तिसरा मुद्दा गुलामांचा. तो त्यावेळीं अगदी बाजूला ठेवण्यांत आला. राहतां राहिला, छोट्या मोठ्या संस्थानांचा. त्यांचा प्रश्नही खुबीने सोडविण्यांत आला. प्रत्येक संस्थान आपआपल्या-

परी अगदी स्वतंत्र्य ठेवण्यांत आलें. ज्याने त्याने आपआपला राज्यकारभार आपल्या मर्जीप्रमाणें करावा. कायदेकानू ठरवावे आणि लोकनियंत्रण करावें. काँग्रेस मुख्य सरकार. या राष्ट्रीय सरकाराने पर राष्ट्रीय संबंध ठेवणें, युद्ध पुकारणें, तह करणें, नाणें पाडणें, पोष्ट व तारायंत्र यांची व्यवस्था करणें इत्यादि कार्यें करावीं. काँग्रेसमध्यें दोन शाखा असाव्या. वरिष्ठ सभा (Senate) व प्रतिनिधिसभा (House of Representatives). प्रतिनिधिसभेंत प्रत्येक संस्थानाचे लोकसंख्येच्या प्रमाणांत प्रतिनिधि असावे. पण वरिष्ठ सभा—सिनेट—मध्यें मात्र प्रत्येक संस्थानाचे—तें कितीही लहान मोठें असो—दोन प्रतिनिधि असावे. मुख्य घटनेंत कांही कमी जास्त फेरबदल करणें असल्यास दोन तृतीयांश सभासदाचें व तीन चतुर्थांश संस्थानांचें एकमत व्हावें. राष्ट्रसभेला एक मुख्य अध्यक्ष, एक उपाध्यक्ष व यानी निवडलेलें मंत्रिमंडळ असावें. राष्ट्रीय सरकाराने ठरविलेले कायदेकानू अंमलांत आणण्याचा अधिकार अध्यक्षाकडे आहे. अंमलबजावणी खात्याचा मुख्य तोच. राज्य किंवा राज्योपभोग, पदव्य किंवा सुलतानी सत्ता नसताही अध्यक्ष हा राजाप्रमाणे मानला जावा. राष्ट्रसभा ठरवील त्याप्रमाणें राज्यकारभार चालविणाऱ्या अध्यक्षाचे व अधिकाऱ्याचे वेतन असावें. जेणेंकरून राष्ट्रहिताच्या आड येईल किंवा त्याची पत कमी होईल असें वर्तन समान्य प्रजेकडून न होईल एवढेंच पारतंत्र्य तिला असावें. कायदेशीर वागणाऱ्या नागरिकास धर्मस्वातंत्र्य, वाक्स्वातंत्र्य, व लेखनस्वातंत्र्य असावें. याच नियमानुसार मुद्रणस्वातंत्र्यही असावें. इत्यादि.

तात्पर्य अमेरिकन राष्ट्राच्या राज्यकारभाराची एकंदर घटना अशी आहे की, त्यांत कोणत्याही व्यक्तीच्या, कुळाच्या, समाजाच्या किंवा पंथाच्या उत्कर्षाआड सरकाराने आडवे पडूं नये. प्रत्येकाच्या विकासाला भरपूर वाव मिळावा. जिथे तिथे सरकाराचा हात व कायद्याची लाथ हा प्रकार अमेरिकेंत नाही. तिच्या प्रचंड उत्कर्षाचें रहस्य हें असें आहे.

या सर्वोपयोगी घटनेने चार महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. पहिली ही की, अमेरिकन वसाहतींचा फुटकळपणा जाऊन त्यांचें राष्ट्र बनलें, राष्ट्रसभा सत्ताधारी झाली व तिचा अध्यक्ष मस्तकाप्रमाणें उपयुक्त झाला! दुसरी गोष्ट ही की, राष्ट्रीय सरकार निर्माण झाल्यामुळे

प्रजेकडून करभार घेणें, तिचें रक्षण करणें, कर्ज देणें घेणें, परराष्ट्रांशीं स्नेह संपादणें इत्यादि व्यवस्था सुलभतेने होऊं लागली. तिसरी ही की, परस्पर वसाहतींचे संबंध सलोख्याचे होऊन अधिकार सारखे झाले आणि चवथी व सर्वांत महत्त्वाची ही की, समतेच्या व स्वातंत्र्याच्या पायावर राष्ट्राची उभारणी होऊन व्यक्तिमात्राच्या उत्कर्षास पूर्ण वाव मिळाला.

समता व स्वतंत्रता यांच्या प्राणप्रतिष्ठेचा हा समय खुद्द अमेरिकनांच्या दृष्टीने जितका महत्त्वाचा तितकाच अखिल जगाच्या इतिहासांतही प्रभावशाली ठरावा अशी ईश्वरी योजना होती. लवकरच अटलांटिक महासागराच्या पलीकडच्या किनाऱ्यावर, शतावधि नरबलींच्या हृदयभेदक किंचाळयात व भयानक रणभेरींच्या प्रचंड कोलाहलात ज्या तत्त्वांचा उदो उदो होणार होता त्याच समता, बंधुता व स्वतंत्रता या तत्त्वाची स्वस्तिवाचनाच्या शांत व मंगल घोषात प्राणप्रतिष्ठा आज अमेरिकेंत चालली होती! नुकत्याच झालेल्या स्वातंत्र्यसंगरामध्यें अमेरिका व फ्रान्स या दोन राष्ट्रांचा जो घनिष्ठ संबंध जडून आला होता त्यामुळें या तत्वाचे स्फुलिंग अमेरिकेंतून सागरपर्यटन करून फ्रान्सांत गेले व तेथे आधीच भरून तयार असलेल्या स्फोटक द्रव्याच्या कोठाराचा (राज्यक्रांतीच्या रूपाने) भडका उडविण्यास कारणीभूत झाले असें इतिहास सांगतो. अठराशे वर्षें जग एकसारखें राजसत्तेचा अनुभव घेत असतां लोकशाहीच्या तत्त्वाचा अमेरिकेंत होत असलेला उदय जितका अद्भुत तितकाच चिरपरिणामी व चंडपराक्रमी होता! असो.

घटना ठरल्यानंतर अध्यक्षाची निवड झाली. सर्वानुमतें हा मान जॉर्ज वाशिंगटन यास देण्यांत आला. स्वातंत्र्ययुद्धाच्या पूर्व रंगात व पुढेही जॉन आडाम्ससारख्या लोकांनी त्यास तुच्छ लेखलें असलें तरी तह झाल्यावर जेव्हा खरा इतिहास बाहेर आला तेव्हा खरोखर वाशिंगटन नसता तर राष्ट्राला हे दिवस दिसले नसते असाच निष्कर्ष निघाला! त्याचें युद्धकौशल्य व त्याची कर्तव्यनिष्ठा ही तर निरुपम खरीच, परंतु त्याची त्यागी वृत्ति त्याहीपेक्षा अलौकिक होती. सन १७८३ साली राष्ट्रसभेच्या हेळसांडीमुळें तिजवर रुष्ट झालेल्या सेनाधिकाऱ्यांनी वॉशिंगटनला राजपद देऊन त्याचा जयजयकार करण्याचा बूट काढला होता. परंतु वॉशिंगटनने या कल्पनेचा इतका सडकून निषेध केला की त्यानंतर

असले विचार उच्चारून दाखविण्यास देखील कोणी धजला नाही. खरो-खर, निष्ठावंत असें पराक्रमी सैन्य हातीं असता आजपर्यंत सर्व देशांमधील यशस्वी सेनानायकानी वैयक्तिक महत्त्वाकांक्षेस वश होऊन जें केलें तेंच वॉशिंगटनने केलें असतें तर त्यास कोणीही दोष देऊं शकलें नसतें. परंतु ज्यास सेनापतिपदावरून केलेल्या महनीय सेवेबद्दल साधें वेतन घेण्याचेंही नाकारलें त्यास वैयक्तिक स्वार्थाचें शिखर जें राजपद त्यावर आरूढ होण्याची कल्पना तरी कशी सहन व्हावी ? अशा दैवी गुणसंपदेने युक्त असलेल्या नररत्नापुढे सर्वांनी अवनतमस्तक व्हावें व त्यास आपला पहिला अध्यक्ष निवडून त्याच्याविषयींची कृतज्ञता प्रकट करावी यांत नवल तें काय ? या कृतज्ञतेच्या प्रदर्शनाने तो विनयाची मूर्तीच असा धीरोदात्त पुरुष गहिंवरून गेला ! त्याच्या नेत्रातून घळघळ अश्रु वाहूं लागले व त्यास दोन शब्दही बोलवेनात !

वाशिंगटन यांची अध्यक्ष या नात्याने निवडणूक झाल्यावर नवीन राज्यघटना ता. ४ मार्च इ. स. १७८९ या दिवसापासून अमलांत येण्याचे ठरलें. मात्र अध्यक्षाचा सत्कारसमारंभ व नवीन राज्यस्थापनेसंबंधाचा उत्सव सोईकरिता त्याच सालच्या ३० एप्रिल पर्यंत पुढे ढकलण्यात आला.

अध्यक्षपदावर येतांच वॉशिंगटनने आपल्या साह्याकरितां पांच अत्यंत सुयोग्य माणसाचें मंत्रिमंडळ नेमून घेतलें. टॉमस जेफर्सन यास परराष्ट्रमंत्री, हॅमिल्टन खाजिनदार, नॉक्स युद्ध व सेनाधिकारी, रँडॉल्फ कायद्याचा सल्लागार, जॉन जे मुख्य न्यायाधीश, अशा नेमणुकी करण्यात आल्या. सांगण्यासारखी गोष्ट अशी होती की हें पंचक वाशिंगटनशीं सर्वथा सहमत नव्हतें. तरीपण स्वराष्ट्रकल्याण हा एकच धर्म सर्वजण जाणत होते.

वाशिंगटनच्या अंमलांतील राज्यकारभार सुरू झाल्यावर अगदी पहिली गोष्ट ही करण्यांत आली कीं करांत द्रव्य जमविणें व राष्ट्राला झालेलें कर्ज फेडणें. याकरितां मोठी दक्षता घेऊन राष्ट्राची पत सांभाळण्यात आली

राज्यकारभाराचें गाडें सुरळीत चालू झाल्यावर मग ठरल्याप्रमाणें ता. ३० एप्रिलला अध्यक्षाच्या स्वागताचा मोठा समारोह करण्यांत आला !

न्यूयॉर्क हीच राजधानी कायम करण्यांत आली. येथे फेडरल हॉल नांवाची जी सार्वजनिक इमारत होती, तिच्या वरच्या सज्ज्यामध्यें अध्यक्षाचें सिंहासन मांडण्यांत आलें होतें आणि खालच्या प्रांगणांत लोकप्रतिनिधि व प्रेक्षक यांच्या बसण्याची व्यवस्था केली होती. जिकडे तिकडे तोरणें पताका लाविल्या असून त्यांतच प्रमुख भागीं युनायटेड स्टेट्सचा राष्ट्रध्वज फडकत होता.

नियोजित कालीं अगदी साध्या लष्करी वेषांत वॉशिंगटन आपल्या मंत्रिमंडळासह उपस्थित झाला आणि नंतर त्याने सिंहासनाजवळ जाऊन राष्ट्रसेवा एकनिष्ठपणाने करीन अशी शपथ घेतली. यानंतर त्याने अध्यक्ष या नात्याने एक छोटेंसें भाषण केलें. त्यांत तो म्हणाला, "माझ्या प्रिय देशबांधवांनो! तुमच्या संमतीने, तुमच्या सुखाकल्याणाकरितां व तुमच्याचकडून चालविलें जाणारें सरकार आज अस्तित्वांत आलें आहे. याची रचना शक्य तों विचारपूर्वक करण्यांत आलेली आहे व तीमुळे तुमचें कल्याणच होईल असा मला विश्वास आहे. ही रचना आहे तशी चालू ठेवण्याचा, किंवा ती बदलून घेण्याचा अधिकार तुम्हाला आहे. तेव्हा सुजाणपणें, न्यायनीति ठेऊन तिचा उपभोग घ्या आणि आपल्या राष्ट्राची कीर्ति दिगंत दुमदुमत जाईल असा प्रयत्न करा! परमेश्वर आपलें कल्याण करो! आपणास योग्य मार्ग दाखवो!!"

यानंतर तोफांचे धडाके उडाले! धर्ममंदिरातील घंटा वाजूं लागल्या! आणि लोकांच्या जयजयकाराने आकाश दुमदुमून गेलें!

वाशिंगटन चिरायु होवो!

अमेरिकेचा राष्ट्रपति वाशिंगटन चिरकाल सुखी असो!

अशा आशीर्वचनांनी लोकांनी आपला आनंद व्यक्त केला! याच वेळीं साऱ्या वसाहतींमध्यें, प्रत्येक गावीं असाच महोत्सव चालला होता! अमेरिका नव्या आनंदाने थय थय नाचत होती!



# आधारभूत ग्रंथांची यादी


1. GEORGE BANCROFT : *The History of the United States. Complete in six volumes ( The author's last revision ). 1885.*
2. WOODROW WILSON : *A History of the American People vols. 1 to 5.*
3. BUTTERWORTH : *Story of America.*
4. EGGLESTON : *History of the U. S. America.*
5. N. S. SHALER : *The United States of America.*
6. R. MACKENZI : *America.*
7. MONTGOMERY : *The Leading Facts of American History.*
8. R. MACELROY : *A History of the U. S. America.*
9. LALA LAJPATRAI : *The United States of America : A Hindoo's study.*
10. Dr. SUDHINDRA BOSE : *Glimpses of America.*
11. S. R. GARDINER : *Student's History of England.*
12. श्री प. ह. बर्वे : युरोपचा इतिहास.


—इत्यादि—

# सूची

[ लढाईचीं ठिकाणें त्यांच्या नांवांपूर्वी फुल्या घालून दर्शविलीं आहेत: ]